: १ :

बाहेर पावसाची बेसुमार झड. खोलींत बापू घिरट्या घालीत होते. दार उघडून एक बाई बाहेर आली.

' कशी आहे तिची तब्येत ? ' त्यांनीं घाबरटपणानें विचारलें.

ती बाई हंसली आणि म्हणाली, ' अहो, बाळाबद्दल विचारा ! बाळ बाळन्तीण सुखरूप ! '

' अस्सं ! ' बापूंनीं फक्त एक निश्वास सोडला.

खोलींतून बाळाचं क्षीण रडणं ऐकूं येत होतं. बाहेर पावसाचे फटकारे जोरानें बसूं लागले कीं ते मंद रडणं दूर गेल्यासारखें वाटे. बापू फेऱ्या घालीत होते. ती पुढची खोली. कोपऱ्यांत केशरी ज्योत असलेली धूर सोडणारी एक चिमणी होती. ती वाऱ्यानं फडफडे तेव्हां सटर फटर वस्तूंच्या छाया भिंतीवर हातपाय नाचवीत. दूर-वर ' धम्म धम्म् ' असा आवाज झाला !

' ही रात्रीं बाराची तोफ ! जगांत यायची भलती वेळ शोधलीय बेट्यानं ! ' बापू मनाशीं पुटपुटले. कपाळावर नसलेला घाम धोत-राच्या सोग्यानं बापूंनीं पुसला.

जरा वेळानं ते बाळंतिणीच्या खोलींत शिरले ! क्षणभर तिच्याकडे ते दुरूनच बघत राहिले—रमाबाईकडे !

खाटेपासून जरा अन्तरावर एका तिपाईवर कंदील ठेवला होता. रमाबाईच्या प्रशस्त कपाळाचा पट्टा प्रकाशानं उजळून निघाला होता. या पट्टयाच्या मधोमध नाकाच्या उंचवट्याची सरळ बारीक किनार चमकत होती. बाकी सारें कांहीं अंधारांत दडलं होतं. घाम

परिचित चेहऱ्याकडे बापू बराच वेळ बघत राहिले.

मग जणूं समोरचं स्मृतीचं जाळं हातांनीं झटकून टाकावं त्या प्रमाणें त्यांचा हात समोर फिरला, ते पुढे सरले. हळूंच शेजारी जाऊन म्हणाले — ‘ काय ! ऐकतेस का ?’

क्षणभर तरळ निळेपणा भासावा तसं झालं !! रमाबाइनीं हळूंच डोळे उघडले. बापूं उशाशी उभे होते म्हणून त्यांनीं डोकं तसंच मागे नेलं. तेव्हां चिवळ हनुवटी प्रकाशांत उंचावून चमकली. मागे बघत त्या क्षीण आवाजांत म्हणाल्या — ‘ म्हटलं ! जेवण केलं ना ? ’

“हो. बर वाटतं ना ? ” कांही तरी विचारायचं म्हणून विचारलं. पण आवाज कांपरा झाला होता.

‘ हे काय ? असं काय करायचं ते ! बाळाला नाहीं कां बघायचं ! विचारपूस माझी का करायची असते ? ’

बापू खजील हंसले. जवळ सरत म्हणाले — ‘ वा! पाहूं या कीं बाळ ! ’

‘ हं !. शिवूं नका मात्र. दुरून बघायचं असतं ! ’

पोर कुशी शेजारच्या अंधारांत दिसत नव्हतं. कंदील वर करतांच ते लाल पालीसारखं दिसलं. वीतभराचं काटकुळं पोर. इवल्याश्या तोंडावर अनेक सुरकुत्या. नाकाचा थेट तोच उंचवटा. पोर क्षीण आवाजांत रडूं लागलं. बापूंनीं कंदील खालीं ठेवला. स्तब्ध बसले. पोर जोर जोरानं रडूं लागलं. बाहेर पावसाला फिरून जोर चढला. घों घों ऽ आवाज सुरू झाला.

बापूंना काय वाटलं कुणास ठाऊक. ते खालीं वाकून हलक्या आवाजांत म्हणाले—‘ ऐकतेस का ? पोराला आपलं घर नापसन्त दिसतंय् ! ’

‘ भलतच ! जन्मतः न रडणारे पोर पाहिलंय् ? ’

बाहेर पाऊस जोरानं भिंत पिटूं लागला. कोपऱ्यांतील चिमणी फडफडत होती. पोराचं क्षीण रडणं फिरुन एकवार उर्मिउर्मीनं उचंबळत होतं.

: २ :

बापूंचं बोट धरुन विश्वास शाळेंत चालला आहे. मोठे डोळे, सुरेख, सरळ नाक, काटकुळं शरीर, हातांत एक पिशवी. मोठा बाजार आज प्रथम पाहिलेला; म्हणून डोळे कसे नवलानं मोठे झालेले. हा बाजार संपला. केवढा मोठा हा बाजार ! सारीकडे रंगीबेरंगी घागरे घातलेल्या बाया नि कुसुंबी पगड्या घातलेलीं माणसं. त्याला फार नवल वाटलं. बापू संथपणानं चढाव चढूं लागले. विश्वासचं मन धडधडायला लागलं. आज शाळेंत चालला आहे तो. घरीं दुसरी पावेतो शिकला. तिसरींत दाखल करायचंय् त्याला ! जुन्या महाराज-वाड्याची प्रचंड इमारत दुरुन दिसूं लागली. भिंतीवर मोठमोठ्या अक्षरांत लिहिलंय् ‘ म-रा-ठी-शा-ळा’ केवढी उंच कमान.... उंचच उंच !

बापूंना पाहिलं नि हेड्मास्तर लगबगीनं पुढे झाले. निघोजकर हेड्मास्तर. विश्वासला धीर वाटला. आपले बापू कोणी मोठे आहेत हे मनोमन पटलेलं त्याला फिरुन एकवार पटलं. त्याचा बाळचेहरा खुलला.

‘ काय चिरंजीवांना शाळेंत घालायचं वाटतं ! काय बाळ, नांव काय तुझं ? ’ हेड्मास्तरांनीं विचारलं.

' विश्वास नारायण पूरकर ' तोंडपाठ उत्तर विश्वासनं खडखडीत म्हणून दाखवलं.

' शाबास '

विश्वासची काळजी दूर झाली. त्यानं हेड्मास्तरांना पाहिलं. कपाळावर आडवं गंध. गोरा वयोवृद्ध चेहरा. शाळा बरी असते म्हणायची !

त्याचं बोट धरुन हेडमास्तरांनी त्याला दुसऱ्या इयत्तेच्या वर्गात नेलं. चिनू वर्षेनं वर्गांच्या मधोमध फिरणारा भोंवरा स्वतःच्या खिशांत भरकन् कोंबला. पोरं उभी झालीं !!

' पहा रे बाळांनो ! हा आणलाय् तुमच्यासाठीं नवा सोबती. फार शाहणा आहे बरं हा ! जा ! बैस बाळ त्या बांकावर '

हेड्मास्तरांच्या खास शिफारशीनं आलेला मुलगा. हेटाळणीनं अनेक डोळे चमकूं लागले. हेड्मास्तरांची पाठ वळली. विश्वासच्या छातींत धडधडायला लागलं. तो खालीं मान घालून बसला. कुठेहि बघेना !

प्रार्थनेची घंटा व्हायला अवकाश होता.

समोरचीं मुलं फिदी फिदी हंसायला लागलीं. कोपऱ्यांतून ऐकूं आलं—' श-श्श् ! ए लाजाळू ! नांव काय ग तुझं ? '

विश्वासच्या छातींतून कळ गेली. चमकून त्यानं वर पाहिलं. समोर एक लठ्ठ गोरापान अडदांड मुलगा हंसत होता. त्याच्या समोर हातांत गोट्या होत्या. एक गोटी गालाआंतील दाढेवर तो कड्ड्-कड्ड् वाजवून दाखवीत होता. विश्वासनें वर बघतांच त्यानें लांब जीभ दाखविली—' एऽ हेऽ रे मुलगी ! मुलगी !! नांव काय ग तुझं ! '

सारी मुलं टाळ्या पिटूं लागली. विश्वासची भेदरलेली नजर

न्यारीकडे बघूं लागली. त्याचं आधीच नाजुक तोंड गोरमोरं झालं. तो मुलगा—चिंतू वझे—शेजारी आला. ओठावर दात घट्ट रोवून म्हणाला—'कावे ! तोंड शिवलंय् कुणी तुझं? काय नांव तुझं बोल.'

' बिशू पूरकर '

एवढ्यांत घंटा झाली. चिंतू धावत पुढं निघून गेला. जातांना वाकुल्या दाखवीत गेला. बिशूला ब्रम्हांड आठवलं. ' कावे ' त्याला आजवर कुणीच म्हटलं नव्हतं. त्याच्या अंगावर शहारे आले. त्याच्या डोळ्यांसमोर वर्ग तरंगू लागला. एवढ्यांत त्याच्या दंडाला पाठीमागून येऊन कोणी तरी विळखा घातला. डबडबलेले केविलवाणे डोळे त्यानें मागे वळविले. एक गोल सांवळं तोंड हंसत होतं. तो मुलगा म्हणाला—' होशील तूं माझा सोबती ?'

डोळे पुशीत बिशू म्हणाला— ' होय '

' मी तुला माझा भोंवरा देईन ! हा आत्तांच घे ! '—त्या मुलाच्या फुगलेल्या खिशांतील अनेक वस्तू बाहेर आल्या. गोट्या, सोडावॉटरच्या गोळ्या, पांढऱ्या पेन्सिलींचे तुकडे, खडू वगैरे खजिना होता तो ! त्यांतून भोंवरा काढून त्यानं बिशूच्या कोटांत टाकला. त्याला ओढीत ओढीत तो म्हणाला—

' चल चल ! प्रार्थनेला जायला हवं बरं कां ! कजवाडकर मास्तर फार मारकुंडे आहेत ! सांगून ठेवतो आपलं ! '

थोडं पुढं जाऊन तो मुलगा परत फिरला. बिशूला हंसत म्हणाला—

' मला बबड्या प्रधान म्हणायचं बरं का ! '

बिशूच्या रक्तबंबाळ मनावर फुंकर घातली गेली ! पण प्रार्थनेच्या पटांगणांत जातांना त्याचं हृदय फिरून धडधडूं लागलं....

प्रार्थनेसाठी बिशू रांगेंत उभा झाला !. अबब ! केवढी मोठी रांग होती ती ! दुसरं टोक बिशूला दिसतच नव्हतं. ग्वूप उंच उंच मुलं होती. तिसरी चवथीची असतील !! दोन उंच मुलांमध्ये स्वतःस लपवून तो उभा झाला. आधीच्र तो लहान च्रणीचा. तेव्हां दिसत न दिसत असाच्र होता. ! ते ऽ पहा. कजवाडकर मास्तर आले ! ताडासारखे उंच ! मिशांचे झुलते झुबके, डोईवर पगडी नि हातीं उंचच् उंच पिवळसर अशी काठी !....

मास्तर मोठ्या आवाजांत म्हणाले—'म्हणारे !....

'धन्य धन्य हे नाथ दयामय विश्वाचा तूं स्वा ऽ ऽ मी'

मास्तरांचा आवाज फार जाड अन् घोगरा ; जणूं दूर आकाश गडगडावं तसा. सारी मुलं उंच आवाजांत ओरडूं लागलीं....

'धन्य धन्य हे नाथ दयामय विश्वाचा तूं स्वा ऽ ऽ मी'

एवढ्यांत फाट् फाट् आवाज झाला. गळ्यांत दप्तरपट्टी अडकवून मन्या उशीरा आला होता. वळ उठलेला पाय वर उचलून एकाच पायावर तो टणटणा उडूं लागला....

'का रे ! उशीर का झाला ? आँ ! बिचाऱ्याला जेवायला मिळालं नसेल वेळेवर ? असंच ना ?' कजवाडकर मास्तर त्याचा कान पिळत ओरडूं लागले. 'अरे कां आईबापानां बदनाम करतां रे !! ....

फिरुन एक काठीचा तडाखा खाऊन मन्या रांगेंत ढकलला गेला! किती तरी मुलं फिदी फिदी हसूं लागलीं. विश्वासला दरदरून घाम सुटला.

कजवाडकरांचा फेरा विश्वासच्या बाजूला येऊं लागला. हातांतील काठी पवनचक्कीच्या लांब पंख्यासारखी गरगरत जवळ येऊं लागली.

मास्तर दुसरी ओळ सांगत होते....

‘ सज्जन, रंजन, दुर्जन भंजन भक्तांचा अनुगा ऽ ऽ ऽ मी ’

बिशूच्या छातीत धडधडायला लागलं. त्याच्या मनांत विचार आला—मारकुंडे मास्तर ! कां मारतात मास्तर ? मास्तर जवळ आले तसा तो दोन मुलांच्या मधोमध अधिकच लपला.

अन् जाडजाड बोटांनीं अकस्मांत त्याचा कान सहजा सहजी धरुन पिरगाळला गेला !

‘ हो रांगेंत ! नीट उभं नाही राहतां येत ? ’

मास्तर पुढे निघून गेले; पण बिशू बाळाच्या मनांत आग पेटली. शरमेनं अगदी चोरट्या सारखं झालं त्याला. कुणीतरी खाकरलं. मग दाबलेल्या हंशाची लाट तरंगू लागली—फिदी फिदी फिदी....ए मुलगी ....मुलगी.... !! ’ त्याच्या गालांवर अश्रू ओघळूं लागले !

तापलेल्या लाल लोखंडाचा पहिला ठसा त्याच्या मनावर उमटविला गेला.

: ३ :

चिंतू वझेची आत्या विलायतेस गेली होती. तिनं येतांना एक चित्रांचं पुस्तक चिंतू साठी आणलं होतं. बाळमनाला रिझविणारीं रेखाचित्रं होती त्यांत. कुंचला पाण्यांत बुडवून त्या चित्रांवर फिरविला कीं त्यांत रंग भरला जाई. चिंतूनं चित्रांच पुस्तक आणलं त्या दिवशी वर्गांत मोठी खळबळ उडाली. बंडू भाळे वगैरे त्याच्या बरोबरीच्या आडदांड मंडळीनं बरोबरीच्या अधिकारानं ते पुस्तक पहायला मागितलं. पण चिंतूनं त्यालाही दाद दिली नव्हती. मास्तरांची

पाठ फिरली कीं मोठ्या ऐटीनं बस्त्याखालून ते पुस्तक तो काढी नि कुंचला पाण्यांत बुडवून ते रंग भरूं लागे. त्याच्या सभोंवार खूप गर्दी जमे.

'चिंतू मला नुसता हात लावूं दे ना रे ! चिंतू नुसतं बघूं दे ना रे !!' सारे विनवणी करूं लागले मग चिंतू नाक फुगवून म्हणाला—
'एक पैसा पडेल ! एक पैसा टाका नि एका चित्रांत रंग भरा !!'

हळू हळू त्याच्या समोर एक एक पैसा पडूं लागला. बबड्या बिशूचा लाडका सोबती ! त्यालाही अगदी राहवेना. दुपारच्या सुट्टींत घरुन एक पैसा त्यानं आणला. मग तो चित्रं बघूं लागला. बिशूजवळ पैसा नव्हता. तो पुढच्या तासाचा भूगोल वाचूं लागला. त्याच्या गळ्यांत हात टाकून बबड्या म्हणाला—

'ये बिशू आपण दोघं दोघं बघूं !'

'मी कुठं पैसा दिलाय ! तूं बघ !'

'मी एकटा नाहीं बघणार ! तुझ्याशिवाय नाही बघणार मी !!'

बिशूचा लोभ अनावर झाला होता. सगळ्यांच्या हातीं त्यानं ते चित्रांचं पुस्तक बघितलं होतं ! 'किती सुन्दर चित्रं आहे त्यांत ! आपल्या बापूंना सांगूं आणायला असं सुरेख चित्रांचं बूक ! बापू जातील विलायतेला तेव्हां जरूर आणतील. मग आपण साऱ्यांना दाखवूं. पण त्या चिंत्यासारखे पैसा नाही गोळा करणार. साऱ्यांना खूपच आग्रहानं आपण ते बघूं देऊं. मग सारे कसे खूष होऊन जातील. आपल्या बबड्याला तर मग ते देऊनच टाकूं. तो आपल्याला टाकून कांहीं खात नाहीं. मग ह्यालाही कळेल आपलं मन ! सगळे चित्रांत रंग भरतील ! अगदीं चिंतू सुद्धां ! मग चिंतूला समजेल दोस्तांशी कसं वागावं ते ! त्याला स्वतःची खूप लाज वाटेल.

आपल्या जवळ येऊन तो म्हणेल—'बिशू तूं किती चांगला आहेस, नाहीं तर मी कसा वागलों तुझ्याशी ?' त्याला उमज पडेल. पण आपण त्याला दुःखी नाहीं होऊं देणार! आपण त्याच्या गळ्यांत गळा....'

त्यानं असा कितीतरी विचार केला असता. पण त्याचा लोभ अनावर झाला. लहान लहान हात बुक बघायला शिवशिवूं लागले, बबड्यानं बूक त्याच्या समोर धरलं; ओला ब्रश त्याच्या हातीं देत म्हणाला—'तूं भर रंग!'

बिशू म्हणाला—'नाहीं! तूं भर! पैसा तूं दिलास! नाही कां?' बबड्या त्याच्या गळ्यांत हात टाकून म्हणाला—

'नाहीं तू भर! भरलंच पाहिजेस'

बिशूनं चित्रांचं बूक हाती धरलं. ओला ब्रश रेघेवरून फिरतांच रंग उमटूं लागले! हळूं हळूं सारी आकृति निरनिराळ्या रंगांनीं सुन्दर दिसूं लागली! केवढं नवल! त्याचा बाळ चेहरा आनंदानं नुसता डँवरला! बबड्या त्याच्या चेहऱ्याकडे निरखून बघत होता.... बिशूला रंग भरतांना एक वेगळाच अनुनुभूत आनंद होत होता........!!

शाळा सुटली. मुलं घरोघर निघालीं. आज बबड्याबद्दल बिशूला केवढं प्रेम वाटत होतं. बबड्या प्रधान म्हणजे बड्या माणसाचा मुलगा. गळ्यांत उंची कातडी पाकीट. सुंदरसा कोट नि पांढरी शुभ्र चड्डी. चेहरा तांबूस, गोड नि हंसरा! बिशूला हा सोबती फार आवडला होता. कोणाशी कधी भांडाभांडी नाहीं कीं मारामारी नाहीं. स्वभावाचा मऊ, त्याचं राहणंहि बिशूच्या शेजारीं—पानदरि-ब्यांतील मोठ्या वाड्यांत. बबड्याचे वडील म्हणजे श्रीमंत असामी!

मालगुजारच्च ते ! आतांशा बिशू त्यांचेकडे खेळायलाहि जाऊं लागला होता. आज बिशू नि बबड्या बरोबर घरीं चालले होते. दोघांचेहि चेहरे आनंदानं कसे फुलले होते !

‘ बबड्या ! हा चिंत्या वझे असा मारकुंडा कां आहे रे ? ’

‘ काय जणूं ! ’

‘ मला उगीचच्च छळावसं कां वाटतं त्याला कुणास ठाऊक ? ’

‘ तो वाईटच आहे मुळीं ! चांगली साधी मुलं बघितलीं कीं असाच छळतो तो ! आपण तर भैया त्याच्या वाटेला नाहीं जात ! ‘ दादा ’ आहे ना वर्गाचा ! त्याचे वडील आहेत पोलीस खात्यांत म्हणून फारच अकडतो लेकाचा ! ’

‘ मला तर फार फार भिती वाटते त्याची ! ’

पाठीमागून कॉलर खस्सकन ओढली गेली. समोर चिंतू वझे उभा. बिशूच्या हातापायांत गोळे आले !

‘ साल्या, माझ्या चित्राच्या पुस्तकाला कां हात लावला होतास ? कोण भरेल आमचं नुकसान ? उद्या दोन पैसे आणा बच्चमजी ! नाहींतर चटणी करून टाकीन तुमची !.... ’

‘ मी दिलं होतं त्याला पुस्तक....! ’ बबड्या म्हणाला.

‘ पण पैसे कुठं दिले यानं ? बऱ्या बोलानं आणा गुरू पैसे नाहीं तर बघून घेईन.... ’

बिशूचे डोळे पाण्यानं भरून आले.

‘ पण मी पैसे आणू तरी कोठून रे ! बाबांना काय सांगू ? ’

‘ मग कशाला लावलास हात माझ्या पुस्तकाला ? उद्या पैसे आण नाहीं तर........ ’

अन एकाएकी चिंतूनं आडदांडपणानं बिशूच्या डोक्यावर

जोरानं टपली दिली. बिशूची टोपी डोळ्यांपर्यंत सरकून आली. शरमेनं नि दुःखानं त्याचा चेहरा लाल झाला. बबड्याहि भ्याला होता. चिंतूपासून बिशूला वाचवूं शकलो नाहीं म्हणून शरमिंदा झाला होता. कोणी कुणाकडे बघेना !!

पैसा ! पैसा आणायचा कोठून ? बिशूला काळजी लागली.

## :४:

दुरून घर दिसलं. पण बिशूचे पाय जड झाले होते. त्याच्या मनावर कुणी ओझं ठेवलं होतं. पानदरीब्यांतील पडक्या गल्लींतल्यां चिटणीसांच्या जुन्या वाड्यांत त्याच घर. जुना वाडा तो. मधोमध फरसबंधीचं अंधारं गुडुप्प अंगण. त्याच्या आसपास जुन्या नकस कामाचे काळे कुळकुळीत खांब. पलिकडच्या भिंतीवरचा चुना केव्हांच झडून निघालेला. भिंतीच्या साऱ्या विटा गडद अंधारांत अंधुक वाटत होत्या. त्या शेजारच्या बारक्या जिन्यांतून वर जायचं. वरच्या मजल्यावर उजवीकडे बारक्या महिरापींच्या खिडक्या असलेली खोली. डावीकडे स्वयंपाक घर. या दोनच खोल्यांत कुटुंब राहत. बैठकीच्या खोलींत भिंतीवरच्या खुंटाळ्यावर मळकट कपडे टांगलेले. एका खुंटाळ्यावर कपड्यांची भली मोठी थाप; धोतराचा बोळा खालीं गळून पडलेला. समोर भिंतीवर मुकटा अडकविलेला. मुकट्याच्या खालीं भिंतीशी जुना चौरंग. चौरंगावर मधोमध एका फुलपात्रांत शंकराचा भस्मचर्चित बाण. बाणावर शिवाचं आडवं गंध आणि खालीं ‘ राम ’ हीं अक्षरें गंधानें लिहिलेली. बाणाच्या आसपास गाय, लंगडा बाळकृष्ण, अन्नपूर्णा वगैरे देवीदेवतांची रांग.

सर्वांना लालपिवळे कपडे घातलेले; फुलं वाहिलेलीं. पलिकडच्या कोपऱ्यांत एकावर एक दोन ट्रंका. खालची ट्रंक जरा उंच आणि मोठ्या प्रकारची. तीवर गंधाचे दोन फराटे. ते फराटे बघून धांवत्या माणसांचा भास व्हावा. वरच्या ट्रंकेचा कोंडा निघाला होता. भिंतींशी वळकट्या आडव्या टेकून ठेवलेल्या नि संध्याकाळ झाल्यामुळें खोली अधिक विषण्ण दिसत होती.

बिशू पाय न वाजवतां चोरट्यासारखा वर गेला. ' बऱ्या बोलानं पैसे आणा बच्चमजी ! ' हे शब्द त्याच्या छातींत खड्यासारखें खुपत होते. तो आंत गेला. हात धुतले नाहीं की पाय धुतले नाहीं. वळकटीस टेकून खिडकीकडे बघत स्वस्थ बसला. खिडकींतून बंगल्यांच्या जुनाट वाड्याचं अंगण दिसत होतं. त्यांतील केळीचीं पानं खिडकींतून दूरवर डोलतांना दिसत होतीं... ती संथ हालत होतीं. दिशेची लाली सरत काळवंडत होती........

रमाबाई आंत आल्या. हातांत बारीक वात केलेली चिमणी होती. त्यांचं बिशूकडे लक्ष गेलं आणि त्या जराशा दचकल्याच—

' हे रे काय ? केव्हांचा आलास तूं ? अन् हातपाय न धूतां ओंगळवाणा बसून राहायलास........ '

' मला बरं वाटत नाहीं आज........ '

रमाबाई जवळ आल्या. त्याच्या गालांवर त्यांनीं बोटं टेकली. मग म्हणाल्या—' छेः उगीच कांहीतरी........ऊठ बघूं, तोंड धू.... ' त्यांचं लक्ष बिशूच्या तोंडाकडे गेलं नि त्यांचं मन अवचित व्याकूळ झालं. बिशूचा बाळ चेहरा ओळखीचा होता. हा चिंताग्रस्त चेहरा त्यांना कुठं माहीत होता ? त्यांचं मन कचरलं.

' ऊठ बाळ ! काय झालं एवढं आज ? बोललं का कुणी तुला ?

जा शहाणा ना तूं ! झटकन् हातपाय धुवून ये........'

बिशू गेला. रमाबाई दिव्याच्या वातीकडे टक लावून बघूं लागल्या कसा मोठ्या माणसासारखा विचार करतोय हा पोर ? कसं होईल याचं ? जणूं एका अरिष्टाची लांब छाया पसरत त्यांच्या मनाला भेडसावूं लागली. त्या आंत गेल्या. निरांजन लावून त्यांनी बाहेर आणलं. देवापुढं ठेवलं तेव्हां शंकराचा बाण लखलखूं लागला. त्यांनी डोळे मिटून हात जोडले........

ते भले मोठे कामगारांच्या बायासारखे हात ! सांवळया पण बितळ कपाळावरचा प्रकाश नि बारीक सुरेख नाकपुडीवर किंचित् भासमान होणारा भावनेचा कंप .... !!

एवढ्यांत जिन्यावर जोडे वाजले. जिना कराकरा बोलूं लागला. रमाबाई भानावर आल्या. लुगड्याचा पदर कंबरेभोवतीं नीट खोंचला. चिमणीची वात नीट वर केली. भिंतीच्या एका खिळ्यांवर ती टांगून ठेवली. तेवढ्यांत बापू वर आले ....

'हे काय ? कुठं गेली पोरं ?' टोपी खुंटीवर काढून ठेवीत नि उपरण्यांनं कपाळावरचा घाम पुशीत बापूंनी विचारलं. रमाबाई क्षणार्ध जणूं गप्प बसल्या.

'मी काय विचारलं ? ....'

'मधू गेलाय् पीठ दळून आणायला चक्कीवर नि सुभा ....'

'अन् बिशू ? ....'

'तो तोंड धुतोय् .... !'

बापूंना वाटलं रमाबाई बळेच बोलताहेत. त्यांच्या मनांत खोलवर एक तरंग पोचला. अंतर्मन ओळखीच्या स्पर्शानं चाळवलं

गेलं

‘ कां बरं ? ’ बापूंनी आश्चर्यानं विचारलं

‘ कुठं काय ? ’ रमाबाईनीं बापूंकडे नीट पाहिलं. बापूंचा गोरा गोल चेहरा, विरळ भिवया नि किंचित छप्परदार मिशा ! आर्तीच्या द्रवानं लुकलुकते डोळे, पण कपाळ मात्र चिंतारेषांनीं भरलेलं. या चेहऱ्याच्या झिरझिरीत पडद्यामागे भासणारी बापूंची पुसट निष्कपट मनोमुद्रा !!

त्या म्हणाल्या— ‘कुठं ? कांही तर नाहीं ! ’ आतां रमाबाईंच्या मनांतील ती गूढ छाया बापूंच्याहि मनांत शिरली. त्यांचा चेहरा एकाएकीं गंभीर झाला नि विस्कटून गेला ! पण क्षणभरांत त्यांची मुद्रा थेट रोजच्या सारखी हंसतमुख झाली. ते जवळ जाऊन म्हणाले– ‘ वेडी आहेस झालं ! ’

:५:

रात्रीं तासभर अभ्यास करायला मुलं बसलीं. मधुकर हा बिशूचा वडील भाऊ–त्याच्यापेक्षा तीन वर्षे मोठा. बिशूला मांडीवर घेऊन लहानपणीं तो नेहमी कविता म्हणत असे. बिशूच्या तो शेजारी बसलेला.

तो भली मोठीं मोठीं पुस्तकं वाचतो.तो आतां कोणतें तरी पुस्तक वाचण्यांत दंग झालेला. तिकडे आई उष्टं खरकटें करते. सुमा शेजारी पाटावर बसायची नि गोड गाणीं म्हणायची. स्वयंपाक घरांतून तिचंच गाणं ऐकूं येत आहे:—

‘ मुरली तुझी गोड कृष्णा वन्शी तुझी गोड रे
यमुनेच्या पाण्यां जातां तैशी मुरली वाजवितां
तुझ्या नादें धेनु भुलल्या, गोपि झाल्या रोड रे ! ’

चिमणीच्या प्रकाशांत पाटीवर लिहिलेलं गणित दिसेनासं व्हायचं. सुमाचं गाणं मनावर अंगाई गीत गायचं. निजेचीं फुलं अमृतांत घोळवून पापण्यांवर त्यांचा चंदन स्पर्श व्हायचा नि डोळे झो ऽ ऽ पेनें जड व्हायचे. आईचं काम संपेपावतर सुमाच्या गळ्यांतून निघालेलं तें गोड गाणं असंच....

शेजारी बापू शतपावली करताहेत. धोतर जेमतेम गुढघ्याखाली आलेलं. गोऱ्या पोटऱ्या नि लाल चुटुक पाय. ते खोलीच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत फिरत असलेले. पोथी वाचून झाली आतां. खालच्या आवाजांत श्लोक म्हणताहेतः—

मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम् !
यत् कृपा तमहं वंदे परमानन्द माधवम् ॥

या श्लोकांचा अर्थ बापूंनीं बिशूला कितीतरी वेळा सांगितला आहे. मुक्याला देखील बोलता येतं; पांगळ्या माणसास देखील पर्वत ओलांडता येतो ! पण केंव्हा ? देवाची कृपा झाली तर ! देवाची कृपा केंव्हा होते ? चांगलं वागण्यानं, खरं बोलण्यानं, भावंडावर ममता केल्यानं, आईवडिलांचं म्हणणं ऐकल्यानं ! ज्यांचं मन कनवाळू असतं तो देवाला फार आवडतो....

मूकं करोति वाचालम्

बापूंची शतपावली चालू आहे. हे पाय गेले शेजारुन ! पाटीवर लिहिलेलं गणित सोडवायचं आहे बिशूला. रामा बाजारांत गेला. त्याला चार रुपयांचे आम्बे विकत घ्यायचे होते. बाजारांत रुपायला शंभर आंबे मिळतात, तर रामा किती आंबे घरीं नेईल ? रामा आंबेवाल्याला पैसे देतो. पण आंबेवाला तर दुसऱ्यांनाच मोजून देतोय्. रामू आपला उभाच, वाट बघत !! तो काकुळतीनं

म्हणतो—' आंबेवाले दादा ! आंबे दे ना !

' कशाचे आंबे ? कुठं आहेत पैसे ? कधीं दिलेस मला ?....

बिचारा रामू मुळुमुळू रडतोय. आईला काय सांगेल ? आईकडून पैसे कसा मागेल ? पण दुकानवाला नाहीं करायचा असं ! तो का चिंतू वझे.... !!

' पैसा उद्या आणा बच्चमजी ! ....'

चित्या ! चिंतरला ! उगीचंच पैसे मागतो. पाटीवर चिंतू वझे दिसूं लागला .स्वतःच्या मुठीनं रागारागानं बिशू त्याला मारुं लागला. त्याच्या नाकांतून रक्त....

बिशूनं घाबऱ्या घाबऱ्या इकडे तिकडे बघितलं.हे बापूंचे लाल पाय शेजारुन गेले !! सुमीचं गाणं चालूं आहे—

तुझ्या ना ऽ ऽ दें धेनु भुलल्या गोपि झाल्या रोड रे ऽ !

उद्या शाळेंत जावं लागेल.चितूचा पैसा..उद्या नाहीं जाऊं शाळेंत, आईबरोबर चौघडीवर बसावं. तिला शिवलीलामृत वाचून दाखवावं. नाही तर क्षिप्रेवर सुमीबरोबर नि तिच्या मैत्रिणींबरोबर हिंडायला जावं...

तिच्या मैत्रिणी आपल्याला खेळायला घेतच नाहींत ! म्हणतात.... पोरींत पोरगा लांबोडा ! भाजून खातो कोंबडा....कीं मधुदादाला सांगावं ! पण तो आपणाला हंसेल. त्याचे मोठे मोठे मित्र आहेत. ते खूपच फिरतात. आपण लहान म्हणून त्यांच्याकरता पाणी नेऊन द्यावं लागतं !

बिशू एकदम दचकला. पाठीवर मायेचे परिचित हात टेकले गेले. बिशूच्या खांद्यावरुन पाटीकडे बघूं लागले. बापूंच्या तोंडावरहि कंदीलाचा प्रकाश पडला. ते कौतुकानं हंसत होते. त्यांचे डोळे लकाकत होते....

' काय चाललंय बिशू भैय्याचं ?.... '

बिशू बापूंकडे बघत राहिला. त्याचे डोळे विस्फारले गेले. त्याचा चेहरा बोलका बनला तो एकदम म्हणाला—

' बापू ! राम बाजारांत गेला. दुकानदाराला चार रुपये दिले. पण दुकानदारानं त्याला आंबे मात्र नै दिले ! मग काय करावं बापू ? '

बापू खूपच हंसायला लागले. हंसता हंसता म्हणाले—' कोणी काय काय करायचं रे ?'

' रामूनं काय करायचं ? '

' एवढासा चिरमुटला ! अन् गोष्टीं बघा कश्या मोठ्या माणासा-सारखा करतोय्....बरं बरं आधी ते गणीत तर सोडवा बेटा !.... '

बिशूला गणितच तर सोडवायचंय्. तो बापूंच्या अंगाला खेटूं लागला.

' बापू सांगाना, खरंच सांगाना.... ' बिशूचा आवाज एका-एकी केविलवाणा झाल्याचा त्यांना भास झाला.

बापू हंसता हंसता एकदम गंभीर झाले. त्यांच्या कपाळावर एकदम सुरकुत्यांचं जाळं पसरलं. ते बिशूकडे पहिल्या प्रथम बघूं लागले !....

बापू कांहींच बोलले नाहीत. गप बसले. मग म्हणाले—
'लहान बाळं तुम्ही ! कश्या सुचतात रे तुम्हाला या गोष्टी? अरे! रामूला आंबेवाल्यानं फसवलं तरी वर देव आहे ना ! तो घेईल पाहून, त्याला सारं काहीं दिसत असतं बरं. मोठा न्यायी आहे तो. त दुकानदाराला देईल शिक्षा....'

बापूंची शतपावली संपली. ते देवासमोर गेले. त्यांनी कानाला

बोटें लावली. डोळे मिटले. म्हणूं लागले........

'अनायासेन मरणम् ! विना दैनेन्य जीवनम्! देहिमे कृपया शंभोऽ'

' चिंतू वझेलाहि देव शिक्षा देणार आहे का? बापू म्हणतात तसं........पण........'

बिशू पाटी दूर सारून स्वयंपाक घरांत गेला.

रमाबाई फुलपात्रं घासत होत्या. त्यांचा हात तसाच थबकला. सुमीचं गाणं थांबलं.

' ए आई! पाणी दे ग प्यायला....'

स्वतःची कामं स्वतः करायची अशी सर्वांना रमाबाईंची शिकवण, रमाबाईंचे धडे साऱ्यांना प्रमाण; अगदीं बापूंना देखील. रमाबाई चकित होऊन बिशूकडे बघत राहिल्या.

' हे काय रे! तुला हात नाहींत का पाणी घ्यायला........काय विचार करतोस एवढा?'

' गोष्ट विचारूं का ग तुला मी?

' विचार ' रमाबाईंच्या तोंडावर पुसट आल्हाद पसरला.

' रामू बाजारांत गेला. दुकानदाराला पैसे दिले....पण....रामूला त्यानं आंबे नाहीं दिले .... मग कसं काय करायचं ग?' बिशूच्या गंभीर तोंडाकडं बघून सुमी खुसुखुसू हंसू लागली. सुमी वडिलांवर गेलेली. गोरपान गोल तोंड, चित्रासारखे नाकडोळे!

रमाबाई नेहमी म्हणत ' सुमे! एवढी मोठी झालीस तरी बाई तुझं शिक्षणांत लक्ष नसतं ....नुसतं रुपानं नाही चालत बरं बाई.... शिक्षणाला पहातात अलीकडे ....हा बिशू टाकील तुला मागे एकादे वेळ.'

सुमाची बिशूवर मोठी माया. बिशूचा प्रश्न ऐकून ती हसूं लागली.

' आई, बघ सुमा हंसते आहे ! सांग ना ग मला ? ' तो रमाबाईला खेटून उभा राहिला. थेट तेच रमाबाईचं उंच नाक नि फुगीरपणाकडे कल नसलेले गाल.

रमाबाई कसलंसं फडकं उचलीत म्हणाल्या—

' तुला कशाला हव्या रे नसत्या उठाठेवी ? संपला का अभ्यास तुझा ? मास्तरांनीं दिलेलीं गणितं सोडविलींत ? .... '

बिशूला आईचा धाकहि कांहीं कमी नव्हता. तो परत फिरला नि दारांत घुटमळला. पण एकदम परत फिरून केविलवाण्या आवाजांत तो म्हणाला — ' ए आई ! सांग ना ! '

फिरून रमाबाई किंचित् चरकल्या. त्याला जवळ ओढलं. त्याला कुरवाळीत त्या म्हणाल्या—

'वेडा आहेस झालं. बाळ' माणसानं कधींहि कुणाला फसवूं नये नि फसवून घेऊं नये. आंबेवाल्याला आधीं पैसे न देतां आंबे मोजून घेऊन मग पैसे दिले असते तर ? .... रामूचीच चूक नाहीं का ? त्या दुकानदाराला कधीहि कोणाला फसवायची हिम्मत नाहीं होऊं ....'

' काय चालल्या आहेत मायलेकांच्या गोष्टी .... '

साऱ्यांनीं दचकून पाहिलं. बापू दारांत उभे हंसत होते. बिशूचेहि डोळे बापूंकडे वळले.

' पण बापू तर म्हणतात. .... '

तो आळीपाळीनं आई व बापूंकडे बघूं लागला.

: ६ :

झाकपाक झाली. साऱ्यांचे बिछाने पसरले गेलें. एकाशेजारी एक

अंथरुणं घातलीं. फक्त बापूंच्या बिछान्यास तेवढी कापूस गोळा झालेली गादी होती. बाकीचे बिछाने म्हणजे घरांतली चिरगुटं जुळवून पसरलेल्या चौघडया. चिमणी शेजारी दुलई लपेटून मधू वाचीत होता. त्यामुळं घरांत अंधार पसरलेला. सगळीकडे शांत झालं होतं. बापू नि रमाबाई हलक्या स्वरांत बोलत होते. मुमी नि बिशू केव्हांच झोपी गेली. ....

‘ झोपला एकदाचा बिशू ! कसले कसले प्रश्न विचारतो पहा ! ’ —बापू कौतुकानं म्हणाले.

‘ मला तर बाई भीति वाटते त्याची .... फार गुणी आहे तो हो ! पण एवढा विचार करणं बरं का ह्या वयांत ? ’

‘ वेडी आहेस झालं !! ’ —बापू हंसले.

पण बिशूला झोप कुठं लागलीय ? तो तर डोळे मिटून गपचिप पडला आहे. सारं कांहीं ऐकतो आहे !!

मग सामसूम झालं. कुणी कुणांशी बोललं नाहीं. बाहेर टिपूर चांदण पडलं होतं. ‘ भिकाऱ्याला दे ग ऽ माय ! ’ असा ठराविक आवाज काढीत कुणीसं निघून गेलं. मधूनं वाचतां वाचतां कूस बदलली; तसा आडोसा निघून चिमणीचा प्रकाश खोलींत पसरला.

‘ काय वाचतोस रे ? अभ्यासाचं नाहीं दिसत पुस्तक. कुणास माहित कसं होणार तुमचं ! ’

‘ हं. ऊं ऽ ऽ थांबा जरा ’ —मधूनं कूस बदलली. तो फिरून वाचूं लागला. रमाबाईंना ते आवडलं नाहीं.

‘ मधू ! उठ बघूं ! विझव ती चिमणी. विनाकारण तेल नाहीं जाळायचं. एवढा मोठा झाला; पण स्वतःचं नफा नुकसान समजत असेल तर शपथ .... ’

मधू उठला. फूः करून चिमणी विझवली. अंगावरचं पांघरूण दूर लोटलं.

'जेव्हां पहाल तेव्हां मला घालून पाडून बोलत असतेस !

कधीं सुद्धा निश्चिंतीनं वाचूं द्यायचं नाहीं !' तो भराभर उठला. मानेला एक झटका दिला. त्याचे लांब केस कपाळावर आले.

'अरे कुठे चाललास एवढ्या रात्रीं बाबा ? थंडी लागेल.... !' —रमाबाई चिंतातुर आवाजांत म्हणाल्या.

'हो ना. आतां थंडी अवश्य लागेल. तेंच रात्रीं सुतारीचं काम करून चार आणे मिळणार असते तर नसती लागली थंडी; खरं ना ?'

मधू धाड्धाड् जिना उतरून गेला. खालचं मोठं दार खाडकन् आवाज करीत उघडलं गेलं नि दूर जाणाऱ्या पावलांचा आवाजहि विरून गेला.

खोलींत शांतता पसरली. बिशूनं चळवळ करून कुशी बदलली. 'आईला कसं फाड् फाड् बोलला दादा'

शेगडींत दूध तापत होतं. उलथ्यानं कोळसे हलवले तसे मन्द पडलेले निखारे लाललाल लखलखूं लागले. रमाबाईंच्या तोंडावर त्याची तांबूस छटा पसरलीं त्यांचे पाण्यांनं डबडबलेले डोळे लकलकले. बापू हळूंच म्हणाले—

'वेडा आहे झालं. नको वाईट वाटून घेऊस. लहान मुलं ! त्यांचं का वाईट वाटून घ्यायचं एवढं ?'

'नाहीं ऽऽ ! कुठं वाईट वाटून घेतेय् ? पण तुम्हीं एवढं खपतां तरी पुरं पडत नाही. पोराबाळांसाठी खस्ता खाते ; पण तुमच्यासाठीं कपभर दूध नाही मिळत ! आशा काय ? तर पोरं शिकतील, सवरतील नि सुख देतील ! याच आशेवर.... अन् पोरांचे हे असं.'

रमाबाईंचा उसासा बिशूला स्पष्ट ऐकूं आला. आईच्या गळ्यांत मिठी मारावीशी त्याला वाटूं लागली. बापू उदास हंसले.

‘ खरंच, तुझी काय बरं चूक ! माझ्यासारख्या कफल्लकाच्या पदरीं तुला कशाला बांधली अण्णांनीं ? नुसतं एका अंगणांत लहानपणीं खेळत होतो म्हणून. वयाच्या आठव्या वर्षीच नको होती जन्माची गांठ बांधायला....आज तुझ्यासारख्या साक्षात् लक्ष्मीला ....’

‘ काय बोलायचं हे ? माझी तपश्चर्या मोठी म्हणून तुम्ही मला मिळालात. पण तुमची सेवा करायचं पुण्य नाहीं.

‘बांधून आणलं मी मेलीनं .... म्हणून वाईट ....’ –रमाबाईंच्या डोळ्यांतून अश्रू झरूं लागले .... !!

बापू म्हणाले—‘ हळू हळू ! असं काय करतेस वेड्यासारखं ! पोरं उठतील ना ? काय वाटेल त्यांना ! कां ऽ हीं काळजी करूं नकोस. ते शंकरजी बघितलेत ना ? सारं नीट करतील ते. त्यांना भक्तांची काळजी असते.’

‘ कशी नको करूं बरं काळजी ? सुमाचं लगीन करावं लागेल. मोठी गोड पोरगीय बरं ती ! मला सदोदित तोंडी लावायला असते....चांगल्या स्थळीं नको का पडायला ? मधूला नको का आतां कळायला ?....’

‘ हं !!’ बापूंचा स्वर एकदम चिंताकातर झाला....!! बिशूला हळूं हळूं गुंगी येऊ लागली.

## :७:

रागानं मधू बाहेर पडला. रात्रीचे नऊ वाजले होते. गल्ल्यांतून पिठासारखं चांदणं पडलं होतं. त्यानं पानदरिब्याच्या गल्ल्या मागं

टाकल्या. क्षिप्रेकडे जाणाऱ्या प्रशस्त दगडी उतारावरून हळूं हळूं चालूं लागला. त्याच्या चालींत एक प्रकारची मस्ती होती. टोपी बाहेर केसाचं झुलुप हलत होतं. एका मंदिराच्या आवारांत तो आला. त्याच्या मागेच अखाडा होता. तिथं अजुन विजेची बत्ती जळत होती. तो अखाड्यांत शिरला. न बोलतां त्यानं आपला नेहरु शर्ट काढला. सिंगल बारवर त्यानं ग्रेंडसर्कल गर्रकन् लावला नि समोरच्या काथ्याच्या गादीवर अलगद् उभा झाला ! सगळे व्यायामपटु त्याच्याकडे नुसते बघत राहिले.

पौर्णिमेच्या तिरप्या रुपेरी झोतांनीं अखाड्याच्या पडक्या भिंती न्हाऊन निघाल्या होत्या. गंजीफ्राकाची बटनें लावीत तो बेफिकिरपणानं हिंदींत म्हणाला—

'अच्छा गुरु, चल दिये !! '

गुरुजी हे सारं पहात होते. त्यांनी त्याची पाठ थोपटली. ते कौतुकानं म्हणाले—

' शाबास ! आज तू 'लालटेन' ला चांगली मात दिलीस.' जरासं हंसून ते गप बसले. मधुला एकदम नम्र व्हावसं वाटलं. तो म्हणाला—

' तुमचा आशिर्वाद आहेना गुरुजी ! नाहींतर लालटेन समोर मी काय चीज होतो ?' गुरुजा गद्गद् कंठानं म्हणाले—

' आज तर तूं माझं नांव राखलंस बेटा ! जी विद्या मिळवण्यासाठी मी आयुष्यभर अखाडा घिसला ती मिळवण्यास तूंच लायक निघालास बेटा !....'

अखाड्यांत शांतता पसरली. नारायण आरशासमोर जोडी फिरवीत होता. त्याचे हात एकाएकी थांबले. आतांच हजार बैठका लावून घामानं निथळत गोपाळ उभा होता. तोहि चकित होऊन बघूं

लागला. कारण गुरुजींच्या या शब्दांचं मोल इरेकास माहीत होतं.

मधूचं हृदय कृतज्ञतेनं भरुन आलं. गुरुजींना आपणाविषयीं एवढं वाटत असेल हे त्याच्या स्वप्नींहि नव्हतं. गुरुजींपुढं गुडघे टेकावे नि त्यांचा आशिर्वाद घ्यावा असं त्याला वाटलं. मग तो मोठ्या आरशा-समोर जाऊन उभा झाला. स्वतःचं पीळदार शरीर निरखूं लागला.

नारायण फिरुन जोडी फिरवूं लागला नि हिन्दींतच म्हणाला—

'क्यों पेहलवान, कल तो आ रहे हो न ?'

विश्वास स्वतःच्या शरीराकडे निरखीतच म्हणाला—

'जरुर यार ! अरे उद्यां शनिवार ना ! सिद्दू इलवायाकडून येणाऱ्या प्रसादाची आठवण राहीलच्‌ !'

त्यानं अखाड्याची लाल माती झटकल्यासारखी केली. शर्ट घातला एकवार स्वतःची पीळदार आकृति आरशांत न्याहाळली. टोपी घातली नि बेफिकीर पैलवानी ढंगानं म्हणाला—

'अच्छा ! जय, जय ! कल मिलेंगे !!'

पौर्णिमेच्या रुपेरी झोतांनीं गल्लीच्या भिंती उजळून निघाल्या. समोर पडक्या बुरुजाचे ढीग दिसत होते; त्यावर वाळक्या गवताचे खुंट उभे होते. या बुरुजाच्या पलीकडे कोतवाली होती. तिथं साडे-नवाचा बुगुल वाजत होता. बुरुजाच्या पलीकडे चार मजली दगडी भिंतीचा वाडा होता. त्याच्या छायेंत पलीकडली गल्ली अंधारांत लपली होती. दूरवर वळणाशी दिव्याचा एक खांब होता. त्याचा पिंगट प्रकाश जमिनीवर पेंगत होता. तिथंच तीन चार लठ्ठ कुत्रीं अंगाची मुटकुळी करुन झोपली होतीं नि पलीकडेच खरकट्या पत्रावळींच्या चळती पडल्या होत्या....

घरीं जायची अगदी जवळची वाट याच गल्लींतून होती. त्याचें

पाय घुटमळले. लगेच त्याचे पाय विरुद्ध दिशेला वळले.

अखाड्याच्या पायऱ्या उतरुन तो मंदिराच्या प्रशस्त आवारांत आला नि समोरच्या दगडी फरशीच्या पटांगणांतून भरभर चालत दाराशी आला. समोरच्या लहानशा मंदिराच्या डौलदार घुमटाकडे बघत राहिला. रुपेरी चांदण्यांत तो घुमट नुसता लखलखत होता. आंतल्या आनंदोर्मींनीं त्याचे डोळे गहिरे होऊं लागले. फिरुन बुगुलचा आवाज मंदिरामंदिरातून दुमदुमला. तो पुटपुटला—
' दहा ! आई वाट बघत असेल !! '

पायऱ्या उतरून खाली येतांच तो खिळून उभा झाला. समोरच्या विशाल वाळवंटांत पौर्णिमेची अतनु चमेली पसरलेली होती. रविबाबूंची ओळ तो गुणगुणूं लागला—

' पूर्णिमाय देहहीन चमेलीर लावण्य विकाशे !! .... '

क्षितीजाच्या कडेशी वृक्षांची दाट काळी रांग दिसत होती. मैदानाच्या मधोमध बैलगाडीची सखोल वाट वाकडीं तिकडीं वळणें घेत दूरवर अंधुक दिसत होती. हवेची गार चंदनी झुलुक त्याच्या अंगाशी बिलगली . तो संथ संथ पावलें टाकीत पुढे पुढे जाऊं लागला. त्यानं टोपी काढून हातांत घेतांच त्याचे लांब लांब केस हवेमुळें विस्कळून रुळूं लागले. त्याचा नेहरू शर्ट फडफडूं लागला. मनांत आनंद उसळूं लागला. तो डुलत डुलत चालला होता ....

मैदानाच्या टोकांशी येतांच तो स्तब्ध उभा झाला. उताराखाली दूरवर धनुष्याकार क्षिप्रेचा विस्तीर्ण प्रवाह शांत पसरलेला होता. काठाकाठानें दोन्हीं बाजूस मंदिर आणि घाट शुभ्र चांदण्यांत गूढ नि अंधुक भासत होते. दृश्याकडे धुंद नजरेनं तो बघत होता. साऱ्या सृष्टिसौंदर्याचे रसमत्त चैतन्य त्याच्या अणुअणूंत विव्हलतेनें

सळसळूं लागलें.

उतारावरून हळुंहळूं तो खाली उतरूं लागला, आपल्या संपूर्ण विकसित शरीरास ताठ राखीत ! त्याला वाटत होतं जणूं पृथ्वी त्याच्या पायाखाली दबून जात आहे; विशाल छातीमुळे उन्मुक्त वायू अडवून धरला जात आहे; एक बाण तीव्र स्वयंभू गतीनं वातावरणांस भेदून अनंतांत शिरत आहे ....

तो नदीतीरीं पोचला. दूर उदासी महंताच्या अखाड्यांत आरती होत होती. शंख फुंकला जात होता. घाटावर अजून एकादा दुसरा गोसावी बसलेला दिसत होता. तो नदीच्या काठाकाठानं चालूं लागला. चाफ्यांच्या फुलांनी गच्च भरलेलं एक झाड तो गदगदा हालवूं लागला. खालीं शुभ्र फुलांचा खच पडला. त्यानं ती ओंजळींत गोळा केली. त्यांचा वास घेतला नि एक एक करून तो तीं प्रवाहांत सोडूं लागला ........

गर्द झाडींच्या सघन छायांतून तो जाऊं लागला. आपण एका स्वप्नांतच चालत आहोत; एक अत्यंत वेगवान प्रवाह आपल्या गात्रागात्रांतून वहात आहे असं त्याला वाटूं लागलं. एका बलिष्ठ लांडग्याची अस्थिरता त्याला चंचल करूं लागली. तो धावूं लागला. कांहीतरी वेड्यासारखं आपण करीत आहोत हे जाणवूनहि तो धांवत सुटला. झाडांच्या प्रचंड बुंध्यांच्या वाळक्या सालींचे खवले खवले पानांतून झिरपणाऱ्या चांदण्यांत उठून दिसत होते, जणूं सांपाच्या कांचळीचे खवलेच ! धांवता धांवता त्याचे पाय खड्ड्यांत धसफसत होते. झाडांच्या सालीवर खरचटून त्याच्या हातावर घट्ट रक्ताचा एक टपोर थेंब सरकत होता. तिकडं त्याचं लक्षच नव्हतं. आपल्या बलिष्ठ हातांनीं वेलींना तोडीत तो धांवत होता. अलीकडे

कोल्हेकुई ऐकूं येत होती. दूरवर कांहीं सरसरत जात होतं. पण त्याच्या मुठींत हरक्यूलीसचं बळ होतं. तो अनेक सर्पांना मुठींत चिरडून मारून टाकण्यास अधीर झालेला होता ....

तो हलुहळू नदीच्या काठाशीं आला. वळणाशी दूरवर घाट अंधुक दिसत होते.

समाजापासून, मानवी संपर्कापासून दूरवर आपण आलो आहोत असं त्याला वाटायला लागलं. या गूढ छायेंत, या देहहीन पौर्णिमेच्या तनिमेंत एक गूढ विव्हल हांक आपणास ऐकायला येते आहे असा त्याला भास झाला. समोरच्या निसर्गलावण्यासमोर स्वतःची स्वतंत्र प्रभावी सत्ता तो अनुभवूं लागला !!

तो स्वतःवरच मुग्ध झाला होता. त्यांच्या शरीराच्या कणांकणांतून बंदिस्त समुद्राचा आकांत उसळूं लगला. स्वतंत्र, मुक्त व्हावेसें त्याला वाटूं लागले· त्यानें काळजीपूर्वक दूरवर निरखून पाहिले नि स्वतःच्या याच वृत्तीवर तो चिडला. हळूं हळूं एक एक वस्त्र त्याच्या पायाशी पडूं लागले नि समोर जमीनीवर स्वतःच्या नग्न शरीराची डौलदार छाया तो बघूं लागला...

एका ग्रीक मूर्तीप्रमाणे प्रमाणबद्ध अवयव असल्याच्या जाणीवेने त्याचा एरवी उदास चेहरा प्रफुल्ल झाला होता. त्याचे डोळे लखलखत होते. एका मूर्तीप्रमाणंच स्वतःची रुंद छाती बाहेर काढुन एक पाय पुढें नि एक पाय मागे टाकून तो उभा होता. सिंहासारखी त्याचीहि कंबर कृश होती. मागच्या पायाच्या पोटरीचे स्नायू रुपेरी चांदण्यांत चमकत होते. शरीरांतील समुद्राच्या तुफानी लाटा कणाकणांत उसळत होत्या.

तें जंगल ! ती नदी ! नदीच्या पोटांत कस्यारीप्रमाण शिरलेला

वाळूचा तो रुपेरी निमुळता सुळका ! ती शुभ्र पौर्णिमा नि असा हा संपूर्ण विकसित हरक्यूलीस........आपला मधू !!

दुसऱ्या क्षणीं त्यानं नदीच्या डोहांत विलक्षण वेगानं उडी घेतली.

प्रशांत नदीचा रुपेरी जलस्तंभ उंच उसळला. नंतर जणूं लक्षावधी कांचा फुटाव्या तसें नदीचे पाणी फुटून लखलखलें. सपसप हात मारीत तो दूरवर जाऊं लागला. उन्मत्त झरा दुर्दम वेगानें नदीस मिळाला होता.

तो म्हणाला मी पूर्ण स्वतंत्र आहे व राहणार !! आपल्या बलिष्ठ मुठींनीं तो पाणी पिटूं लागला. जणूं पौर्णिमेच्या शुभ्र-स्तनास लागून हा मानवपुत्र जीवनअमृत पीत होता....

कांहीं वेळानं एका अंतःप्रेरणेनं तो किनाऱ्याशी लागला. मऊ वाळूवर हात पाय पसरुन तो स्तब्ध पडून राहिला. कांहीं वेळानें तंद्रींतच त्याने कपडे चढविले....

एक मस्त हत्तीप्रमाणं थकून तो हलु हळूं घरी परत जाऊं लागला. दुरुन ठन् असा आवाज त्यानं ऐकला. एक वाजला !! वाट बघत असेल—त्याच्या मनांत विचार आला....

मधू घरीं येताच त्यानं मोठयानं हाक दिली—'आई ऽऽऽ' तत्क्षणीं रमाबाईंनी खाली येऊन दार उघडलं.

'आई जागत होती अजून' मधूच्या मनांत खोलवर कांहीसं हाललं !!

बिशूहि आवाजानं जागा झाला होता. 'केवढ्या रात्री दादा परत आला !!' —त्याच्या मनांत विचार आला.

: ८ :

' पळाला ! पळाला ! ' ' पकडा साल्याला !! '

पाठीमागून मुलांचा थवा येत होता. चांगलींच धूळ उडत होती. पुढें पंधरावीस हातांच्या अंतरावर बिशू धूम पळत होता. हातांतली पुस्तकांची पिशवी त्यानं बगलेंत दाबून धरली होती. तोंड धुळीनं माखलेलं, चेहरा विलक्षण काळवंडून कोमेजून गेलेला होता. अगदीं सरळ नाकाच्या रेषेनं तो पळत होता. त्याला धाप लागली होती....

पाठीमागून सूं सूं ऽ ऽ करीत दगड येऊं लागले. एक खडा त्याच्या पाठींत बसला....एक पोटरीवर बसला....एक कानाला चाटीत निघून गेला....

महाकाळाच्या मंदिरासमोरचा उतार लागला. उतारावरून धांवत डाव्या हाताला गेलं की चोवीस खंबा देवीचा-फार प्राचीन काळाचा-शेंदरानं माखलेला प्रचंड दगडी दरवाजा लागतो. दगडाच्या मोठमोठ्या टोलांनी खचलेला तो उतार थेट बाजाराला जाऊन मिळतो. तिथवर पोंचलं कि बाजारांत कोणी त्याला मारूं शकणार नव्हतं....

विश्वासच्या कानांतून रक्त वाहूं लागलं तरी तो जीव घेऊन पळत होता. हरिणाच्या चपळाईनं धांवत होता....मागं मुलांचा थवा धूळ उडवीत धांवत होता. त्याला पकडणं शक्य नसल्यानं दगडफेक करीत होता....अचूक नेम मारुन चिंचा पाडण्यांत वझेचा हात धरण्यांत अवख्या शाळेंत कुणी नव्हतां....वझेला चेव आलेला होता. बिशूला चेंचायला तो बेफाम झाला होता. चोवीस खंब्याचा दरवाजा आला—केसांची लांब लांब झुलपं मागं सारीत पुस्तकांचा एक गठ्ठा बगलेंत नि हातांत धोतराचा सोगा घेऊन मधू जोरजोरानं वादविवाद करीत येत

होता....त्याच्या बरोबर चालणारा पांढऱ्या पालीसारखा काटकुळा भावे त्याचं म्हणणं शांत उत्सुकतेनं ऐकत येत होता....मधूच्या चेहऱ्यावर एक प्रकारची तल्लीनता पसरली होती....भिंवया बोलतांना आकसत होत्या; विचारासरशीं हातवारे जोराजोरानं होत होते....

मधू म्हणत होता —नि तो भेटल्याबरोबर माझं जग कसं बदलून गेलंय्—कसं अन् कां कुणास माहित.... आपण दोघं रोज नाहीं का रामघाटावर जात? नरसिंग घाटाच्या चंद्रकोर नदीतीरी नाही का बसत? पण असं कधींच नव्हतं वाटलं ....पण तो माझ्या शेजारी बसे तर कांहीतरी घडतं आहे असं वाटे ....तुला काय सांगू–भावे–एकदा आम्ही असेच भटकत होतो जंगलांतून. फार चांगला कवि आहे बरं तो; तो म्हणाला काय कीं आत्म्याच्या मैत्रीची तहान त्याला लागली आहे ....त्याचे डोळे असं म्हणतांच अर्धे मिटून लागतात ....नि मी भारून जातो. बघ भर्तृहरीच्या गुफेच्या तिथं झाडांच्या गर्द राईखाली बसलं की किती सुन्दर सायं-काळ असते नाही! ....नदीचं पात्र शांत असतं नि सांजचे गूढ संमोहक रंग पाण्यांत मिसळलेले असतात....'

'पाण्याच्या शांत पृष्ठावर कुठें एकादा पक्षी चोंच मारून उडून जातो नि त्याची वर्तुळं संथ संथ पसरूं लागतात ....पैलतिरावर काळवंडल्या छायेखालीं वाळवंटातून गेलेली पायवाट दिसते....त्यावेळीं किती गूढ मधुरव्यथा जाणवते ....एके सायंकाळी आम्ही दोघं बसलों होतों ....त्याचे मोठे मोठे डोळे भरून आले होते. त्यानं माझा हात धरून विचारलं, ' तिथं समोर बघतोस ना? तुम्हे क्या दिखता है उस पार? कुछ सुन सकते हो? '

मी जागा झालो–म्हणालो– ' नहीं भाई .... !! ' तो एकाएकी

व्याकूळ होउन म्हणाला—' ऐसा न कहो ! देखो, इस व्याकुल संध्या में ....एक विरहिणी की सुरीली उदास तान म सुन रहा हूं ....एक मर्मभरी विरहगाथा है उसमें—उस एकाकिनी की तान में ....दूर ग्राम ग्रामांतर मे रोती हुई उस विरहिणी की कल्पनासे....' नि त्यानं एकाएकी माझ्याकडे चमकून पहात खिन्नपणें विचारलें—' तुम नहीं सुन सकते, मधुकर ? ' मी त्याच्याकडे नुसता बघत राहिलो. त्याच्या काळ्याभोर डोळ्यांतून अश्रूंचा एक बिन्दु त्याच्या लांबट चेहऱ्यावर ठिबकला होता...

मी बोललो नाहीं. अंधारांत बसून राहिलो. शेजारचा खडा दूर पात्राच्या मधोमध फेकीत तो विषण्णपणें म्हणाला—' तो तुम कलाकार नहीं हो... '

नि भावे ! परतताना त्यानं माझा हात धरुन ठेवला होता अगदी घट्ट....आम्ही स्मशानातून परतूं लागलो तेंव्हा समोरच एक चिता जळत होती....तो भारल्यासारखा त्या ज्वाळांकडे बघत राहिला नुसता....' भावे मधेच एकदम म्हणाला—' अरे तो बघ बिशू धावत येतोय....' मधूनं चमकून वर पाहिलं....वळणाआडून बिशू धावत येत होता. बिशूच्या गुडघ्यावर चांगलंच खरचटलं होतं. चोवीस खंब्याच्या दगडी दरवाजा समोरच्या उतारावरुन तो धावत येत होता·· मागें चिंतू वझे अगदी जवळ आलेला. मधूनं आधी बिशूला एकदम धरलं. दादाला बघतांच बिशू एकदम त्याला बिलगला. परिस्थिति लक्षांत येण्यापूर्वी चिंतू वझेला मधूनं मागोमाग धरलं नि धाडकन स्वतःच्या पैलवानी पंजानं मुस्कटांत ठेऊन दिली ! मागच्या मुलांचा थवा हो ऽ ऽ करीत मागच्या पावली पळालेला मधू नि भावेनें पाहिला !....

पण चिंतू वझे ओरडूं लागला. त्याचं मनगट विशूनं घट्ट धरलं होतं. तो त्याची मूठ दातांनी चावूं लागला. त्याचे केस रागानं कपाळावर आले होते. तो रडत किंचाळत म्हणूं लागला—' सोडा! सोडा मला !!....

मधूनं दुसरी चापट त्याच्या गालावर जोरानं ठेवून दिली. पांचही बोटं त्याच्या गालावर स्पष्ट उमटली. तो दांतकिचा खात म्हणूं लागला—' सोड साल्या ! सोड....'

' कां मारलंस तूं विशूला ? '

विशू रडत होता. पण दादानं पाहिलेलं बघून त्याला अतिशय लाज वाटत होती....

' यानं माझा पैसा दिला नाहीं !! '

' नाहीं दादा ! एवढसं पुस्तक फाटलं म्हणून पैसा मागतोय हा !'

' काबे पैसा मागतोस ? लहान बघून छळ करतोस विशूचा ना ?' मधूनं तिसरी थप्पड त्याच्या मुस्कटांवर हाणली. भावे मध्यें पडून म्हणाला—

' हां हां ! काय करतोस हे ? '

मधूचे डोळे लाल झाले होते. चेहरा अत्यंत उग्र झाला होता. मधूला मागे ढकलून, भावे चिंतू वझेला सोडवीत म्हणाला—

' हं जा जा आतां—आतां असा बंडपणा नको करुं मात्र ' मधूची मूठ सोडवीत भावे म्हणाला—

' मधू....सोड पाहूं त्याला आतां....'

' याद राख ! विशूला मारलं बिरलंस् तर ! असशील श्रीमंत घरचा. त्याच्या वाटेला गेलास तर तुकडे तुकडे करीन तुझे—' त्याला सोडून देत मधू म्हणाला.

चिंटू पाकीट खावरीत पळाला. मान वळवून अद्वातद्वा शिव्या देत गेला....

आणि आतां भावे नि मधू एकमेकासमोर उभे होते ! एकमेकाला बघत होते ! मधूचा चेहरा खर्रकन उतरला. तो खजीलपणें हंसला. भावेची नजर चुकवूं लागला. भावेच्या पार्लीसारख्या पांढऱ्या चेहऱ्यावर एक कुतुहल पसरलें होतं !! डोळे जणूं बोल लावीत होते.

मनांतली खळबळ लपवीत, बोटें चाळवीत मधू म्हणाला—

'....पण भावे....'

भावे त्याला फिरुन मधेच अडवीत म्हणाला—' पण बिशू ! कुठे आहे तो ? ' बिशू कधीचाच पसार झाला होता.

दोघें न बोलतां चालूं लागले. तेंव्हा दिवेलागणी झाली होती. भावेशी एक शब्द बोलावचा धीर मधूला झाला नाही.

: ९ :

' आहांत का हो ऽऽ बापूनाना ? '

बापू पूजेंत बसले होते. रमाबाई पाणी भरत होत्या. मुमा गंध उगाळून देत होती. मधू वळकटीशी टेकून एक पुस्तक चाळण्यांत दंग झाला होता.

' आहांत का हो ऽऽ बापूनाना ? ' फिरून हांक आली.

मधूनं आवाज ऐकला ! ओळखला—खास वामनरावांचाच आवाज ! पण त्यानं न ऐकल्यासारखं केलं. जिन्यावर पावलें वाजूं लागलीं.

एक बुटकेली, मध्यमवयीन मूर्ति आंत आली. तिनें मिस्किलपणें

चौबाजूस निरखून पाहिले. मधूला निष्काळजीपणानं पुस्तक चाळ-तांना पाहून सूक्ष्म रागाची एक छटा तिच्या तोंडावरून तरळून गेली. वामनरावांच्या पांढऱ्या स्वच्छ धोतरावरून व मुंडेछाट शुभ्र सदऱ्या-वरून त्यांच्या बडेपणाची मिजास कळत होती, त्यांच्या अपऱ्या नि फेंदारलेल्या नाकावरून व सदाविजयी मुद्रेवरून त्यांच्या मोठेपणाची व्याख्या होत होती. त्यांच्या मिस्कल नजरेनें नि तुच्छतापूर्ण वृत्तीनें हातांतली काठी फिरविण्याच्या पद्धतीवरून त्यांच्या यशाचें मर्म कळत होतें नि त्यांच्या टक्कलदार माथ्यावरून व तोंडावरील वातड कातडीवरून त्यांच्या अनुभवांची जात कळत होती.

बापूंनीं खुणेनें त्यांना बसायला सांगितलें व ते फिरून ध्यानमग्न झाले.

मोठ्यानें उसनं हंसून वामनराव म्हणाले—

‘ हं ....काय बापूनाना ? अजून नाक धरून बसला आहांत ? ’

‘ काय सुमाताई ! काय करतात रमावहिनी ? म्हणावं दोन कप चहा टाका, वामनराव आलेत ? ’

मग वामनराव स्वतःशीच समाधानानं हंसले. त्यांचा आवाज ऐकतांच चहाचं आधण केव्हांच ठेवलं गेलं होतं. एरव्ही मधूनं चहा मागितला तर त्याला मिळत नसे. वामनराव आले कीं रमाबाईंचे हे कठोर नियम ढिलावत. मधुला याचाच मनस्वी राग येई.

वामनरावांना हंसतांना ऐकून मधू मुकाट्यानं उठला नि जिना उतरून अंगणांत निघून गेला. हंसत आलेल्या रमाबाईंनीं हे पाहिलं नि त्यांच्या कपाळीं आठी चढली ! मुकाट्यानं पुढे होत त्या म्हणाल्या—

‘ आत्ता होतेय् पूजा ... नि चहा पण ठेवला आहे ! ’

'होऊं द्या सावकाश वहिनी ! काय घाई आहे !'—नि ते बापूंकडे बघूं लागले. बापूंची शुचीर्भूत मूर्ति ध्यानमग्न झाली होती. वामनरावांचे समाधानानं किंचित् फुगलेले गाल सुकून, घड्या पडून मुरकुतले. एक गडद छाया त्यांच्या तोंडावरून सरकत गेली...

'आटपा बुवा लवकर ! अहो ! मी जर असा देवदेव करीत बसलो असतो तर...'

'पण ! आत्तांच संपेल त्यांचं, वामनभाऊजी !'—रमाबाई त्यांना मध्येंच अडवीत बोलल्या. वामनरावांनीं चमकून त्यांच्याकडे पाहिलं. मग खिडकीशीं उभे राहून ते शीळ घालूं लागले. रमाबाई आंत निघून गेल्या.

बापूंनी डोळे उघडले. देवासमोर नाक घासलं. शांतपणानं वामन-रावांकडे बघत ते म्हणाले—

'आज कांहीं तरी खास बातमी दिसते आहे वामनजी ! अरे बैस तर खरे....'

रमाबाई दारांत येऊन म्हणाल्या— 'हा चहा !'
तेवढ्यांत मधू खोलींत आला निकोपऱ्यांतल्या एका बैठ्या डेस्कवर पुस्तक टाकून सदरा काढूं लागला. वामनरावांनीं तें पुस्तक उचललं "Complete works of shelley" ते उगीच पानं चाळूं लागले. मग पुस्तक बाजूस सारीत म्हणाले—

'काय मधू ? काय म्हणते सहामाही ?' उत्तर न देतां बाहेत असल्यासारखा मधू तेथून निघून गेला. रमाबाई रागानं ओरडल्या, 'मधू !'

बापू म्हणाले— 'अग जाऊं दे त्याला ! तिरसट आहे झालं !' बापूंचं वाक्य वामनरावांना बोचलं. ते म्हणाले—

'जाऊं द्या, पोरंच तीं. एकाद्याच्या मनाला वाटतो जिव्हाळा नि विचारतो झालं वेड्यासारखे चार प्रश्न.... ये बाळ बिशू !.... शाबास !!'

बिशू तेवढ्यांत आंत आला होता. त्यानं हें सारं पाहिलं होतं. मधूदादा गेला म्हणून आई रागावली हेंहि त्यानं ओळखलं होतं. त्यानं आईनं शिकविल्याप्रमाणं वामनकाकांना नम्रपणानं नमस्कार केला—सर्कशींतल्या प्राण्यासारखा. बापू हंसले. रमाबाई म्हणाल्या—'आमचा बिशू मात्र आहे शहाणा !....'

वामनराव म्हणाले– 'बरं का बापूकाका; आज बातमी आहे महत्वाची....जाचक सुभेसाहेबांचा झाला आहे तबादला....बालादस्तांतून आर्डरहि आली....रामेश्वर चतुर्वेदी येणार आहेत त्यांच्या जागीं ....संपली आमच्या साहेबांची कारकीर्द....'

बापूकाका पुस्तकं नीटनेटकीं ठेवीत होते. म्हणाले—

'देवमाणूस होता बिचारा ....सुखी होती रयत ....आपल्याशींहि बरा होता...'

'पण बापू ....तुमचा साधेभोळेपणा आतां जरा बाजूला ठेवा बरं का ! अन् तो तुमचा असिस्टंट–काय म्हणतो ! अगदीं साहेब दिसतो तुमचा !! बापू तुमचा तो माणूस बरा नाहीं दिसत मला....' वामनराव जरा धूर्तपणानं म्हणाले.

बापूंच्या चेहऱ्यावर एक प्रकारचा त्रस्तपणा पसरला. रमाबाईंच्या चेहऱ्याकडे त्यांनी एक निसटता दृष्टिक्षेप केला. त्या मोठ्या लक्षपूर्वक वामनरावांचं बोलणं ऐकत होत्या. बापूंना वामनरावांचं बोलणं नापसंत दिसलं. एक सूक्ष्म तिरस्काराची छटा त्यांच्या तोंडावर उमटली.

'उगीच दुसऱ्याचा संशय घेणं बरं नाही वामन !!' –ते म्हणाले

वामनराव स्तब्ध झाले–खाली मान घालून बसले ! मग ; संथ-पणानं म्हणाले—

'अस्सं ....तर ....जाऊं द्या ....मला काय ? ....' तेवढ्यांत वामनरावांचा चेहरा चमकला. नाकपुड्या फेंदारल्या गेल्या. ते फिरुन जरा कडू आवाजांत म्हणाले—

'माझं सोडा ....मी कुणालाहि बनवून ठेवीन. सगळ्या युक्त्या आहेत माझ्या खिशांत ....'

वामनराव खिशांत कायसेसें खरोखरीच शोधूं लागले. बापूंची निर्विकार दृष्टि किंचित बदलली. रमाबाईच्या चेहऱ्यावर उत्सुकता पसरली.

वामनरावांनी चहाचा एक घोट घेतला. मग विशूला मध्येंच म्हणाले—

'घे बाळ ! घे ! ....अरे घे ना !'

विशू म्हणाला, 'नको' नि खेळायला पळून गेला !!

वामनराव उठून उभे राहिले नि खिसे चांचपूं लागले. त्यांच्या हातांतील अनेक पुडक्यांतून त्यांना हवं ते पाकीट सापडलं. त्यांच्या चेहऱ्यावर मोठं समाधान पसरलं. किंचित् ऐटीनं म्हणाले—

'हं ! वाचा हे बापू ....आहे की नाहीं नांवाचा वामनराव मी ?'

मग बापूहि मनमोकळेपणानं हंसून म्हणाले—

'कमाल आहे वामन्या तुझी. कधीं मिळवलंस हे Testimonial ( प्रशस्तिपत्र ) त्या चतुर्वेदीकडून ? ....'

'पुष्कळ पूर्वीं मंदसोरला असतांना ....फार सख्त नि खुषामद-पसंद आहे ....सांगून ठेवतो आपला....आजवर झालं तें ठीक झालं

....पण तुम्ही काम कराल नि घरीं बसाल देवदेव करीत....
....वाह्यात माणसांशी वाह्यातासारखंच वागायला हवं ....काय वहिनीं ? .... '

बापू गंभीरपणानं म्हणाले— ' वामन ! आपल्याला तें जमतच नाही अगदी. तुम्हं ठीक.... तुम्ही. अक्कल कोठून आणायची आम्ही बाबा ? आपलं हें असंच चालायचं.... ' वामनराव उठून उभे झाले.

' बरं बापूकाका. म्हटलं तुम्हाला कळवल्याशिवाय राहूं नये म्हणून आलों होतो. '

वामनराव भराभर जिना उतरून गेले. रमाबाई तशाच दारांत उभ्या होत्या. त्यांच्या कपाळावर आठी उभी होती. बापूंच्या शुचिर्भूत तोंडावर एक प्रकारची कष्टी छाया सरकत होती. शांततेचा भंग करण्यासाठीं ते मोठ्यानं म्हणाले—

' अरे मधू ऽऽ ! मधू ऽऽ ! बेटा ऽ !! .... '

रमाबाई कडू आवाजांत म्हणाल्या—

' घरांतलं धान्य संपलं आहे.... कुठून तरी पैसे आणायला हवेत.... ! ' बापूंना रमाबाईंच्या आवाजांत रुक्षपणाचा भास झाला. ते चमकून रमाबाईंच्या तोंडाकडे पहातांच राहिले. त्यांच्या शांत नजरेला नजर न भिडवितां त्या स्वयंपाक घरांत निघून गेल्या न कळत ओघळूं पहाणारा अश्रू पुसून काढला. हें कोणी पहात तर नाही ना हें मात्र त्यांनी आधीं नीट पाहून घेतलं.... !!



दत्तमंदिराला लागून भावेंचं घर होतं. ज्या बोळांत भावेंचं घर आहे तो कारकून मंडळींचा खास बोळ दत्तमंदिराच्या चौथऱ्यावर

सायंकाळीं मंडळी हटकून दिसायची. गोमेच्या दोहोबाजूस फुटलेल्या पायाप्रमाणे अनेक बारक्या गल्ल्या या रस्त्यास फुटलेल्या, त्यांत अनेक कुटुंबांचे संसार. मधू दत्तमंदिरा शेजारून निघाला तेव्हां सायंकाळ व्हायला अवकाश होता. पिंपळांच्या प्रचंड झाडांच्या टोकांवर पानं मंद उन्हांत चमकत होतीं. मधू झुलत झुलत डौलानं चालला होता. नेहमीप्रमाणें बोळांत शिरतांच त्यानं टोपी काढून घेतली होती. त्याच्या मनांत नुकतीच वाचलेली Shelley ची ओळ Like an unbodied joy whose Race has just begun. तरळत होती. सतरा अठरा वर्षांचा त्याचा निमगोरा चेहरा बापूच्या वळणावर गेला होता. तोंड गोल नि नाक सरळ पण अपरं होतं. कपाळावर केसांची झुलपं हालतांना त्याला जाणवत होतीं. एक प्रकारच्या धुंदींत तो चालला होता. ....मनांत उगीच आनंद उसळत होता.

भावेंच्या घराखालीं उभा राहून मधू ओरडला '—भावे! अहो भावे :' वरच्या खिडकींत हाडकुळी पिंवळसर तोंडाची मुलगी उभी झाली.

'वर या! आत्तां येतील ते!'—ती बारीक आवाजांत म्हणाली

मधू जिना चढून वर गेला. जिना चढता चढता त्याच्या डोळ्यासमोर खिडकींत चमकलेलं ते पिवळसर मुलीचं तोंड दिसूं लागलं. पण खरं म्हणजे त्या तोंडाची आकृती त्याच्या डोळ्यासमोर नीटशी येईना! फक्त दोन टपोरे, काळेभोर डोळे तेवढे दिसले!

का तो चेहरा उदास होतो? का ते डोळे पाण्यानं भरले असल्यानं अधिक टपोर दिसले? .... छे:!

मधू ज्या खोलींत आला ती खोली रिकामी होती. पण पिवळ्या-मातीनं स्वच्छ सारवलेली दिसत होती. भिंतीवर दत्ताची एक तसबीर; भिंतीस टेकून ठेवलेली एक वळकटी नि एक लहानशी चटई एवढेंच काय तें सामान खोलींत होतें. तिथून दुसरी खोली दिसत होती. तिथंहि तीच आरशासारखी स्वच्छता. त्या घरांत माणसं होतीं. भावेची आई, बहीण, वडील सव होते. पण घरांत वर्दळ नव्हती ....आवाज नव्हता. माणसं चालत होतीं पण धडधडाट नव्हता. तिकडे ती भावेची बहीण आईशी कायसंसं बोलत होती. पण आवाज अगदी खालचा नि मंद होता. जणूं वाऱ्याची मंद सळसळच. भावेचे वडील लांब कोट घालून देवदर्शनाला निघाले नि म्हणाले—' जाऊन येतो ग ऽ ' पण देवळाच्या एकांतात ध्वनि घुमावा तसं झालं; म्हणजे शांतता अधिकच गहिरी झाली !

मधूनं समोर पाहिलं. भावेनं आरशांत पाहून काढलेलं स्वतःचं एक चित्र होतं. त्यांत कांहीं तरी निराळेपणा होता. काय बरं होतं त्यांत? त्यानं निरखून पहायचा यत्न केला. पण लक्ष लागेना. जमेना. खोली-च्या दाराशी जाऊन मधू म्हणाला—' मी वर धाब्यावर जाऊन बसतों बरं का ! '

भावेची आई कायसेंसें लाटतांना म्हणाली—' बरं....! '

माळ्यावर अजून ऊन झिरपत होतं. तळहाताएवढ्या गणपतीच्या मूर्ति भिंतीशी हारीनं मांडून ठेवल्या होत्या. त्यांना अजून रंग लावलेला नव्हता. अनेक लहान मोठे ओबड धोबड मातीचे गोळे उभे ठेवले होते. ते साचे आहेत हे मधुकरला माहित होतें. गांधींचा एक मोठा पुतळा अर्धवट तयार झालेला होता. त्यांच्या तोंडावरील सुरकुत्या न् सुरकुत्या उमटविण्याची खटपट चालली होती....त्या अर्ध्या-

पुऱ्या चेहऱ्यावर खोल चिंतेची....

धाब्याचा जिना करकर वाजूं लागला, तसा सारा माळा हादरूं लागला. जिन्याच्या चौकीटींतून आधी भावेचं काटकुळं पांढरं निस्तेज तोंड वर आलं नि नंतर त्याचं शरीर....थकव्याची लक्षणं त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट उमटलेलीं होतीं. धोतराच्या ओच्यांत त्यानं माती भरून आणलेली होती; ती एका कोपऱ्यांत नेऊन ओतली. अगदी मऊ चिकण माती ती; क्षिप्रा काठची.खाली उतरतां उतरतां भावे म्हणाला, 'आत्ता आलो हं '...फिरून भावेचा चेहरा चौकटींतून खाली गेला...!

भावे आला नि गेला. पण तेथल्या शांततेंत दोन तरंग उठले. मधुकर समजला. गणेश चतुर्थी आलेली; तेव्हा भावे हे गणपती विकणार असेल....भावेशी इतकीं वर्षं आपली दोस्ती पण आपणाला यांतलें कांहीं कसे उमगलें नाहीं...?

नि गंमत काय कीं पावसानें भरलेल्या कांचेच्या तावदानामागे जसा दिसावा तसा भावेचा पिंवळा पुसट चेहरा त्याच्या समोरून तरळला....

आकाशांत निळे निळे ढग ओथंबून आले होते तेवढ्यांत. भावेनं अंगांत एक चुरगाळलेला शर्ट घातला होता. त्याच्या बारीक धोतरांतून रोड मांड्या दिसत होत्या. पिवळ्या तोंडावर दाढीचे खुंट वाढले होते. चेहरा थकून चूर झालेला होता.

' कुठं ? रामघाटाकडे चलूं या का ? '

' नको ! सगळी दुपार तिथंच घालवली. माती आणायची होती ना ! नरसिंह घाटाकडे चलूं ! '—भावे म्हणाला.

आभाळ वोळून आलं होतं. गडद निळं धुकं हिरव्यागार वृक्षराजीवर तरंगत होतं. क्षिप्रेचा प्रवाह संथ वहात होता. पैलथडीच्या

झाडींतून निळ्या मानेचे मोर चमकते पंख पसरून पैलथडीच्या वृक्ष-राजीकडे उडून जात होते. मोरांच्या ' त्या हां ऽ ऽ त्या हां ' च्या टाहोनें सारें वातावरण दुमदुमून गेलें होतें.

एका एकीं मधुकर गुण गुणूं लागला—

' हृदय आमार नाचे रे आजीके
मयूरेर मत्तो नाचे रे
हृदय नाचे रे

मधू दोन्हीं खिशांत हात घालून तल्लीनतेनें चढ्या आवाजांत गाऊं लागला. त्याच्या त्या आनंदाकडे भावे विस्मयाने बघत होता. त्यानें चकित होऊन विचारलें—

' बंगाली कधीपासून शिकलास् ?

' माधव कॉलेजांत नाहीं का आले ते नवे प्रोफेसर ? काय नांव बरं त्यांचं....ते म्हणून दाखवतात रवीन्द्रांची कविता....अपूर्व आनंद आहे या संगीतांत ! नाहीं ?....'

तो मग्न होऊन गाऊं लागला—

' नयने आमार सजल मेघेर
नील अंजन लेगे छे
नयने लेगे छे
नव तृन दले घनबन छाये
हरश आमार दियेछि बिछाये
पुलकित नीप नि कुंजे आजि
बिकशित प्रान जेगे छे
नयने सजल स्निग्ध मेघेर
नील अंजन लेगे छे'

मधुकरच्या तोंडावर आनंदाच्या उर्मी उसळतांना दिसत होत्या. ' बिकशित प्रान जेगे छे ' म्हणताना त्याचा ऊर खरोखर विव्हलतेनें

दाटून आला होता. ते नरसिंह घाटाच्या मागच्या झाडीखाली आले होते. चिंचेचे विशाल उंच उंच अजस्त्र वृक्ष हालत होते नि चाफ्यांची अनेक फुलें उडून निबिड छायेखालील पाऊल वाटेवर पडत होतीं. म्हणताना त्याचा आवाज सद्गदित झाला होता—निळ्या अंधारांत हिरवी झांक असणाऱ्या भावेच्या थकलेल्या चेहऱ्यावर छाया सरत-सरकत होत्या. गंभीर कुतूहलानं मधुकरच्या तन्मयतेकडे तो बघत होता. दोघंहि शेतांच्या मधील पायवाटेने नरसिंह घाटावरच्या उंच बुरजा-सारख्या जागीं आले होते....मधुकरचे केस फडफडत होते....अंग-प्रत्यंग पुलकित होत होतं....त्याचा आवाज उंचावला होता—लाटां-सारखा पसरत होता—त्याचा प्रतिध्वनी उमटत होता.

हृदय आमार नाचे रे आजिके
मयूरेर मत्तो नाचे रे
हृदय नाचे रे

त्या आवाजांत हृदयाचा बेभानपणा होता, धुंदी होती, संगीत नव्हतं पण मनाला ओढून घेण्याची शक्ति होती. ते नरसिंह घाटाच्या बुरुजावर आले नि एकदम स्तब्ध उभे झाले. दोन तीन मिनिटं अगदी स्तब्ध उभे होते ते....

खालीं नदीची कमान पसरली होती. अंधुक निळ्या प्रकाशांत हिरव्या गडद वृक्षराजींतून निघालेली नि दुसऱ्या टोकाला दाट छायांत फिरून लुप्त झालेली हिरवी क्षिप्रा अत्यंत व्याकुळतेनं वहात होती.... दूरदूरच्या छाया—सघन कुंजांतून जणूं कुणीतरी व्याकुळ साद घालीत होतं....दूर महाकाळ मंदिरांतून सनईची विषण्ण-मधुर-तान ऐकूं येत होती नि पलिकडच्या दाट हिरव्या जंगलांत लाल भडक दिसणाऱ्या क्षिप्रा ब्रिजवरून धडाडत जाणाऱ्या गाडीचे लाल डबे दिसत, लपत होते !

मधुर व्यथा वातावरणांत तरंगत होती.

‘ केवढी तन्मयता आहे रवींद्रांच्या कवितेंत ? मराठींत असं काव्यच नाहीं भावे ! मराठी माणसाचा पिंडच नाहीं कवीचा....खरं ना ! ’ मधू म्हणाला. त्याच्या मुद्रेवरील कोमल तल्लीनता जाऊन हेटाळणीनें त्याचा चेहरा किंचित रुंदावला. पण तो स्वतःशीच बोलला होता. भावेकडे एवढा वेळ त्यानं बघितलंहि नव्हतं....

‘ महाराष्ट्राला परवडत नसावं हें....’ भावेच्या आवाजांत धीर होता !

एकांतांत कुणी अवचित ओरडावं म्हणजे माणूस जोरानं दचकतो तसा मधू दचकला. भावेचं अस्तित्व डोळ्यांतील खड्याप्रमाणं त्याला खुपलं. तो मागे सरला नि भावेला पहिल्याप्रथम पाहूं लागला....

भावेच्या भिजलेल्या डोळ्यांत प्रकाशाचा कण चमकत होता. त्या शुष्क वाळक्या चेहऱ्यावर आवेगाची थरथर होती. तरीहि त्याच्या मुद्रेवर हिरिरीचा भाव नव्हता. आपल्या बोलण्यानं मधूच्या दिव्य-स्वप्नलोकांस छेद मारला गेला आहे हें त्यानं ओळखलं. पण विजयाचा पुसट भावहि त्याच्या चेहऱ्यावर नव्हता. तो शांत बसला होता, जणूं क्षणापूर्वी दुसरंच कुणीतरी तें वाक्य बोललं होतं.

मधुकरचा आवाज आक्रमक झाला—‘ अस्सल महाराष्ट्रीया-सारखं बोललास तूं ! काव्याला लागतं तळमळणारं हृदय.... स्वप्नें पाहणारं बेदरकार कलंदरी व्यक्तित्व !.... परवडण्या न परवडण्याचा विचार मराठी डोक्यांतच येऊं शकतो....’

‘श्रीमंतीमुळें शाबूत राहिलेल्या मनाचे डोळे आकाशाकडे असतात. ते डोळे स्वप्नांनीं भारावलेले असतात.... सुंदर स्वप्न.... सुंदर काव्य ! ’ भावे स्वतःशीच पुटपुटला.

' मी काय म्हणतो मग ? तीं स्वप्नें....तें काव्य जगायचीं मृदुता महाराष्ट्रीयांची नव्हे....' मधुकर विजयी सुरांत म्हणाला....

पण भावेनं आपलं म्हणणंच पुढें चालू ठेवलं—अगदीं संथ नि खोल सुरांत म्हणत होता—

' पण कठोर जीवनाशी जें सतत झुंजतं, मूक अश्रु गाळतं पण पराजयानं पिचत नाहीं. विजयांत गंभीरपणें हासतं पण संकटाच्या छायेंत निरंतर जागं राहतं तें मन ! त्या मनाचे डोळे चौफेर पाहतात, अगदीं आरपार पाहतात; दुसऱ्या भागावर अचूक दृष्टि रोखतात.... त्या कनवाळू पण झुंजार मनाचं काव्य.... फार मोठं काव्य असतं तें. पण तें जाणवायलाहि त्याच प्रतीचं मन हवं....नव्हे का ?'

' मजजवळ तें हृदय नाही म्हणतोस ? बापूंचे अभंग नि आईच्या रसाळ ओव्या म्हणत जागा होणारा मी.... मजजवळ कोणतं हृदय आहे मग ?.... महाराष्ट्राबाहेर राहून मला चांगली तुलना करता येतें आहे.... खरें काय तें सांगतां येतें आहे एवढेंच ! मधुकर आवेशानें म्हणाला.

भावे दबल्यासारखा झाला. फिका हसला. क्षिप्रेच्या मंद वाहणाऱ्या लाटांकडे पहात तो म्हणाला—

' असेलहि ! तुझेंहि म्हणणें खरं असूं शकेल ! पण स्वतःच्या रोमँटिक स्वप्नांत सदैव गुंग असणारा माणूस मराठी भाव नाहीं ओळखूं शकत—मला वाटतं आपलं....'

आतां अगदीं अंधारून आलं होतं म्हणून मधूचा चेहरा छाये सारखा दिसूं लागला. जुनं औदुंबराचं आडवं वाढलेलं झाड, छायावत् वाटूं लागलं.... निळसर धुक्यांतून पिवळा चंद्रमोती झळझळूं लागला. मधुकर ताडकन् उठून उभा झाला. त्याची बोटं गुंड्यांशीं चाळा

करू लागलीं. तो स्वतःतच गढून गेला. मग एकदम म्हणाला—
' म्हणजे मी वैय्यक्तिक स्वप्नांत दंग असतो असेंच ना ? '

' हो....मला....' भावेचा चेहरा थिजला. तो मोठ्या प्रयासानं बोलला.

' काय आधार आहे याला ? ' मधुकर जवळजवळ ओरडला.

भावे बुरूज गच्चीच्या पाळीवर पूर्णपणें वाकला. एक खडा उचलून त्यानं पाण्यांत टाकला. पाणी उडालं. तें मंद चांदण्यांत झळकलं....

' सांगा भावे ! काय आधार आहे याला....? ' मधुकर फिरून म्हणाला.

भावेनं मधूकडे तोंड फिरविलं नाहीं. जिथं खडा पडला होता त्याच ठिकाणी डोळे खिळवून तो हळूहळू कष्टानं बोलला—' तुझ्या सभोंवारचं जीवन अतिशय दुःखी आहे मधू.... तुझ्या आईची, रमाबाईंचीच गोष्ट घे .... तिचे कष्ट तुला दिसले असते .... त्या मागची........'

स्वतःच्या चौरस जाड पंजांनी भावेच्या खांद्याच्या काटक्या धरून जोरजोरानं हालवीत मधू कर्कशपणानं म्हणाला—

' काय ते साफ साफ बोल....!! '

भावे तसाच विषण्ण संथपणानं म्हणाला—

' रमाकाकू किती ठिकाणचीं कामं करतात हें माहीत आहे का तुला ?.... छेः छेः तसें असतें तर तूं एवढा स्वतांत दंग नसतासच मुळीं.... मला म्हणायचं होतं.... ! '

' साफ खोटं आहे हें.... साफ खोटं !! ' तुफानांत उन्मळूं पाहणाऱ्या झाडासारखा मधू झोकांड्या खाऊं लागला.

‘ मला सांगितलं असतं आईनं हें ! कुणी तरी....अशक्य आहे हें... भाव्या, तूं खोटं बोलतोस.... कां सांगितलं नसेल मला ?....’

‘ तुलाच समजायला हवं म्हणून नसेल सांगितलं....!! ’—कसेंबसें पण नेटानें हें शब्द भावेच्या तोंडांतून बाहेर पडले.

‘ साफ खोटें....’–अतिशय उद्वेगाने मधू म्हणाला.

आवेगाच्या भरांत तो पाठ फिरवून चालूं लागला; झाडींत दिसे-नासा झाला !

सोडलेल्या पोत्यासारखा भावे खाली कोसळला. मधुकर ज्या दिशेनें निघून गेला तिकडे तो खिन्नपणाने पहात राहिला. मंद चांदण्यांत त्याच्या मोठ्या नाकाचा उंचवटा तेवढा चमकत होता !....

: ११ :

तास संपल्याची घंटा झाली. पागे मास्तर निघून गेले तरी दुसरे मास्तर वर्गावर आले नाहींत. म्हणून वर्गात एकच गोंधळ माजून राहिलेला होता.

चिंतू वझे ताडकन विशूच्या बांकाशेजारीं गेला. हाताच्या एका फटकाऱ्यासरशी त्याची टोपी त्यानं उडवली.

बबड्या मधें पडला–‘ नको रे चिंतू....’

त्याला जोरानं धक्का देऊन चिंतू ओरडला—‘ हट बे ! माहीत आहे साल्या त्याची बायको आहेस तूं....’

असं म्हणून चिंतू ऐटींत चहूंकडे पाहून फिदी फिदी हंसला.

स्वतःच्या गोऱ्यापान कपाळावर गोल टोपी अगदी भिंवयापर्यंत तिरपी त्यानं बसवली. समोरच्या दोन दांताच्या फटींतून त्यानं चर्रकन

थुंकीची धार एक कोपऱ्यांत ऐटींत सोडली. बिशूच्या गालावरचं मांस चिमटीच्या दोन नखांनी दाबीत तो ओरडला—

' कां बच्चूजी ! आणलेत की नाहींत दोन पैसे....की करूं तीन आतां. साल्या तुझ्या भावाला कच्चा खाऊन जाईन कच्चा. उद्यां आणा तीन पैसे. '

चिंतूची नखं बिशूच्या गालांत खोल रुपली व त्या ठिकाणी रक्ताचा एक मोठा थेंब टपोरला. चिंतूच्या सभोंवार त्याला मिणारे खुषामती घोळका करून उभे होते. बंडू झालेला चिंतूच्या अडदांड गोऱ्यापान तोंडाचं, त्याच्या लाल मखमली चड्डीचं नि चकचकीत बुटांचं मोठं आकर्षण वाटे. त्याच्या सोबत फिरतांना नि इतरांना उगीचच हंसताना स्वतः कांहीं वेगळे आहोंत असें त्याला वाटे. स्वतःच्या स्वच्छ रुमालानं तो नेहमी टापटिपीनं नाक पुशी; उगीचच नाजुकपणानें ओठ आवळून धरी. तो यावेळीं चिंतूच्या शेजारी उभा होता. त्यानं बिशूच्या गालावरील रक्त पुसायचं निमित केलं नि जोरानं एक चापट ठेवून दिली !! मुलं टाळ्या पिटूं लागलीं.

बिशू भांबावला. थरथरत उभा झाला. मधुकरनं मार दिल्यापासून चिंतू वझेचा जांच त्याला भयंकर होऊं लागला होता.

एवढ्यांत मुलांची लाट दाराकडे उसळली. एकच गिल्ला झाला.

' आलेऽऽ आलेऽऽ दुराफे भटजी, यावं यावं. '

गजा—दुराफेची टोपी हातोहात उडाली. त्याचा हिरवागार चमन गोटा दिसतांच चिंतूनं पुढें होऊन तीवर जोराची चापटी मारून स्वतःचा हात गरम करून घेतला. हिरवागार चमनगोटा बघतांच अनेकांचे तळहात खाजवले. अनेकांनीं दुराफेचं डोकं शेकायला सुरवात केली....' ताड् ताड् ताड् ताड् '.

दुराफेचं डोकं झोकायला सुरवात केली....

'कुठं पंगत झोडली भटजी ? . ..फार लौकर आलात् शाळेत ?-' एकच गिल्ला सुरू झाला. एकानं त्याचा पाय ओढतांच तो दोन हात जमीनीवर टेकून ओणव्यानं एक लाथ मागे झाडूं लागला.

तो ओरडत ओरडत शिव्या देऊं लागला—'साल्या तुमच्या बहिणीची.... साल्या तुझ्या मायची....'

दुराफेच्या तोंडाची लाळ फरशीवर सांडू लागली-

एकच गिल्ला—एकच गर्दी.

'दुराफे भटजी.... दुराफे भटजी.... मारा साल्याला.... चप्पी घ्या साल्याची !!'

एकटा उभा राहून बिशू हे सारं दूरून बघत होता. त्याला पाहवत नव्हतं सारं. भयानं तो कांपत होता. काहींतरी अतिशय क्रूरपणाचं कृत्य चाललं आहे आणि त्यांशी लढलं पाहिजे हें त्याला जाणवत होतं. काहींसं अनावर होत होतं.

तेवढ्यांत फिरून गल्ला झाला— 'आले....आले !!'

नि समुद्राची लाट एकाएकी मागं सरावी तसे सारे आपआपल्या जागी पळाले. पुस्तकं दप्त्यांतून भराभर निघाली नि तोंडापुढं धरली गेलीं. चिंतूनं चड्डीच्या खिशांतून पिवळा पेरु काढून साऱ्या वर्गाला दाखवला. त्याचा एक चावा घेतला नि परत तो खिशांत ठेवून घेतला. गजा दुराफे दाराशीच रडत होता. पण चिंतूला त्याचं भय नव्हतं. मास्तरांनी चिंतूच्या खोड्याकडे दुर्लक्ष केलं होतं. चिंतूकडे ते शिकवायला जात असतात ना !

अंगणांतून समोरचे वर्ग दिसत होते. निघोजकर हेडमास्तर वर्गासमोर आले ! 'ऐहे....ऐहे....बघातर....बघातर....' चिंतू वात्रट

हसूं लागला. स्वतःच्या दोन मांड्यांच्या मधोमध इषारा करूं लागला. बिशूला भयंकर गरगरल्यासारखं होऊं लागलं होतं. त्याला नीटसं कांहींच कळत नव्हतं. पण एक भयंकर शिसारी !! कांहींतरी अतिशय वाईट !! पाप !! त्याचं सर्वांग कापूं लागलं !

तेवढ्यांत वर्ग एकदम उठून उभा झाला ! एक अगदीं पोरगेलेसे नवे मास्तर आंत आले. आंत येतांच त्यांनी हजेरी घ्यायला सुरवात केली. पटावरील नांव उच्चारतांना प्रत्येक मुलांकडे बघतहि होते. चिंतूचं नांव घेतांच त्यांनी त्याच्याकडे पाहिलं....दोन क्षण त्यांची दृष्टि त्याचेवर खिळली....नि भराभर पुढची नांव उच्चारूं लागले....

' गजा रामचंद्र दुराफे '

गजा दुराफे उभा झाला. त्याच्या डोळ्यांत अजून अश्रू सांचलेले होते. त्याचं नाक ठेचलं गेलं होतं. ओणवा होता तेव्हां त्याचं कपाळ आपटून दोनतीनदा ठेचल्यामुळे कपाळाच्या एका कोपऱ्याचा भाग रक्ताळला होता. मास्तरांनी त्याच्याकडे बघतांच त्याला रडूं कोसळलं होतं.

' काय झालं बाळ ? '

वर्गांतल्या हेटाळलेल्या गबाळ्या मुलाला ' बाळ ' म्हटलेलं ऐकून सारीं मुलं मास्तरांकडे बघूं लागलीं. बिशूचे डोळे आनंदानं लुकलुकले. मास्तर उठले. खुर्ची सोडून दुराफेच्या शेजारी गेले. तो कुडत्याच्या बाहीनं डोळे पुसत होता. त्याचे हात डोळ्यांवरून काढण्याचा यत्न करीत ते म्हणाले—

' सांग बाळ, काय झालं....कसं लागलं तुला ? '

दुराफे हुंदक्यावर हुंदके देऊं लागला. ! त्याला बोलता येईना. सारा वर्ग स्तब्ध होता.

'काय झालं याला?' मास्तर साऱ्या वर्गाला उद्देशून म्हणाले. सारे गुपचूप बसले होते. चिंतू बेपर्वाईने सगळीकडे बघत होता. चंद्रू भाले पुस्तकांत दृष्टि खिळवून बसला होता. दूर अंधाऱ्या कोपऱ्यांत बिशूच्या शेजारी बसलेला बबड्या प्रधान चुळबूळ करीत स्वस्थ बसला होता. बिशूच्या गळ्यांत आवंढा अडकलेला होता. !!

'भिऊं नका! कोण सांगते आहे मला? किती लागलं आहे पोराला !! तुमच्या सोबत्याला लागलेलं बरं वाटतं तुम्हाला?'

'मी सांगतो सर !!...' कोपऱ्यातून कांपरा आवाज आला.

मास्तरांनी चकित होऊन कोपऱ्याकडे पाहिलं. दोन पाणीदार डोळे त्यांचेकडे बघत होते. आवाज कापरा पण निश्चयी होता. बिशूकडे कौतुकानं बघून ते म्हणाले—'सांग....'

'हा चिंतू वझे !! यानं दुराफेला मारलं, यानं माझ्या गालांतून रक्त काढलं....हा रोज मुलांना मारतो....'

'पण मास्तरांना नाहीं सांगितलं कुणीं...?'

'मास्तर रागवतात नि सोडून देतात त्याला....हा भयंकर छळतो सर....हा फार वाईट आहे सर....फार मारतो हा सर....सर !!'

विश्वासच्या डोळ्यासमोर वर्ग तरंगू लागला. त्याचे पाय लटपटू लागले. सरते शेवटीं त्याचा धीट स्वर एकदम केविलवाणा झाला.

सारा वर्ग शांत बसलेला होता. मास्तरांचा चेहरा गंभीर झाला होता. 'खरं आहे हे दुराफे?'

'हो सर!' दुराफे हुंदके देत देत म्हणाला.

मास्तरांच्या ओठावर नुकतीच मिस्कुड फुटली होती. त्यांच्या सौम्य चेहऱ्यावरून एक प्रकारची गडद छाया सरकत गेली. त्यांनी वझेकडे पाहिलं. तो दांत ओठ चावीत होता. रागानं लालबुन्द झाला होता.

डोळे वटार वटारून धमकी देत होता.

‘ उभा रहा चिंतू ’–मास्तरांचा स्वर अतिशय करडा झाला होता.

‘ तूं मारलंस् याला ? ’

चिंतूनं उत्तर दिलं नाहीं. त्याच्या कपाळावर अनेक आठ्या पडल्या. तो उर्मटपणानं मास्तरांकडे बघूं लागला. कांहीसं पुटपुटूं लागला. फक्त छाती काढून उभा मात्र झाला.

‘ मी काय म्हणतोय्....!! ’

चिंतू उघड उघड दांत ओठ खाऊं लागला. हातपाय आपटूं लागला. मास्तरांनीं खालपासून वरपर्यंत त्याला न्याहाळून पाहिलं.

‘ कां मारलंस तूं दुराफेला, त्या बिशूला ? ’

‘ नाही सांगत जा !!! ’

त्याच्या पोटरीवर साडकन् छडीचा फटकारा बसला. चिंतूचे डोळे लालबुंद झाले होते. त्यानें पाय झाडले.

‘ सांग...सांग....’–आणि खरेंच मास्तरांचा चेहरा पार बदलून गेला होता. त्याच जागीं फिरून सडासड मार पडूं लागला नि वळ उठूं लागले. चिंतू एकदम खाली बसला नि त्यानं गुडघ्यांत मान घातली. केसांची झुलपं त्याच्या तोंडावर लोंबूं लागली. त्यांतून बघत तो ओरडला—‘ मारून घे....मारून घे ’

त्याच्या उद्धट उत्तरानं सारा वर्ग चरकला. मास्तर क्षणभर थबकले; मनांत खोलवर चरकले. ते भराभर त्याच्या पाठीवर कोरडे ओढीत त्याला म्हणाले—‘ हो बाहेर !! ’

आपलं कातडी पाकीट घेऊन तो वर्गाबाहेर जाऊं लागला. खालचा ओठ त्यानं घट्ट आवळून धरला होता. तो रडक्या सुरांत जाता जाता ओरडला—‘ बघून घेईन. ’

तेवढ्यांत घंटा झाली. शाळा सुटली. पांच मिनिटांत सारी इमारत रिकामी झाली. बिशू मात्र इमारतीतच घोटाळत होता. मोठ्या प्रचंड दरवाजाबाहेर पांच दहा मिनिटानंतर बाहेर पडायचं त्यानं ठरवलं होतं. कांही वेळानंतर तो हळूच बाहेर पडला. इकडे तिकडे अगदी नीट निरखून बघितलं नि धूम पळत तो—महाराजवाड्याच्या समोरच्या दगडी उतारांकडे न वळता—जुन्या मोठ्या बोळांतून धांवत त्याच्या तोंडाशी आला. तिथं क्षणभर थबकला. गळ्यांतील पाकीट त्यानं नीट सावरलं. दचकून त्यानं मागं पाहिलं. मग कपाळावरचा घाम बाहीनं पुसला. समोर खाली बघितलं. लांबच लांब साठ पासष्ट दगडी पायऱ्या उतरायच्या होत्या. त्या उतरून हरसिद्धि तलावाच्या वाटेवर जाता येत होतं. तो ओलांडला की आपला बोळ. बोळांत शिरतांच मग भय नाहीं; मग आपलंच राज्य ! सहज घरी पोंचता येतं.

बिशू भराभर पायऱ्या उतरला. त्याचे काटकुळे पाय धुळीनं माखलेले होते. कुडत्यांतून त्याचा किरकोळ बांधा अधिक जाणवत होता. एकदम उडी मारून त्यानं शेवटली पायरी गाठली नि बोळाकडे एकदम धूम ठोकली !!

पाठीमागून त्याच्या शर्टची कॉलर खस्कन ओढली गेली.

भीतिची एक चमक त्याच्या शरीरांतून आरपार निघून गेली. तेवढ्यांत त्याच्या पाठींत जोराचा गुद्दा बसला. त्याला भोंवळ आल्यासारखे झाले. त्याने भेदरून मागें पाहिलें. संतापाने लाल झालेला चिंतू वझे समोर उभा !!

वझेचा अवतार पाहून बिशू मनांत अतिशय चरकला. त्याचे पाय लटपटूं लागले ! पण एका क्षणाचाहि विचार न करता डोळे मिटून तो वझेच्या अंगाला झोंबला नि त्याच्या पोटाला कडकडून डसला.

बिशूच्या पाठीवर बुक्क्यांचा वर्षाव होऊं लागला. पण त्याला कशा-चंही भान नव्हतं. सुडाच्या धुन्दींत तो त्याच्या पोटाशी जळवेसारखा चिकटून बसला ! वझे ओरडला—

' सोड साल्या सोड ! नाही तर आज जान घेऊन टाकीन तुझी !'

रागाने तो बिशूला जोरानें बडवूं लागला, खिंकाळूं लागला. त्याचे मोठाले दात घोड्यासारखे बाहेर दिसूं लागले. बिशूला आदळून त्याला तो तुडवूं लागला.

आपले संपूर्ण बळ पणांस लावून वाढलेल्या नखांनी बिशू त्याच्या तोंडावर जोराने ओरखाडे घेतच होता. वझेच्या गळ्याला, छातीला, दंडाला, जिवाच्या आकांताने डसत होता. भयंकर द्वेषाच्या विखारानें त्याच्यांत विलक्षण बळ संचरलं होतं. त्याच्या कुडत्याच्या चिंध्या चिंध्या झाल्या होत्या ! पण तो हटणार नव्हता ! डरणार नव्हता !!

शेवटी वझेनं धडपडत्या बिशूला उंच उचलून धरलं आणि दुसऱ्या क्षणीं दूरवर भिरकाऊन दिलं. भयाची एक किंकाळी बिशूच्या गळ्यांत घुटमळली. जमीनीवर आदळताच हातीं लागलेला दगड त्यानंहि तित-क्याच वेगांत वझेकडे फेकला. !!

वझे मटकन् खाली बसला होता. आपले दोन्ही हात त्यानें एका डोळ्यावर दाबून धरले होते अन् घट्ट रक्ताचे थेंब जमीनीवर टप टप पडूं लागले.

बिशूनं हे पाहिलं नि घराकडे तो धूम पळत सुटला !

तो दाराशी उभा झाला. तेव्हां करकरीत तिन्हीसांजा झाल्या होत्या. त्याच्याहि गालावरुन रक्त वहात होतं. गुडघे फुटलेले होते. हातांत बस्ता नव्हता !

त्याला पहातांच रमाबाईचा चेहरा अतिशय व्याकुळ झाला. ' हे

काय ? '—त्यांनी अस्फुट किंकाळी फोडली !!

: १२ :

बापूंचं धोतर, बिशूची चड्डी, आईची नि स्वतःची धुणीं बादलीत भरायची नि दुपारी तीनच्या सुमाराला बादली उचलून हळूहळू किंचित् दूर असलेल्या विहिरीवर जायचं. सगळीकडे तेंव्हा अगदी शांत असतं. आकाश निळं निळं असतं नि माळव्यांत नेहमी वाहणारी मंद सुगंधी झुळुक अंगाला क्षणोक्षणीं बिलगत असते. रमाबाई चौघडीवर निवांत झोपतात. घरांतलीं वर्दळ संपलेली असते. तेंव्हा सुमीच्या मनांतली हुरहुरती बाळी बाहेर येते. गालावर हात ठेऊन खिडकी शेजारी एकली बसते. खोलीच्या कोपऱ्यांत देवाच्या तसबिरी शेजारीं उभी राहून सीतेच्या प्रफुल्ल मूर्तिकडे टक लावून बघत राहते. मनांतला दरवळ सूक्ष्म खिन्नतेनं भारावतो. तेंव्हा पलीकडच्या घरांतील हिरवागार गंगाराम बोलतो—' चित्रकोटी...चित्रकोटी !!

त्याचा स्वर एकांताच्या निळ्या आशयांत रेशमी लाटा पसरवतो. नि मग बादली उचलायला स्वैपाकघराच्या मागल्या न्हाणींत जायचं. तिथं गच्ची नाही, पण लांबच लांब पत्र्याचं छप्पर आहे तिकडे पहायचं. पत्र्यावर मागल्या अंगणातल्या प्रचंड पिंपळाच्या डहाळ्या वाकून आलेल्या असतात. हिरवी हिरवी पिंपळपान ! पिंपळपानं हालूं लागतं ! अगदी मंद मंद. हिरव्या गंगारामांचा थवाच्या थवा उडतो नि दूर दूर उडत उडत जातो. तिथं डहाळ्यांच्या आडून दिसतं—खालीं कमळी काम करते आहे ! गरीबांच्या घरी नक्षत्रासारखी तळपते ती ! मेंदीनं तळहात लालचुट्टक करायला रोज येते वर !

ती हलुहलूं गुणगुणते—‘ गवळण करते म्हाणं धुणं !....सोड हरी पदर ऽऽ ’

एकांतातल्या माधुरीच्या धूपांत मनाची बाळी लाटेसारखी लहरू लागते.

खिन्नतेच्या निळ्या धुक्यातून तांब्याची गुलाबी भांडी लखलखतात. कानावर आलेले केस दोन्ही हातांनी मागं सारायचे; भिंतीवर डकवलेल्या आरशांच्या टिकलींत कुंकू सारखं करायचं नि त्या गोऱ्यापान चेहऱ्याकडे डोळे मोठाले करून बघतां बघतां कसलासा संकोच वाटायचा नि अंगावर पहिरलेलं पुलकाचं दंव, —मण्यानं मढवलेलं गवताच्या पानानं टिचकी मारली की सारं दंव झाडून टाकावं तसं—अंग मोडून, झाडून टाकावं, मग ‘ इश्श्य ऽऽ ’ असं म्हणून फुटूं पाहणारं हसूं रोकायचा प्रयत्न करताना अंग अंग कदंब वृक्षासारखं महिरून यायचं. अडीच वाजायच्या एकांतांत सुमा एकली धुण्याच्या बादलींशी उभी....!

लुगड्याच्या निऱ्या नीट वर खोंचल्या. बादली उचलतांच तनू एका बाजूला छडीसारखी वाकली नि पायांच्या टांचा लालचुटुक झाल्या. केसांच्या लांब लांब बटा फिरून लोंबायला लागल्या कपाळावर ! बादली संभाळीत हळूहळूं विहिरीकडे ती निघाली.

विहिरीवर शुकशुकाट होता सारा. खरखरीत दगडावर कपड्यांचे बोळे धुतां धुतां तंद्री लागते. मधुदादाचे कपडे नसतात धुवायला.... धोब्याकडं देतो तो ! स्वच्छ इस्त्रीचे कपडे हवेत ना ? दादा म्हणजे काय जसा वळवाचा पाऊस ! शिळंधार पडेल. नाहीतर महिनेन् महिने रखरखीत उन्हाळा ! खूप माया आहे त्याला हो ! पण माई म्हणते त्याला समज नाही !

पण माझ्यावर नाहीं रागवत कधीं तो...

वाऱ्याच्या झुळुकीनं केस कपाळावर येतात. ते तिनं दंडानं मागे सारले. दूरवर बघितलं. तरी मनांत पसरलेली गूढ खिन्नता हटेना !

मुमी जरा मोठ्यानं गुणगुणूं लागली—

पाठच्या बहिणीवरी। भाऊ का रागावेल।
रंग का बदलेल। आकाशाचा। पाठच्या बहिणीवरी।
जरी रागावेल भाऊ। तरी म्हणेल कोण राहूं। संसारांत।

मन भारावलं....ओथंबलं....कुठं जायचं ? भलतंच....कुठं जायचं म्हणजे काय बाई ?

लालचुटुक झालेल्या हातांनी कापड पिळलं नि कोरड्या स्वच्छ जागी ठेवलं....बिशूचा सदरा ! केवढा फाटला आहे हा ! याला रफू करायचं रात्री बसून. एवढाशीशी मूर्ति....पण मोठा समजूतदार आहे अरं का....काय काय डोक्यांत चालतं कुणास ठाउक...किती अशक्त नि वाळलेला आहे पोर....! मला नव्हतं का एवढसं लागलं परवा, भांडच पडलं की अंगठ्यावर....नि बिशूच्या डोळ्यांत पाणी उभं राहिलं. मुंगीलाहि नाही दुखवायचा कधीं....जसजसा मोठा होतोय् तसं तसं नि परवां कसं केलं कुणास माहित ?

कपडे धुण्याचा प्रतिध्वनि दुरुन दुरुन येतोय्. विहिरीच्या पाळीवर वाकून उभं आहे कण्हेरीचं झाड. लालभडक फुलं....आंत विहिरींत बघितलं कीं कशी घेरी येते. पण आंत कसं थंड, शांत दिसतं नाही ? पाणी आपल्या विहिरीचं किती गोड....त्यांत कण्हेरीचं फूल तरंगतं. दोरीला झटके दिले कि बादली उलटीपालटी होते नि पुरेपूर भरलेल्या बादलींत तें लालफूल तरंगत वर येतं. विहिरीच्या कठड्यावर रेलून आंत बघावं....हळूंच आवाज द्यावी....' कोण ' ? हळूच परत

आवाज येतो ' कोण ' ?....अन् मग अगदी अनावर हसूं येतं. उगी-चच येतं नि विहिरीतून मंजुळ मंजुळ हंसण्याचा झंकार उमटतो !

कित्ती खोल असेल विहीर....नि मधोमध तरंगणारं कण्हेरीचं लाल फूल....पाण्याच्या लाटांनी ते हालतं...सारखं हालतच राहतं.

नि उगाचच आपलं हसायला येतं. झिम्मा खेळावासा वाटतो.... वाटतं दोन्ही हात धरावे त्या शेजारच्या कमळीचे नि फुगड्या खेळाव्या सारख्या. अगदी घेरी येईपर्यंत बरं का....नाहीतर क्षिप्रेच्या हिरव्या लाटांवर आपलं चालत जावं.... ' इश्श ' ! अन् माझे बापू काय म्हणतील ! आई काय म्हणेल ? '

' झालं का हो धुणं सुमाताई ? '

सुमीनं मागं वळून पाहिलं. केकऱ्यांचा कमळी येत होती. हातांत धुण्याची बादली भरून....

' छेः हो ! एवढ्यांत कुठून ? तुम्हाला उशीरसा झाला ? '

कमळाबाईच्या तोंडावर एक प्रकारचा आल्हाद पसरला. नवतरणा चेहरा टवटवीत झाला !

' आज हे गेले नाही ना ऑफिसांत ? किंचित ताप आला आहे यांना. म्हणत होते काम करूं नको ! बोलत बैस. आपण बोलत बसूं-सासूबाई बाहेर गेल्या होत्या म्हणून बरं आपलं....' कमळाबाईचा चेहरा लाली लाल झाला होता.

' नुसत्या गप्पा करता करता झाला एवढा वेळ !! '

सुमी कमळाबाईकडे बघत राहिली. तिच्या पाकळीन् पाकळी उमललेल्या फुलासारख्या चेहऱ्याकडे बघून सुमीचा चेहराहि अजाणता आरक्त होऊं लागला. एकाएकी डोळे लाजेनं खाली गेले. सुमा फिरून बोळे दगडावर आपटूं लागली. कमळी धुणं आपटूं लागली. कपडे

आपटण्याचा आवाज सगळीकडे दुमदुमूं लागला. अगदी एका ताला-वर धुणं धुतलं जात होतं. एकाच तालावर सुमीचं मनहि हालत होतं.

कमळीनं मधेंच धुणं थांबवून विचारलं—' कशी आहे बिशूची तब्येत आतां.... ? '

ढगांच्या निळींतून केस सावरीत नि सुखाच्या विव्हलतेनं शुभ्र अश्रू ढाळींत फिरणारी कोणी एक लकेर पुसट झाली, नाहिशी झाली. जवळ जवळ ऐकूं येणारी एक लकेर फिरून क्षीण झाली. सुमीचं तालावर हलणारं शरीर थांबलं. कमळेकडे तिनं पाहिलं नि फिरून तिची दृष्टि पायावर खिळली.

' बरा आहे आतां तो ! सडकून ताप भरला होता त्याला मागें दोन दिवस ! काहीच्या काहीच बरळत होता. काय झालं काही सांगेना धड. सारं अंग कसं ठेचून निघालं होतं. बापू नि आई उशाशी बसून होती !! आज तर शाळेंत सुद्धा गेलाय् तो.

' हं !! '

धुण्याच्या तालावर शरीरं हालूं लागलीं. फिरून धुण्याचा आवाज दुमदुमूं लागला.

' पण मी म्हणते ! एवढा सालस पोर, कसंबाई मारलं त्यानं त्या मुलाला कुणास ठाऊक. !! म्हणे बिशूनं दगड मारले नि कोण वझे कि फझे—त्याचं कपाळ फोडलं !!

सुमीच्या डोळ्यासमोर बापूंचा चिंताग्रस्त चेहरा दिसूं लागला. आईची ओढलेली मुद्रा दिसूं लागली. तिच्या डोळ्यांत कासावीस-पणाचा भाव तरळला. जणूं लांबच लांब छायेंत आपण गुरफटले जात आहोत असे तिला वाटायला लागलं.

' बबड्या आहे ना तो ! तो सांगत होता. तो वझे आहे ठाणेदा-

रांचा मुलगा....फारच अडदांड. खूप छळायचा आमच्या बिशूला तो. ठाणेदार बापूंच्या चांगले परिचयाचे, बरं का कमळाताई !! त्या चिंतूला डॉक्टरांकडे जावं लागलं नि पट्टा बांधावा लागला. बापू गेले होते त्यांच्याकडे. ठाणेदार साहेबांनी म्हटलं देखील–' बापू तुमच्या मुलाला आवरा !! ' त्यांनी चिंतूस बापूंसमोर उभा केला. चिंतूच्या मानानं बिशू म्हणजे अगदी किरकोळ...आधींच ठेंगणा नि काटकुळा... चेहरा तरी केवढा गरीब....!! बापू सोबत बिशू होता. पण ठाणेदारांना वाटलं होतं कि असेल कुणी अडदांड मुलगा!! त्यांचं त्याच्याकडे लक्षदेखील नव्हतं बरं का !! बापू म्हणाले–' हा बघा माझा मुलगा. याचंहि सारं अंग चेचून निघालंय.'

' बापू मोठी गंमत सांगतात बरं का....'--सांगता सांगता सुमीचा चेहरा उजाळला.

ठाणेदारसाहेब अगदी चकित झाले. म्हणाले–' हा का तुमचा बिशू ? ' त्यांनी आपल्या मुलाकडे पाहिलं. तो पट्टा बांधून उभा ऐटींत....मग आमच्या बिशूकडे निरखून पाहिलं. बिशूला म्हणाले– ' ये बाळ ! फार लागलं का तुला ? ' मग चिंतूला करड्या सुरांत ते म्हणाले–' जा आंत नि चहा करायला सांग. पानं आणा म्हणावं. ' बिशूला कुरवाळीत ते म्हणाले–' फार लागलं का रे बाळा तुला ? ' मग ते बापूंकडे बघत म्हणाले–' बापू ! पोर फार अशक्त दिसतो. काळजी घ्या बरं त्याची. ' बापू म्हणतात ' ठाणेदारसाहेबांना सगळं समजतं !! ' सुमी असं म्हणून पिळा बादलीत खळखळूं लागली !! ती एकाएकी अबोल बनली.

उन्ह जरा कलली होती. दोघी बादल्या घेऊन परत निघाल्या दोहोबाजूंकडे वाकलेल्या दोन वेळूंप्रमाणं त्यांचीं शरीरं दोहोंबाजूंच्या

बादल्यांवर वाकलेली होती नि झाडांच्या छाया पाठीवरून सरकून जमीनीवर पडतां पडता अधिक गहिऱ्या झाल्यासारख्या वाटत होत्या !

## : १३ :

करकरीत तिन्ही सांजा झाल्या. सात वाजले. आठ वाजले. रमाबाईंनी निरांजन लावलं. पण त्यांतलं तूप देखील सरून चाललं. उदबत्ती जळून जळून अगदी एवढीशी उरली होती. पोरांची जेवणं चालू होती. रमाबाईचं कामांत लक्ष लागेना. सुमे ! बाई तू बस आज पोळ्या करायला–' असं सांगून त्या बाहेर पत्र्याच्या छतावर जाऊन बसल्या. अंधारांत गल्लीतल्या वळणावरचा कंदील दिसत होता, तिकडं डोळे लावून बसल्या त्या. पण कोणीच दिसेना.

बापू ऑफिसांतून अजून आले नव्हते.

एरव्ही पांच साडेपांचपर्यंत मंडईतून भाजी घेऊन घरी आलेले असायचे ते. रमाबाईचं मन अतिशय उदास झालं होतं. अंधारांत त्या एकट्याच बसून होत्या. हलुहलूं त्या मंद आवाजांत म्हणूं लागल्या–

' धांव रे राम राया, किती अंत पहाशी !
प्राणांत मांडियेला, न ये करूणा कैशी ! '

हलुहलूं आळवून आळवून, घोळवून घोळवून म्हणतां म्हणतां त्यांचे डोळे भरून आले. त्या बसून राहिल्या. अंधाराकडे बघत नि बापूंसाठी त्यांच्या कणांकणांतून धांवा सुरू झाला होता. त्यांना दिसं लागलं.

अगदी अंधुक अंधुक दिसतो तो मोठा वाडा नि त्याच्या मधल्या अंगणांत रमी नि तिला आवडणारा शेजारचा नारायण,...किती गोरा

पान पोर नि केस कसे सोनेरी भुरके....रोज खेळ, रोज भांडण, रोज हट्ट ! त्या अंगणाचा वरांडा असाच अंधुक दिसतो. त्यांत एक पासोडी डोक्यावरून पांघरुन सारखे येरझारा घालणारे, कपाळभर गंध लावणारे पांढऱ्या मिशावाले म्हातारे—तिचे आजोबाच ते. समोर पेटीशी बसलेले, उभं विष्णूचं गंध लावलेले, लांब लांब काळ्या मिशावाले गृहस्थ—त्यांच्याच वाड्यांतले, नारायणचे वडील ते ! रमा अंगणांत खेळतेय्. नि नारायण ? आजोबा म्हणाले—'गोपाळा ! बघ तर खरा अंगणांत ! कसा छान जोडा शोभतो ! नाही ?' गोपाळराव फक्त हंसले ! तेवढ्यांत रमी आजोबांना बिलगली. तिला उचलून घेत आजोबा म्हणाले—' रमी ! करतेस लगीन नारायणशी ? नारायण तुझा नवरा बरं का ग ' रमी आनंदानं टाळ्या पिटींत स्वतः भोंवती गरगर फिरूं लागली. शेजारी पाजारी धांवत गेली. ' नारायण माझा नौरा.... नारायण माझा नौरा....' नारायण कुठे होता ?

ती नारायणच्या घरांत गेली नि वळकटीवर उड्या मारुं लागली. नारायण कोपऱ्यांत अगदी शांत बसून तिच्याकडे बघत होता.

अन् अजून परकर घातलेली अकरा वर्षाची तरतरीत काळी सावळी रमी चिंचेच्या झाडाखाली खेळतेच आहे. सांज असलेली. पण तिचं तिच्या भावंडांशी खेळणं संपेल तेव्हा ना ! केसांच्या नुसत्या झिंज्या झालेल्या ' वरून गणू—तिचा चुलत भाऊ चिंचा फेकतोय् नि ही त्या खातेच आहे. रमीच्या आईनं शंभर वेळां सांगितलं—'अग, आज नारायण, तुझा नवरा यायचाय ना ? नीट लुगडं वगैरे नेस आज अग ए....अग ऽ ऽ काय बाई खट्याळ मुलगी ही....नारायणला मुठींत ठेवील बाबा ही. '

पण रमी परकर नेसून चिंचा खाण्यात दंगच. दूरवर बैल गाड्यां-

च्या घुंगरांचा आवाज ऐकूं येऊं लागला. ‘ ए...पोरी ऽऽ चौकीदारानं दारांत येऊन सांगितलं देखील—‘बाईसाब् गोपाळ भैया, नारायण भैया आगये !! ’ दूर लाल आकाशांत बैलांची धूळ उडूं लागली. आईनं धांवत येऊन रमीचा हात धरला—‘ अग ऽऽ चल चल घरांत...’ रमीनं आईचा हात झटक्यानिशी सोडवून घेतलाय्. धूम पळत सुटली ती बैलगाड्यांच्या रोखानं. नि बैलगाडीच्या मागे जाऊन आनंदानं ओरडूं लागली—‘ आई ! खरंच आला नारायण. नारायण....’ नि वळकट्या खाली उतरीत गोपाळ भैया हंसू लागले. नारायण शांतपणानं तिच्यासमोर उभा झाला. केवढा उंच झालेला. डोक्यावर गोल कत्थई टोपी नि चड्डी घातलेली—आनंदानं नारायणचे डोळे चमकत होते.

मधें काळ संथपणानं सरकला. नारायणचे वडील निवर्तले तरी त्या मोठ्या वाड्यांत तो वडिलासारखांच भाड्यानं राहूं लागला नि तहसिलींत कारकुनीची त्याला नौकरी लागली. रमाचं घर म्हणजे श्रीमंताचं घर....ऑफिसांतून आला कीं नारायण उदास दिसे. सासरहून आलेल्या वस्तु तो तिऱ्हाईत शून्य नजरेनं पाही. रमीच्या नजरेंत खोलवर तो बघे. पहाता पहाता त्याची मुद्रा हंसू लागे—‘ म्हणे काहीं हरकत नाही !! राहूं इथंच !!

एक दिवस रात्री अशीच आठ साडेआठच्या सुमारास माहेरी—म्हणजे शेजारीच—ताक घ्यायला गेली नि पडवीतच थबकली. तिचे आई नि वडील आंत नारायणाविषयीं बोलत होते.

‘ काडीइतकं व्यवहारज्ञान नाहीं त्याला. घरी गाथा वाचतो सांज सकाळ नि ऑफिसांत मान खाली घालून काम करतो. मी कित्येकदां म्हटलं बरं का हो त्याला कीं जरा तहसिलदार साहेबांशी

सलोखा ठेवा म्हणून. ओळखदेखील करून दिली त्याची–पुढं वाढेल नि सुपरडंट होईल हपीसांतला तरी आपल्या तोलाचा होईल. सतरा लोकांत मांन खाली घालावी लागते मला. '

'मामंजीचं कवतीक झालं नि रमीच्या हे अठरा विश्वे दरिद्री घर पदरांत पडलं ! मी एवढी रडले. हट्ट केला कीं चांगलं श्रीमंत स्थळ पहा ! पण रामाचं नांव घ्या ! पण तुमची मामंजी समोर मात्र नांगी पडायची. आतां घ्या पोसा जन्मभर घरजांवई.... अग ऽ बाई ! रमी आली वाटतं. '

रिकामा गडवा घेऊन रमी आल्या पावली परतली नि स्वस्थ बसून राहिली. आजोबांचा एक पिंवळसर फोटो कुणीतरी काढला होता. तो ट्रंकेंतून काढला नि पहात बसली. नारायण शांतपणानं झोपी गेला तरी रमी बसून राहिली. कंदीलाची वात तशीच जळत होती. ती हळूंच नारायणच्या बिछान्याशेजारी गेली नि त्याच्या चेहऱ्याकडे निरखून बघूं लागली. तिचं ऊर धडधडूं लागलं ! दाटून आलं ! त्या शांत झोपलेल्या चेहऱ्याकडे बघतां बघतां डोळे मुग्ध-विव्हलतेने शिगो-शिग भरून आले !!

मध्यरात्रीं नारायणाला जाग आली. त्याच्या पायावर टपटप् अश्रू गळले होते. त्यांचा चटका त्याला बसला होता. त्यानं चकित होऊन उठून बसत म्हटलें–' हें काय ? अगं ! असं काय करतेस बरं ? अश्रूंतून रमाचे डोळे नारायणच्या सर्वस्वाला स्वतांत सामावूं पहात होते.

' काय झालं ? '

' उद्यापासून गावांत दुसरं घर बघायचं गडे !! '

नारायण अतिशय चकित झाला ! पण रमेच्या चेहऱ्याकडे बघत तो म्हणाला–' बरं ! नक्की ! '

नि थोड्या वेळांत तो झोपी देखील गेला.

त्यानंतर बैलगाडींत फक्त नारायणच्या मालकीची चीजवस्त भरली गेली व तिला नव्या घराकडे चालूं करायला रमा पुढं झाली होती. तो घरांतला आकान्त, समजूत घालण्याच्या खटपटी, सारंसारं वाया गेलं ! नव्या घरांत प्रस्थान ठेवायला हातांत कलश घेऊन पुढे पुढे रमा होती नि मागे नारायण होता.

आणि त्यानंतर गुलाबाला स्वतःच्या काळजाच्या रक्तांनं फुलवीत मंदिराला विराट वडाप्रमाणं चारीबाजूनी झांकून त्याचं रक्षण करीत नि आंतल्या मूर्ति समोर निरांजनाच्या ज्योतिसारखं जळत नि जगत स्वतःच्या कुशींतून त्याच प्रतिकृति निर्माण करीत....

वेळोवेळीं निर्वाणीचा प्रसंग उद्‌भवे नि 'धांवरे रामराया' म्हणत रामरायाला साद घातली जाई. नारायणरावांची—बापूंची—बदली कुणी दुष्टपणानं फत्तेगडाला केली होती. ती काळरात्र, बैलगाडीला पोंचता पोंचता अंधार पडला होता. तेव्हा पोटांत मधुकर होता. गाडीचीं चाकं उंच उंच दगडी टोलांवर निसटत—घरंगळत....पुढे दोन हातावरचं कांहींच सुचत नव्हतं–नि पुढं बांधलेल्या कंदीलाचा लाल पिंगट प्रकाश गोटून भुसभुसींत होऊन गळून पडत होता. किर्र जंगलांतून चाललेल्या बैलगाडींत बापू शेजारी रमाबाई पोटांतील पीडेनं कण्हत होत्या. त्या अंधुक प्रकाशांत बापूंनी हात कसा घट्ट धरून ठेवला होता. 'घाबरू नको ! मी आहे ना....!' नि एरव्ही मवाळ बापूंच्या 'मी आहे ना' शब्दांतील आश्रयाचा कण न् कण खरा-खुरा ठाशीव होता. त्या शब्दाचं सामर्थ्य स्वतःच्या रोमरोमांनी पीत रमाबाईला नवाच जोम येत होता !

—आणि एरवीं कधीं न घाबरणाऱ्या रमाबाई आज जवाभावानं

आळवीत होत्या—‘ धांवरे रामराया....किती अंत पहासी ऽऽ !’

दूरवर मंद मंद जड पावलांनी जिना हादरूं लागला. बिशू ऽऽ सुमे ऽऽ अशी खालून खोल गेलेली एक हांक आली. न कळत आलेले अश्रू लगबगीनं पुसून रमाबाई घाईघाईनं दाराशी गेल्या !

समोर हंसत हंसत बापू उभे ! अगदीं घामाघूम झालेले, उपरणं गळ्यांत कसंतरी गुंडाळलेलं ! बगलेंत काठी....दोन्ही हातांत दोन शिगोशिग भरलेल्या पिशव्या, असा थाट !

‘ बघितला आमचा थाट !’ —बापू आंत जाऊन वळकटीशी बसले देखील—

‘ अग ऽऽ ! ये अशी समोर बैस बघूं....बघ तर खरी आज ’ —बापूंनी दोन मोठमोठी चांगली लुगडीं रमाबाईंच्या समोर पसरली.

‘ पहा बुवा तुला आवडतात का ? ’—दुसऱ्या पिशवींतून बापूंनी नवं कोरं कापडाचं बंडल काढलं....एक साडी काढली —‘ ही सुमी-बाईची साडी....बिशू-मधूला शर्ट, चड्डी नि धोतर ’

रमाबाई मूर्तीसारख्या खिळल्या होत्या. कंदील मघोमध होता. त्याच्या प्रकाशांत बापूंचा चेहरा हंसताना लालीलाल पडत होता. !!

‘ अग ऽऽ माझी पगारवाढ झाली ना ! ती गेल्या दोन साला-पासून धरण्यांत आली ! त्याचे सारे पैसे आज मिळाले शंकरजींच्या कृपेनं !....पिशव्या नाहीत, कांही नाही ! वामनरावांकडून पिशव्या घेतल्या....तर तिथं केवढा उशीर झाला नि मग केली सारी खरेदी ....कशी काय साड़ी आहे सुमे ! नि बिशू....आहे कीं नाही गंमत ....अग ऽऽ कश्या आहेत साड्या ? किती दिवस फाटक्या नेसशील आणखी ! ’

रमाबाई झटकन उठल्या नि छातीत दाटलेल्या हुंदक्याला स्वयंपाकघरांत वाट करून दिली.

## : १४ :

बिशू शाळेंत जायला निघाला. जवळ जवळ धावतच होता तो! तोंडानं तो पुटपुटत होता—श्रीराम जयराम; श्रीराम जयराम!

शाळेंत पोचायला उशीर झाला कीं बिशू हाच मंत्र पुटपुटत शाळेंत धावत जातो! नि तो पोचल्यावर मगच घंटा होते! त्याचा नेहमीचा ठोकताळा आहे हा! वझेशी भांडण झालं त्या रात्रीं बापू त्याच्या उशाशी रामरक्षा म्हणत असले होते! ते म्हणाले—शंकरजी सर्व पाहतात! पोराला फार लागलं बिगलं नाही ही ईश्वराची कृपा! मग भस्म घेऊन त्यांनी बिशूच्या कपाळाला लावलं होतं!—आणि दुसऱ्या दिवशी बिशूचा ताप उतरला होता! रामकृष्णाचीं स्वप्नं देखील त्याला पडत असत. एकदा रविवर्म्यांच्या रामचंद्रानी त्याला उचलून घेतलं होतं.

आतांहि तो धांवता धांवता पुटपुटत होता—श्रीराम जयराम श्रीराम जयराम!

वझेशीं मारामारी नंतर त्याच्या मनाला मुकी जखम झाली होती. बापूंनीं त्या रात्री जवळ घेतलं. तेव्हां दोन हातांनी त्यानं तोंड झाकून घेतलं! 'काय झालं तुला? कुणी मारलं तुला? सांग....सारं सारं सांग....मी त्या मुलाच्या वडिलांना सांगेन!'—बापूनी विचारलं होतं. आपण स्वतः वझेला भयकरं मारल्याचं सांगणं त्याच्या फार जिवावर आलं होतं! खोटं सांगणंहि त्याला शक्य नव्हतं. त्याचं मनच त्याला फार खात होतं.

त्यानं मनाशीच अनेक वेळा विचार केला कीं सारं कांहीं ठीक झालं आहे! वझेलाच आपली चूक कळून आली! फार वाईट वाटलं.. तो म्हणाला—' मी तुला उगीच त्रास दिला. बघ देवानं मला शिक्षा केली ! माझा डोळा गेला !'

त्यानं स्वताचा एक खाच झालेला डोळा दाखविला ! बिशू अतिशय घाबरला.

' तूं छळलंस, पण मी कां मारावं ? तुझा डोळा गेला ना ! मी जाणून बुजून नाही केलं रे हें !'

मग वझे म्हणाला—अरे तो तर बरा होणार आहे !'

' अस्स ! मग ठीक ! '—बिशू आनंदाने म्हणाला !

अन् मग दोघे हातांतहात घालतात—नि म्हणतात—' चला ! फिरायला जाऊं !

बिशू म्हणतो—पण बबड्यालाहि घेऊं या बरोबर !

पण कल्पनेतलं जग कल्पनेंत विरून जाई. नि उद्या शाळेंत जायचं या विचाराने पोटांत भितीचा गोळा उठे ! बापू म्हणत असतील ' बिशूहि माझी आज्ञा मोडणारा निघाला. दुसऱ्याच्या मुलावर विनाकारण हात उचलला ! छेः शाळेंत गेलंच पाहिजे. नि भ्यायचं कारण काय ?'

बापू म्हणाले—' अरे ! तुझे हेडमास्तर भेटले होते. म्हणत होते, हुषार आहे बिशू....पण भित्रा....अरे शाळेंत जा तूं उद्या पासून शाळेत हें गेलंच पाहिजे.

गळ्यांत बस्ता अडकवून बिशू निघाला. वामन काकूकडे सुमी कसलासा निरोप सांगायला निघाली आहे. नवं लुगडं नेसलं आहे तिनं. वामनरावांची बायको सरस्वतीबाई ! त्यांना मधूदादा गमतीनं वामनकाकू म्हणतो ! बापूसुद्धा हंसले होते ! बिशूची तर मुर-

कुंडी वळली होती.

गोरीपान सुमाताई वैंगणी रंगाचं लुगडं नेसलेली होती. बिशूला फार साजरी वाटली ती. तो फुरंगटून म्हणाला–

‘ ए ताई ! माझ्या सोबत चल ना ! मग त्या बाजूनं जा वामन-काकूकडे ! ’

सुमी हंसली, म्हणाली–‘ छेरे ! आई म्हणतेय धावत जा नि पळत ये ! निरोप सांगून यायचाय् कमूच्या आईला !’

पण बिशूनं सुमाची पाठ सोडली नाहीं. तिला अडवत तो म्हणाला–
‘ ए ताई ! नाही जाऊं देणार तुला ! ’

सुमाताई मायेनं हसली, म्हणाली–चल बाबा ! मग्र् एक हट्टी नि तूं सातँ हट्टी !! ’ "

वडील बहिणीच्या सोबत जाता जाता बिशूला एकदम शरम वाटूं लागली. कुणी पाहिलं तर काय म्हणेल ? चिंतू वक्षेच्या भितीनं हा बहिणीच्या सोबतीनं निघालाय् असं तो दुराफे देखील साफ म्हणेल. बिशू एकदम थबकला....अडला

‘ ए ताई ! जा तूं आतां....नको येऊं माझ्या सोबत....जा. ’

‘ इश्श ऽ हे रे काय ? आता नाही जायची मी परत ! ’

पण बिशू जिद्दीस पेटला. वाटेंत अडून बसला.

‘ मी नाही येऊं देणार तुला सोबत बरं का ! खरंच जा तूं तिक-डून....’ बिशू जरा ओरडून म्हणाला.

सुमीचे स्वच्छ डोळे विस्फारले. तिच्या सौम्य चेहऱ्यावर नवलाचा भाव पसरला. ती बिशूकडे निरखून बघायला लागली. तिच्या पोटांत तुटूं लागलं. ती अडखळत म्हणाली––

‘ कशाला जायला सांगतोस. चांगली सोबत येत होतें. तुझ्या

बहिणीबरोबर चालायची लाज वाटते का रे ? '

बिशूचा जीव कासावीस झाला. तो मान हालवीत म्हणाला–' तसं नाहीं ! तसं नाही बरं ताई ! पण तूं जाच, त्याच वाटेनं परत जा. ' तो गवताची काडी चघळूं लागला. सुमीची नजर चुकवून दुसरीकडे बघूं लागला.

सुमी परतली. तिच्या पाठमोऱ्या आकृतिकडे तो बघत राहिला. त्याचं मन धांवत तिच्या मागोमाग गेलं. नि तिच्या पदरास बिलगून म्हणूं लागलं—' ए ताई ऽऽ माझी ! '

बिशूनं डोळे पुसल्यासारखे केले. मन खंबीर केलं. ' हो ! कर नाही त्याला डर कसली ? तो माझा सूड घेईल. पण आज मीहि मार नाही खाऊन घेणार. देव सारं पाहतोय. '

बिशू शाळेकडे धूम पळाला. प्रार्थना मास्तर मारकुंडे कजवाडकर उशीरा पोंचलों तर जीव घेतील हें त्याला नीट माहीत होतं. पण आज तो कुणालाच भिणार नव्हता. !

श्रीराम जयराम ! श्रीराम जयराम !! श्रीराम जयराम !!!

× × ×

घंटा होऊन गेली होती. त्याच्या पोटांत धस्स झालं. जोराने मंत्र पुटपुटत तो वर्गाबाहेर दाराशीं दबा धरून उभा झाला. हळूंच आंत नजर टाकली. खुर्ची रिकामी होती. त्याने दातावर ओठ घट्ट दाबून धरले नि बाणासारखा सरळ वेगाने ' हुप ' असें मोठ्याने ओरडून तो वर्गाच्या मधोमध दाखल झाला. घोळके पांगले ! क्षणभर सारे त्याच्याकडे कुतूहलाने बघत शांत उभे झाले ! नि मग एकदम ' बिशू आला ' म्हणून एकच कलकलाट झाला.

बिशू वर्गातला शूर गडी ठरला होता. सारे त्याच्या सभोवर घोळका

करून उभे झाले. त्याच्या खांद्यावर सर्वात आधी हक्काने हात ठेवणारा दुराफे होता. त्याच्या चेहऱ्यावर एक प्रकारचा भोळा प्रेमळपणा प्रकट होत होता ! बबड्या प्रधान मात्र जिथल्या तिथें बसला होता. त्याचे व्याकूळ डोळे मात्र विलक्षण आर्जवाने बिशूकडे बघत होते ! स्वतःचे ओठ नाजूकपणाने चींचोळे करीत बंड्र भाले त्याच्या शेजारी आला नि जराशा खुषामती स्वरांत म्हणाला—हा आला शेऱ्या आमचा !!

बिशूचा चेहरा अजून सावध नि तत्पर दिसत होता. हळूहळूं त्याचा ताण कमी होऊं लागला. सभोवारच्या कौतुक करणाऱ्या चेहऱ्यांचा परिणाम त्याचेवर होऊं लागला. त्याचा चेहरा उजळूं लागला. डोळे चमकूं लागले ! आपण दिलेल्या झुंजीचा हा परिणाम आहे हे त्याला खोलवर जाणवलें ! आणि त्याचा बाळचेहरा एकदम गंभीर झाला ! त्याने अधिकाराने खस्सकन् बंड्र भालेचा हात दूर केला नि समोर बबड्याच्या नजरेशी नजर भिडताच त्याने शून्यपणाने दुसरीकडे पहायला सुरवात केली.

'छान तंतरली तूं चिंत्याची !' दुराफे हळूच म्हणाला.

'आम्ही खूप हुर्यो केली साल्याची' एक जण पुढेपुढे करीत म्हणाला म्हणाला—

'मार खावं....पण लढावं....झगडावं....कुणाची मुजोरी नाही चालूं देऊं....जुलूम नाही सहन करूं....' अगदी नवीनच गोष्ट सांगत आहोत इतक्या खोल सघन परंतु व्यथित आवाजांत बिशू म्हणाला ! खरेंच त्याला नवेंच कांहीतरी गवसलें होतें. ! त्यासाठी त्याला भलती किंमत द्यावी लागली होती आणि जे गवसलें होतें तें त्याला वेदना देणारेंच होतें. 'खरं ना दुराफे ?' बिशूने विचारलें.

'होय रे होय !'—नंदी बैलासारखा मान हालवीत दुराफे म्हणाला.

'खूप मारलं कारे तूं चिंतूला ?' त्यानं भीत भीत खोलांत जायचा प्रयत्न केला.

आणि तेवढ्यांत चिंतू वर्गात शिरला ?

छाती ताठ पुढे काढून, गाल फुगवून, टोपी किंचित मागे सारून! दुराफे भटजींचा बिशूच्या पाठीवरचा हात लुळा पडून खाली लोंबूं लागला! बंडू भाले झटकन् शेजारून दूर झाला. यावेळीं बबड्याने मात्र दुरून टाळी दिली नि विचारलं—कशी काय तबेत आहे दिसायला !

बबड्याने मुद्दाम बिशूकडे पाहिलं, मग चिंतूकडे पाहिलं.

बिशूची नजर अतिशय उग्र झाली होती ! त्याची तशी नजर त्यानं कधीहि पाहिली नव्हती. चिंतू जळजळीत नजरेनं बिशूकडे पहात होता. हळूहळू त्याची नजर खाली गेली ! बिशूच्या बेदरकार नजरेला नजर द्यायचं अवसान गळालं होतं.

मास्तर आले. सारा वर्ग उभा झाला ! बिशू उभा झाला. त्याच्या मनांत निर्भयतेचा संचार झाला. तो ताठ उभा झाला. मास्तरांच्या सर्व प्रश्नांना तो उत्तर देणार होता.

÷ ÷ ÷

तो आज मुद्दामच एकटा घरीं परतत होता बराच उशीर करून. मागल्या वेळेसारखाच तो हळूहळू पायऱ्या उतरून खालीं आला. निंबाच्या झाडाशेजारीं येताच त्याच्या गळ्याशी स्पर्श झाला. बेदरकार चपळाईने तो एकदम मागे वळला. समोर केविलवाण्या चेहऱ्याचा बबड्या उभा ! बिशूचा चेहरा कठोर झाला. शांतपणे पाठ फिरवून तो घराकडे जाऊं लागला !

बिशू ऽऽ बबड्याची आर्त हांक आली. त्याच्या पोटांत तुटूं लागलं. तो मागे वळला.

एकदम त्याच्या गळ्यांत पडून बचड्या मुलीसारखा स्फुंदूं लागला.

## : १५ :

करकरीत तिन्हीसांजाची वेळ. घरांत दिवे लागणी झालेली. रमा-बाई महाकाळाला गेल्या त्या अजून परतल्या नव्हत्या. बिशू वळ-कटीशी स्वस्थ पडलेला. आज त्याला कुठंही जावेसे वाटेना. करकरीत तिन्हीसांजच्या वेळी बिशूला भयंकर हुर्हूरल्यासारखं वाटे. दूर रामाच्या मंदिरांत आरतीचा घंटानाद ऐकूं येत होता; त्याचा मंद क्षीण ध्वनि त्याच्या मनाची हुर्हूर सारखी वाढवीत होता. एवढ्यांत जिन्यांत पावलं वाजूं लागली. ‘ बापू आले !’ बिशूनं ओळखलं. पण तीं पावलं एकेक पायरी अतिशय हळूं चढत होतीं. जणूं बापू पायऱ्या मोजीत वर चढत होते. बिशूनं देवाच्या चौरंगाकडे पाहिलं. तिथं निरांजन लागलेलं नव्हतं. कुणास माहित कां ? त्याला फार उदास वाटलं. तो लगबगीनं उठून मोठ्यानं म्हणाला—

‘ मुमे ! बापू आले ऽऽ, निरांजन लाव !’

मुमीचा आवाज ऐकूं आला—

‘ आले ऽ ऽ आणते निरांजन....!! ’

दारांत बापू उभे होते. फार दम लागला होता त्यांना. त्यांनी बिशूला पाहिलं. पण ते नेहमीसारखे हंसले नाहीत. चिमणीच्या उजे-डांत बापूंचा चेहरा अतिशय उदास वाटला. ते कांहीच बोलले नाहीत. मंदपणानं हातांतील काठी ते कोपऱ्यांत ठेवायला गेले नि वळकटीशी बसून ते कोटाची बटनं सोडूं लागले. बिशूला त्यांनी न बोलतां जवळ घेतलं. त्याच्या डोक्यावरून, त्याच्या गालावरून, ते हात फिरवूं लागले.

बिशूला भडभडून आलं आणि अगदी अकल्पितपणें बापूंनी बिशूला जवळ ओढलं-छातीशी घट्ट धरलं. बिशू देखील बापूंना घट्ट बिलगला. असंच सदोदित बापूंना चिकटून राहावसं त्याला वाटूं लागलं.

बापू अगदी खोल आवाजांत म्हणाले—

' कुठं गेली आहे ही ? '

' महाकाळाला गेली आहे आई ! आत्तां येते म्हणून सांगून गेली. पण अजून आली नाहीं.'

' अस्सं ! '—बापू जड आवाजांत म्हणाले.

' सुमे ऽऽ आण ग निरांजन बेटा....'

तेवढ्यांत सुमीनं निरांजन आणून देवासमोर ठेवलं. देवावरचा चौरंग लखलखूं लागला. बापू हातपाय धुवून आले नि शंकरापुढं त्यांनी गुडघे टेकले, हात जोडले नि डोळे बंद करून घेतले !

बापूंचा चेहरा अगदी फिकट झालेला होता. त्यांचं तोंड सुर्कुत्याच्या जाळ्यांनी भरून गेलं होतं. त्यांच्या कपाळावरच्या शिरा फुगलेल्या स्पष्ट दिसत होत्या. त्यांचे एकमेकांवर घट्ट दाबलेले ओठ कंप पावताना स्पष्ट दिसत होते. घट्ट मिटून घेतलेल्या पापण्या देखील स्फुरत होत्या. हृदयांतील घोर तुफानाशीं जणूं बापू झुंज घेत होते. बापूंच्या पापणीशी अश्रूंचा एक थेंब हलुहलूं सांचला होता व नकळत तो गालावर ओघळला होता.

बिशूनं तो अश्रूचा थेंब पाहिला अन् त्याला खूप भीति वाटूं लागली. बापूंना घट्ट मिठी मारून बिलगावंसं त्याला वाटूं लागलं. अन् बापूंनी सावकाश डोळे उघडले ! देवापुढें साष्टांग नमस्कार घातला. क्षणभर बापू स्तब्ध होते—तसंच देवासमोर डोकं ठेवून !!

बिशू श्वास रोखून हे बघत राहिला. बापू जरादेखील हलले नव्हते.

एका अज्ञात भयानं बिशू आक्रंदून हांक देणार होता—बापू ऽ ऽ ऽ पण तितक्यांत रमाबाईंचा मोठा खणखणीत आवाज आला--

‘ हे काय ? केंव्हांशी यायचं झालं. ’

आणि घर एकदम भरल्यासारखं झालं.

बापूंनी हळुहळूं डोकं वर उचललं ! त्यांनी देवासमोर फिरून हात जोडले, कानांना स्पर्श केला, त्यांची बोटं थरथरत होती. त्यांचं सारं अंग थरथरत होतं. रमाबाई पुढं झाल्या....‘ हे काय ? असं काय करायचं ते ? ’ असं म्हणून त्यांनी बापूंना हळूच हात दिला. बापूंनी खोल आवाजांत विचारलं—

‘ मधू आला का ?....पहा बरं बिशू....!! ’

रमाबाई म्हणाल्या—

‘ छेः कॉलेजांतून आल्यापासून कुठं गेलाय कुणास माहित—!’ बापू वळकटीला टेकले होते. ते कांपऱ्या आवाजांत म्हणाले— ‘ वामनरावांना बोलावायचं होतं. जाऊं द्या....’

बिशूला क्षणभर आईचा चेहरा कासावीस झालेला दिसला....

‘ मधू काय करतो, कुठं असतो. पत्ता नसतो कधी त्याचा... मीच जाईन वामनरावांकडे....’

‘ छेः छेः वामनरावांकडे नाहीच जाणार मी....! ’

बापू डोके हालवीत म्हणाले. वळकटीशी ते एकदम लवंडले.

\+ + ÷ ÷

बिशूला शीण आला होता. केव्हां झोपी गेला त्याचं त्याला कळलं नव्हतं. तो मधेंच दचकून जागा झाला. कोपऱ्यांत चिमणीची ज्योत मंद तेवत होती. बापू अंथरुणावर स्तब्ध बसले होते. रमाबाई कांपऱ्या आवाजांत बोलत होत्या. ‘ अगदी जिवाला लावून घेऊं नये ! सारं

कांहीं नीट होईल ! आजवर मुंगीला दुखवायचं झालं नाही. भोळ्या सांबासारखं रहायचं झालं ! देवालाच आपली चाड आहे ! आणि मी आहे ना ?....'

रमाबाईंना हुंदका आला असावा कारण पुढे त्या एकदम गप बसल्या. बिशू जागच्या जागीं तळमळूं लागला. काय झालं बापूंना ? काय झालं आईला ? दादा कुठं गेलाय् ? बिशूनं हळूच मधूच्या बिछान्याकडे पाहिलं. तो रिकामा होता ! एकाएकी बिशूच्या मनांत दादाविषयी अत्यंत तिरस्कार उसळला.

बापूंना काय झालंय ?....आईला काय झालंय ? अन् दादा अशा वेळी कुठं गेलाय् ? त्याचं मन पोळूं लागलं, तळमळूं लागलं.तोंडावरून पांघरूण घेऊन तो गुरगुटून पडला.

' आता कसं होईल ? '

' तो मुटी काढून गेला आहे ! कालच कळलं मला....पण जबाबदारी माझी आहे. मला पैसे भरायलाच हवेत ! उद्या सारं जग थुंकेल.... नि विष खायला....'

' असं बोलूं नकां ! '

' मधू कुठं गेला आहे ? आला की नाही घरीं ? '

' तुम्ही यायच्या पांचच मिनिटं आधी आला ! आपल्याच धुंदींत....चिमणी घेतली नि जाऊन बसला आहे मागच्या बाजूस.'

रागानं नि हळव्या लाचारीनं रमाबाईंचा आवाज विकृत झाला होता. ' कसं होईल पोराचं ? पुढे काय वाढून ठेवलंय् याची जाणीव देखील नाहीं वेड्याला....माझ्या मागं तुझं, पोराबाळाचं....'

खोल कण्हत्या आवाजांत बापू बोलत होते.

'काय बोलायचं हे ? माझी तरी कींव करावी !--' मग सामसूम झालं.

विशूनं हळूंच तोंडावरून पांघरूण काढलं.

बापू स्वयंपाकघराकडे चालले होते. रमाबाई घाबरटपणें म्हणत होत्या.

' काय ? अत्ता कशाला सांगता त्याला ? मी सांगीन सारं !.... ऐकलं का ?....–' ' रमाबाईहि मागोमाग गेल्या.

विशू उठून बसला. अंधारांतच बापू नि रमाबाई स्वयंपाकघराच्या मागच्या दाराशीं पोचले होते ! तिथं अंधुक लाल.प्रकाश दिसत होता. अन् दुरुन हळुहळूं कांहीतरी सुरावर म्हटल्याचा आवाज ऐकूं येत होता.

विशू बापूंच्या मागं उभा झाला !! बापू स्तब्ध उभे होते दाराशींच. चिमणीच्या उजेडांत पुस्तक उघडं होतं. मधू दाराकडे पाठ करून तल्लीनपणें वाचत होता.

' थूके मुझपर त्रैलोक्य भले ही थूके
जो कोई जो कह सके, कहे, क्यों चूके
छीने न मातृपद किंतु भरत का मुझसे
रे राम, दुहाई करुं और क्या तुझसे
कहते आते थे यही सभी नर देही
माता न कुमाता; पुत्र कुपुत्र भले ही
अब कहें सभी यह हाय ! विरुद्ध विधाता
' है पुत्र पुत्र ही, रहे कुमाता माता '

मधू तन्मयतेने म्हणत होता. त्याचा गळा दाटून आला होता. मैथिलीशरण गुप्तांच्या ' साकेत ' काव्यामधील अत्यंत करुण आठवा-सर्ग. पश्चात्तापदग्ध कैकेयी भरताबरोबर वनवासी रामाच्या दर्शनास येते. भरत जिवाच्या आकांतानें रामाला परत अयोध्येला चलण्यास विनवितो. मातेचा धिःकार करतो ! तेंव्हा पश्चातापदग्ध दीन कैकेयी

साऱ्या सभेला उद्देशून बोलते तो प्रसंग ! मातेचे स्वतःच्या निर्भत्स-नेचे अत्यंत विषादपूर्ण उद्गार ! मधू म्हणता म्हणता थबकला होता ! मनांतील उमाळा शमवून तो फिरुन वाचूं लागला. त्याला जगाचं भान नव्हतं. तो सारे कांहीं विसरला होता. दुःखावेगाने माता कैकेयी म्हणत होती—

'युग युग तक चलती रहे कठोर कहानी
रघुकुल में भी थी एक अभागिन रानी
निज जन्म जन्म में सुनें जीव यह मेरा
धिःकार उसे था महा स्वार्थ ने घेरा !!

× × ×

सौ बार धन्य वह एक लाल की माई
जिस जननी ने है जना भरतसा भाई
पागलसी प्रभू के साथ सभा चिल्लाई
सौ बार धन्य वह एक लाल की माई.'

मधूच्या डोळ्यांतून अश्रुबिन्दू ठिबकत होते. कैकेयीच्या लांछित—मातृत्वानं त्याचं हृदय विदीर्ण झालं होतं. त्या अश्रुपाताच्या आनं-दांत त्याला कशाचंही भान उरलं नव्हतं !

पुस्तकांतलं वाचून दादा रडतोय. बिशूच्या छातींतून तिरस्काराची एक विलक्षण कळ आरपार निघून गेली.

## : १६ :

'बाहेर गेले आहेत. आत्ता येतील ते '—पिवळ्या तोंडाची भावेची बहिण खिडकींतून डोकावून म्हणाली. असं सांगताना ती उगीच हंसली. अन् तिच्या हंसण्यांत मधूला एक गोड सौम्यपणा जाण-

वला. मधूच्या हृदयांत तुफान थैमान घालीत होतं. डोंब पेटला होतां अन् त्यांतहि ते पिंवळ्या तोंडांच्या मुलीचं हंसणं त्याच्या मनाला खोलवर चाळवून गेलं.

तो हळूहळूं जिना चढला नि वरच्या खोलींत शिरला. नेहमीप्रमाणं खोली आरशासारखी लखलखीत होती नि सकाळचीं उन्हं सारवलेल्या जमीनीवर पडल्यामुळें एक पिंवळसर आभा पसरली होती. भिंतीला एक वळकटी तशीच टेकली होती नि तशीच एक चटई पसरली होती.

मधू वळकटीच्या कोपऱ्याशी बसला अन् ती मुलगी लगबगीनं स्वयंपाकघराकडे निघून गेली. जातांना तिच्या किडकिडीत पण लवचिक बांध्याकडे तो पहात राहिला.

तिचे डोळे त्याच्या समोर उभे राहिले! —ते डोळे गंभीर होते. तरी ते हंसरे होते. आपण त्या मुलींचे आत्मीय आहोंत अशी एक अस्पष्ट परन्तु अत्यंत सुखकर भावना त्याच्या मनाला दरवळून गेली! पण त्याच्या मनाची तळमळ कमी होत नव्हती. त्याला एकाजागीं स्वस्थ बसवत नव्हतं. तो खोलींत येरझारा घालूं लागला. हातांची चाळवाचाळव करूं लागला. दुसऱ्या क्षणीं तो स्वतःच्या विचारांतच गुंगून गेला. मान खाली घालून पेटीवर ठेवलेल्या पुस्तकांची तो चाळवाचाळव करूं लागला व मनांत थैमान घालणारी यातना फिरून भोगू लागला! त्याचा चेहरा एकदम ताणून धरल्यासारखा झाला.

'चहा!'

मधू जोरानें दचकला. भानावर आला. त्यानं समोर पाहिलं.

जोराने फुटूं पहाणारं हंसू दाबत ती चहा ठेऊन लगबगीनं आंत पळाली देखील होती. ती अस्फुट हंसली होती नि परततांना तें हंसू उसळून मंजुळपणें किणकिणलं होतं. दूर दूर जाणारी गोड लकेर ऐकून

भारल्यासारखा मधू पहात राहिला !

शून्यपणानं तो पुस्तकाचीं पानं पुन्हा चाळूं लागला. कांहीं क्षणा-नंतर त्याचा चेहरा स्मितानं किंचित् उजळला.त्यानं क्षणभर स्वयंपाक-घराच्या दिशेने पाहिलं.

त्यानं भरभर चहा प्यायला सुरवात केली. तो फार बेचैन झाला होता. भावेसाठी वाट बघायचा धीर त्याच्यांत आतां उरला नव्हता.

तितक्यांत भाजीची पिशवी हातांत घेऊन भावे वर आला. शांत आवाजांत त्यानं हांक दिली—' निमा ! घे ही पिशवी. '

मधूला पाहून भावेच्या तोंडावर नवलाचा भाव पसरला. नरसिंगे घाटावरील घटनेनंतर आज ते प्रथम भेटत होते.

ते दोघे माळ्यावर गेले. अर्धवट तयार झालेल्या मूर्तीवरचं ओलं फडकं भावेनं बाजूस सारलं. कोरणी घेऊन तो काम करूं लागला. एका क्षणांत त्याचं लक्ष कामांत गुंतून गेलं.

मग काम करतां करतांच तो म्हणाला—' हं ! '

' भावे मला....भावे मला....'मधूचा अभिमानी चेहरा खर्रकन उतरला.

' मला एखादी नोकरी हवी आहे. सध्या लहानसहान कसलंही काम चालेल. '

तो अडखळत सारे बोलला. त्याच्या जिवाचा संताप होत होता.

भावेचा चेहरा हळुहळूं पालटला. त्याच्या गोटलेल्या चेहऱ्यावर ममता थरथरूं लागली. त्यानं मधूच्या खांद्यावर एकदम हात ठेवला. त्याच्या नजरेला नजर भिडवीत तो म्हणाला—

' असं ? जाऊं दे, आज नाहीं करीत मी काम.'

तो मधूकडे नुसता पहात राहिला. त्याच्या विषण्ण मनस्थितीचें

कारण तो अजमावूं लागला. मधूच्या अंतर्यामांत चाललेल्या खळब-ळीची तीव्रता त्याला जाणवत होती.

मधूला शांतपणें तो म्हणाला—' काय झालं! नि एवढं घाबरून कसं चालेल! आयुष्य हें असंच असतं. पण मी तुला कोण सांगणार? '

'तूं तर जाणता आहेस....कलावंत आहेस....तो माझा गुन्हा नाहीं. मला काहीच कळत नाही. सगळं विसकटलेलं, उस्कटलेलं, सुटंसुटं, अगदी अनोळखी...कमालीचं अपरिचित वाटतं आहे! जें होत आहे तें कां होत आहे—कशासाठी होतं, कळत नाही. मी काय गुन्हा केला आहे कीं मला यातलं काहीच समजूं नये!' मधू बोलतां बोलतां एकदम थांबला.

' म्हणजे ?'

'पक्षासारखं. त्याला पंख असतात. तो जोरानं उडूं पाहतो. झेपा-वत उंच उंच आकाशांत उडूं पाहतो. पण क्षणोंक्षणीं तो कशावर तरी आदळतो. फिरून झडप घेतो फिरून आदळतो. त्याच्या हृदयांत असतं आकाशाचं प्रतिबिंब. ते त्याला बेचैन करीत असतं. तेच त्याच्या सुखाचं निधान....अन् अतिशय प्रेम करण्यासारखं दुःख असतं. '

' म्हणजे काय मधू '

' म्हणजे मी अगदी एकटा कां आहे भावे ? मी आंधळ्या पक्ष्या-सारखा कां आहे ? तरी मला पंख कशाला दिलेत ? मनात अत्यंत खोलवर एक तळमळ असते; एक हूहूर असते. महापुराप्रमाणें काठों-काठ भिजवून सारं जलमय करून टाकावं व जिरून जावंसं वाटत असतें. त्या हुहूरीला बोल द्यावेसे वाटतात. सर्वस्व समर्पित करावंस वाटतं. पेटल्या ज्वालेप्रमाणें सतत आकाशांत उंच उंच उंचावत जावंसं वाटतं.

'आणि म्हणून ?'

'पण हीच वृत्ति माझ्या मनाला हीन कां वाटते. नाहींतर मला सारं कळलं नसतं का ? हा दुजाभाव कशाला डांचला असता ?.... बिशू देखील....एवढासा तो....तोहि अबोला धरायला तयार नसता झाला. त्याच्या या उर्मट तिरस्काराचं कारण तरी मला कळायला हवं होतं. आईचंहि कळेनासं झालंय्. फक्त बापू....बापू....संत आहेत माझे बापू...भावे ! त्यांच्यासाठी मी वाटेल ते करीन. पण त्यांनाहि दुःख होतं. कां होतं ? हे असं सगळं ओळखी पलीकडे गेलसं कां वाटतं....?'

मधूचा चेहरा फटफटीत पडला होता. जणूं तो तीव्रतेने यातना भोगत होता. भावे मधूकडे निरखून पहात होता. त्याच्या पाठीवर हात ठेऊन तो म्हणाला—

'कारण तुझी माणसं—ज्यांच्यावर तूं जिवापाड माया करतोस तीं... तुला केवळ पार्श्वभूमीसारखीं आहेत.'

मधूनी चमकून भावेकडे पाहिलं. उपहासाचा भाव त्याच्या तोंडा-वर नव्हता—कधीच नसे. त्याच्या चेहऱ्याकडे, त्याच्या डोळ्यांकडे त्यानं पहिल्यांदा पाहिलं नि त्यांतील जिव्हाळ्याचा शांत भाव पाहून तो कुठं तरी खोलवर वरमला. त्या काटकुळ्या, दहादहा तास सतत काम करणाऱ्या अविचालित. जगास अज्ञात कलावंताकडे पाहून तो दबल्या-सारखा झाला. तरीहि त्याला भावेचं म्हणणं बोचलं होतं. त्याची खिन्नता वाढली होती.

'भावे ! तुझं बोलणं मला अगदी समजलं नाहीं ! ज्यांच्यामुळं मला अतिशय दुःख होतं, माझ्या माणूसकीला कमीपणा आल्यासारखं वाटतो तींच माणसं मला पार्श्वभूमीसारखी कशीं असूं शकतील !'

‘ ती तुला द्यावी लागणारी किंमत आहे ! ज्यांच्या अनावर भावना आहेत, उत्कट स्वप्न पहाण्याची वृत्ति आहे त्यांना ही किंमत नेहमीच द्यावी लागते...द्यावी लागत आली आहे...द्यावी लागेल. झाड वर वर वाढत जात, त्याचीं पाळंमुळं जमीन खोल खणतात नि दुसरं मोठं झाड तिथं मूळ धरत नाहीं...धरूं शकत नाही !! ’ कांही समजून घेण्याच्या मनःस्थितींत मधू नव्हता. त्याला उत्तर मिळालं नव्हतं. तो कांहीं क्षण विचारांत गढून गेला....

‘ भावे ! बापू आज कचेरीत गेले नाहीत; कदाचित जाणारहि नाहीत ! मला काम मिळालंच पाहिजे. वाटेल ते झालं तरी....बापू....’

भावे उठून उभा झाला. तो म्हणाला—‘ असं ? ’

ते जिना उतरूं लागले. मागून मधू घाईघाईत जिना उतरूं पहात होता.

भावे ओरडून म्हणाला—‘ आई ऽऽ ! उशीरा येईन ग ऽऽ.... तुम्ही सारे जेवून घ्या ’ भावेचा आवाज इतका चढला की एरवी निर्जन भासणारं ते घर एकदम गजबजून भरल्यासारखं झालं. भावे म्हणाला—‘ चल !! ’

## : १७ :

दोघे बरोबर चालत होते, कांहीं एक न बोलता.

भावे एका बंगल्याच्या फाटकापाशी थांबला. मधूनं चकित होऊन विचारलें—

‘ कुठं जायचं ?....’

‘ तुला काम हवं आहे ना ? तयार आहे काम....’

' हं !! ' मनांतल्या मनांत त्याचा विरस झाला होता.

बंगल्याच्या आवारांत शिरून बटन दाबतांच एक मुलगी पुढं झाली. भावेला पहातांच ती जराशीं हंसलीं व म्हणाली—' या '

' आहेत ना बाबासाहेब घरांत ?'

' हो ! बसा....पण चला, त्यांच्या खोलींतच घेऊन चलतें मी '

त्या घराच्या मधोमध आंगण होतं नि त्याच्या दूर टोंकाशीं बाबासाहेबांची खोली होती ! लहानशी नि कोंदट ! त्या घराला उजाडपणाची कळा होती नि त्या कोंदट खोलींत परस्पराशीं न बोलतां ते शिरले नि एका कोंदट खोलीत स्वस्थ बसले.

मधूला कांहींच सुचत नव्हतं. अवचित अपरिचित टिकाणीं तो आला होता आणि त्या वातावरणानंच त्याचं मत प्रतिकूल केलं होतं.

त्या लहानशा खोलीची एक भिंत एका आडव्या लोखंडी कॉटनं भरून काढली होती. कॉटखाली अनेक पेट्या नि कागदांची रद्दी भरली होती. कोपऱ्यांत एक लहानसं टेबल ठेवलं होतं व त्यावर अनेक औषधांच्या शिशांची गर्दी झालेली होती. त्यांतच एक सहाण व अर्धवट उगाळलेलं जायफळ ठेवलेलं होतं. एका बाजूस भक्कम लोखंडी पेट्या एकावर एक रचून ठेवलेल्या होत्या नि कांहींतून फायलींचे लाल दोरे लोंबत होते. एका कोपऱ्यांत एक लहान पितळी खलबत्ता नि थुकायचं एक प्रचंड तस्त ठेवलेलं होतं. एक प्रकारचा कुबट, तुरट नि उग्रसा दर्प त्या खोलींत भरून राहिला होता.

एवढ्या तडकाफडकी काम मिळेल असं मधूला वाटलं नव्हतं. आणि आतां त्याचा जीव गुदमरू लागला. त्याला पळून जावसं वाटूं लागलं. तरी तो खिन्नपणे बसून राहिला.!

....दालनाच्या टोकांशी एकच गलका झाला ! घरच्या मंडळींच्या

घोळक्यांत कुणीसं रागानं तणतणत होतं ! पण दिसत नव्हतं. सगळे एकदम जबाब देत होते. एकदम वर्दळीवर येत होते नि एकदम गप बसत होते. ' पर्द पर्द ' एवढेच काय ते गुळमुळीत शब्द कानावर येत होते. पण त्याचा अर्थ बोध होत नव्हता. त्या घोळक्यांतून शेवटी एक व्यक्ति तणतणत खोलीच्या बाजूने येऊं लागली.

भावे म्हणाला—बाबासाहेब आले !

मधूनं त्या दिशेला पाहिले नि विस्मयाचा धक्काच बसला !

एक ठेंगणा पिवळा जर्द, अतिशय वाकलेला म्हातारा ताणेताणें करीत तरातरा येत होता. वाकला असल्यामुळं त्याचं तुकतुकीत गोरं पान डोकं लखाखत होतं. तो येतांना दोन बोटांनी धोतऱ्याच्या पुढच्या पट्ट्याचे सळ काढीत होता. त्याच्या पाठीवर पांढर शुभ्र वस्त्र होतं. ते दोन्हीबाजुला फलकारत होतं. तो रागांत दिसत होता ! जवळ येतांयेतां मधूच्या कानी एवढे शब्द आले—' शिंचे पड हवतात....उद्या आंखी कई हव्वाल....चोय....सगळे चोय !'

भावेच्या तोंडाकडे मधूनं पाहिलं. तो निर्विकारपणें पहात होता. ते जवळ येतांच भावे अदबीनं उठून उभा झाला. म्हाताऱ्यानं भावेच्या नमस्काराला जोरानं मान हालवून उत्तर दिलं ! नंतर गोऱ्या कासवाप्रमाणे मान वर करून तो मधूकडे पाहूं लागला.

मधूचं कुतूहल अनावर झालं होतं. तो अतिशय आश्चर्यानं म्हाताऱ्याच्या तोंडाकडे टक लावून पहात होता. म्हाताऱ्याला भिवया अगदी नव्हत्या ! डोळे हिरवेगार अन् रेडियमसारखे चमकत होते. हनुवटीच्या कोयीत लाल जीभ वळवळत होती. त्याच्या किंचित् पसरट नकट्या नाकांतून सारखे फूत्कार सुटत होते. आपल्या वाकलेल्या शरिराला शक्य तेवढं ताठ करून, मान उंचावून तो मधूच्या डोळ्यांकडे भेदक

नजरेनं पाहूं लागला. त्याला मधूच्या डोळ्यांत जें दिसायला हवं होतं त्याचा लवलेशहि दिसत नव्हता ! मधूसारखी नजर त्यानं बाप-जन्मांत पाहिली नव्हती.

मधू ताठ उभा होता.. निर्मळ कुतूहल नि मिष्कलपणाची चमक त्याच्या डोळ्यांत खेळत होती !!

म्हातारा एकदम मधूच्या अगदी तोंडापर्यंत आपलं सुरकुतलेलं बोट नेऊन म्हणाला–' हे हे ?....'

मधूनं त्यांना अर्धवट नमस्कार केल्यासारखं केलं. त्याची किंचित् रागानं मान हालवून दखल घेऊन म्हातारा फिरून भावेकडे पाहूं लागला.

' हा माझा मित्र ! मधुकर पूरकर याचं नांव ! '

' अन् वईल ? वइलांना नांव नइ का ? '

म्हातारा उघड उघड संतापलेला दिसला. तो जोराजोरानं फूत्कार सोडूं लागला. म्हाताऱ्याचा प्रश्न मधूला बिलकुल समजला नाहीं.

' भावेला मात्र म्हाताऱ्याची बोली नीट कळते–' मधूच्या मनांत विचार आला. त्याचं कुतूहल दुणावलं !

' तो स्वतः नेहमी मधुकर माधवराव पूरकर असंच आपलं नांव सांगतो. वडिलांचं नांव पूर्ण घालतो तो. मीच आपणाला थोडक्यांत सांगितलं !! '

' अस्सं....बसा....बसा ' म्हाताऱ्यानं धोतराच्या दोन्ही बाजूच्या खुंट्या जोरानं पिरगाळीत म्हटलें. भावे बसला. ते पाहून मधुकरहि बसला. म्हातारा कॉटवर बसतांच त्याचे पाय वर लोंबू लागले आणि गोऱ्या पान गोटयावरील लाल मोहऱ्यासारखे ठिपके ठिपके साफ दिसूं लागले. म्हातारा पुटपुटूं लागला—

'चोय....सगळे चोय....पइ हवतात लेकाचे !!'

मग मोठ्यानं ओरडून तो भावेला म्हणाला—

'अहो पई....पई हरवली आज....!!'

म्हातारा भावेला मान देत होता हे स्पष्ट दिसलं.

'पळी हरवली कीं काय ?' भावेने मोठ्या आस्थेने विचारलें.

'अहो ! हो ऽऽ' मारक्या नजरेने कोपऱ्यावरच्या खोलीकडे पहात तो म्हणाला.

'थुमी....थुमी सांगा आज पईची चोयी....उद्या'

भावे अदबीने म्हणाला—'बरोबर आहे !'

मधुकरला 'पई' चा उलगडा झाल्याबरोबर अनिवार हसूं लोटलं. पण ते दाबून शक्य तितका संभावितपणा दाखविण्यासाठीं जोराने मान हालवून तोहि म्हणाला—'बरोबर आहे !'

म्हाताऱ्याने एकदम टवकारून मधुकरकडे पाहिले. भावे भराभर बोलूं लागला—

'आपणास कारकुनाचीं गरज होती. म्हणून याला आणलं आहे. मॅट्रिक झालाय्....दोन तास सकाळ संध्याकाळ येत जाईल आपणाकडे.'

म्हातारा मधूकडे रोखून पाहूं लागला ! आतां त्याची संशयी नजर त्याला सांगोपांग न्याहाळूं लागली ! मधू खुर्चींत एकदम अवजडून बसला; गळ्यांत अडकलेला आंवढा त्यानं हळूच गिळाला.

'थांबा !'

म्हातारा पलंगाखालीं खुडबूड करूं लागला.

'काय हवं बाबासाहेब? कागद ?' भावेनं विचारलं. म्हातारा जरा रागांतच म्हणाला—'कशाला कागद ? खराब कयायला ?'

त्यानं ढिगाऱ्यांतून पाटी पेन्सिल शोधून काढली. मधूच्या हातांत दिली. हुकमी आवाजांत म्हणाला—'ध्या....बरं....'

त्यानंतर डोईवर बोटानं टकटक करीत, खाली पहात तो सांगू लागला—'ध्या बरं....गअीब पव्वल सलामत'

मधूला काहींच समजलं नाही. तो किंचित् संतापाने, किंचित् कासावीस होऊन भावेकडे पाहूं लागला ! मग संतापाची उर्मि त्याच्या हृदयांत उसळली. तो ताडकन उठून उभा राहणार इतक्यांत मागची कॉलर घट्ट धरून त्याला दाबीत भावे शांतपणाने म्हणाला—'लिही ! गरीब परवर सलामत'

म्हाताऱ्याचे लोंबते पाय हालत होते. विचार चालू असल्यामुळे तो नाकाने सारखे सुस्कारे सोडीत होता. तो पुढे सांगू लागला—'जनाबे आली, दरख्वास्त मिन्जानिब मुद्दई हस्ब जैल पेश है' अन् मग थोडावेळ थांबून एकदम वर पाहून म्हणाला—'पाहूं ?'

मधूच्या हातांतील पाटी त्याने जवळजवळ हिसकली. हळुहळू त्याचा चेहरा खूष दिसूं लागला. त्याची लाल जीभ जोराने वळवळ करूं लागली. मधूचं मोत्याच्या दाण्यासारखं वळणदार अक्षर पाहून तो खूष होऊन म्हणाला—'ठीक ए....ठीक ए.. .'

तो कॉटवरून उडी मारून उतरला. धोतराचा खुंट्या जोरानं पिरगाळीत म्हणाला—'जा थुमी....उद्या या'

मधुकरचा चेहरा अंधारून आला !

आला होता तसाच म्हातारा खोलींतून घाइनें पांढऱ्या चादरीचे फलकारे उडवीत बाहेर पडला. पांढरा पेनग्विन पक्षी पंख हालवीत धावत जावा तसें दिसत होतें.

ते दोघे रस्त्यावर येईपर्यंत स्तब्ध होते.

भावे म्हणाला—' उद्यापासून काम सुरू करायचं मधू ! म्हातारा खाष्ट आहे पण आपल्याला तर....'

भावेकडे विचित्र नजरेनें पाहून मधू एकदम उलट दिशेस वळला व एक शब्द न बोलता बाजूच्या गल्लींतून चालता झाला !

भावे चकित झाला. जरा वेळ जागीच खिळून उभा झाला. मग फिकट हंसला; हंसणें होतें कीं काय होतें कुणास ठाऊक !

हळुहळू स्वतःच्या घराकडे तळपत्या उन्हांत तो चालूं लागला !

## : १८ :

बापू ऑफिसाकडे निघाले होते

त्यांचं शरीर पुढं जात होतं. पाय चालत होते. हातांतली काठी चांचपडत दगडांवर टेकली जात होती. त्यांची मान खाली होती, गळ्यांतलं उपरणं अस्ताव्यस्त झालं होतं. एका बाजूला अधिक लोंबत होतं. घरच्या बारक्या गल्लींतून मगरमोहाच्या दगडी टोलांनी खचलेल्या बोळींत बापू वळले....

' अरे बापू ! वळखलं नाहीस का रे बाबा मला ? '

बापू दोन पावलं पुढं गेले, थबकले. मागं वळून पाहिलं नि दोन पावलं मागे गेले ! वाटेवर ऐंशी वर्षांची वाकलेली जख्ख म्हातारी धुवट लाल लुगडं नेसून उभी होती. तिनं एक हात कमरेवर नि दुसरा हात डोळ्यावर ठेवला होता व ती किलकिल्या नजरेनं बापूकडे पहात होती !

' ओळखलं झब्ब्याची आई तुम्हाला. तुमचा आवाज कसा ओळखला झटकन मी ! '

'होय रे ! बेटा ! अरे तूं एवढासा होतास तेंव्हा अस्सा हातावर खेळवलाय् मी तुला.... अन् तुला मी हांक मारली जग्गऽऽन, कीं माझा आवाज वळखून दुडदूड धांवत यायचास तूं.... म्हटलं इतके दिवस झाले.... कधीं म्हातारीची आठवण केली नाहींस ? माझा झब्या बिचारा अपंग आहे.... पण तूं करतोस त्याला थोडी थोडकी मदत.... नि थोडंबहुत रुटूखुटूं चालतं आमचं !! माझ्या झब्याचा फार जीव आहे हो तुझ्यावर... आतां म्हातारपण झालं.... हातपाय नाहीं चालंऽऽत....सुनबाई आली असतीऽ माझ्या डोळ्यां देखऽऽत' म्हातारी डोळे पुसूं लागली !

बापू खिन्न हंसले—

' कशाला डोळ्यांत पाणी आणतेस झब्याची आई ? देवाला आहे साऱ्यांची काळजी....!! '

' होय रे बाबा ! तू आहेस त्याला....मला म्हातारीला तोच धीर....तुला देव उदंड औक्ष देईल. माझा म्हातारीचा आशीर्वाद आहे तुला...बरं, पोरं बाळं ? '

' देव तुला उदंड औक्ष देईल ! ' छातींतून एक जोराची कळ गेल्यासारखं बापूंना झालं....

ते म्हणाले—

' जातो ग आजी ! जाऊं दे मला....येईन तुझ्याकडं....!! '

म्हातारी डोळे पुशीत म्हणाली—' जा हो ऽ ! जा !...'

बापू पुढं चालले. काठी चांचपडत दगडावर टेकली जात आहे. पाउलं पुढे सरकत आहेत. बापूंची मान खाली आहे. ' फुकट आहे... व्यर्थ आहे....झब्याची आई....अग तुझी माया उदंड आहे पण नाहीं ग....कुठंच कांही नाही !! '

दगडी टोलांनी खचलेला हा मगरमोहाचा रस्ता तस्सा आहे ! चाळीस पंचेचाळीस वर्षांपूर्वी असाच एक लहानगा बापू या रस्त्यावरून नुसती लंगोटी घालून धांवत जात असे....दूध आणायला हलवायाकडून ! रस्त्यांतले पिंवळी शाल पांघरणारे शास्त्रीबुवा त्याला नेहमी उचलून घेत असत. अगदी याच ठिकाणीं....हो तें समोरचं प्रचंड चिंचेचं झाड !! अगदी तस्संच त्या दग्यावर उभं आहे, बाळपणीं त्याच्या कितीतरी चिंचा खाल्ल्यात....त्याच्या गार साउलीखाली कितीतरी हुंदडलो....त्याची छाया अजून तशीच गारीगार आहे ! त्या छायेखालचा हिरवा तुरट वास अगदी बाळपणीं होता तसाच अजूनहि आहे. या दोहोंबाजूच्या पडक्या झडक्या इमारती तशाच आहेत ! त्या तिथं अगदी चौथ्या मजल्यावर जी भिंत ढांसळून पडली आहे ना, तिथं अडसुळे शास्त्र्यांची पाठशाळा होती. तें त्यांचं गोरपान घवघवीत तोंड. त्या त्यांच्या लांब मिशा नि पिवळी धमक जरतारी शाल !! रामरक्षा, रुद्र, पुरुषसुक्त, सारं सारं अडसुळे शास्त्र्यांच्या हातांखाली शिकला तो लहानगा बापू....पण केवढं प्रेम होतं त्या गुरुमाउलीचं !! हो ती पहा ती जागा ! आतां रिकामी पडली आहे !! पण या गल्लींतला अंधार तसाच गारठणक आहे...अगदी ओळखीचा अगदी घरचा....रस्त्यांतच आडवी उभी ही गाय....तशीच गोमूत्र सांडत आहे. अजूनहि प्रेम भरानं तिच्या पाठीवर हात फिरवला कीं ती हरखते !!

काठी चांचपडत पुढे सरते आहे. बापूंचा चेहरा अगदी मग्न झालेला दिसत आहे ! डोळ्यासमोर झांपड येत आहे ! पण ते पुढे अगदी मुंगीच्या पावलांनी पुढे चालले आहेत ! परवां सायंकाळी गडबड झालेली त्यांना कळली होती. काल रविवार होता, आज सोमवार. कचेरींत

पोंचलंच पाहिजे ! जे काय होईल, जसं काय होईल, परमेश्वर रख-वाला आहे !

' परमेश्वर ? हे शंकराचं मंदिर लागलं. वर भरलेल्या पात्रांतून सतत डोक्यावर धार धरली आहे ! याच वाटेनं जातांना माधव पाठ-शाळेंत चौथी इयत्तेंत शिकतांना बापूनं किती वेळां भक्तिभावानं नम-स्कार केलेला आहे ! देवा तुझ्या चरणीं किती वेळां मनाची हितगुजं सांगितलीं आहेत. मनांतलीं पापं तुझ्याजवळ बोलून तुझी पिंडी अश्रूंनी भिजवली आहे. तुझ्या गंधाचा टिळा कपाळावर लावून घेताच मनाला केवढा आधार लाभला आहे. त्यावेळीं मींच चुकत होतो, दुसरं कोणी चुकत नसे आणि कुणी शिक्षा केली तर फिरून पोटीशी धरत असे. दामले शास्त्री बेतांनी बडवीत पण त्यांच्या डोळ्यांत नंतर पाणी उभं राही...." कशाला मला रागवायला लावता रे बाळांनो ? नका मला दुःख देत जाऊं असे !! " अन् मग त्यांच्या उपरण्याला मुलांनी झोंबल्याशिवायं त्यांना बरं वाटत नसे. कुठं गेले दामले मास्तर ?.... आज का नाहीत दामले मास्तर ? '

बापू गाफिलपणाने गल्लींतून वळले. त्यांच्या हातांतील काठी थर-थर कांपत चांचपडत पुढे सरकत आहे.

' होय ! हाहि रस्ता माझाच आहे. मला ओळखतो तो. माझ्या पायाला त्याची माया जाणवते...इथूनच या बापूंची वरात वाजत गाजत गेली होती.घोड्यावर बसला होता तो...अरे दप्तरदारांच्या मुलाला दिली जहागीरदारांनी मुलगी ! तेंव्हा सारे कौतुक करीत होते. याच वाटेवरून वाजत गाजत आली होती रमा !! छेः छेः नुसत्या स्नेहा खातर, घरोब्याखातर तेंव्हां कामें होत. हा तोच तर रस्ता आहे. डांबर पांघरून बसला असला तरी तोच तो....तो बदलला नाहीं. बापू

तुला हा विसरला नाही बरें का....सारं तेच आहे. मीहि तोच आहे! पण देवा बदललं काय आहे. शंकरजी....ऽऽ....हीऽऽ कोणती जागा?'

अरे ही जागा म्हणजे नदीच्या मंदिरा मागचीं....इथं वामन गळ्यांत टिनाचं कनस्तर बांधून बडवायचा नि नाटक खेळायचा ....वामन म्हणजे अर्धपोटीं राहणाऱ्या गरीब घरचा पोर! पण पुढें गेला, पैसा कमावला....वामन मला नेहमी हिणवायचा....दिवाभीत म्हणायचा; नाटकांत चोरून मारून जायचा....वामन भांडला....गुद्दा-गुद्दी केली. तो गोटा केलेला वामन....तसाच आज आहे. चलता-पुर्जा आहे. पण तोच आहे. वामन्या तूंच खरा ठरलास लेका. तूंच खरा....पण तुला नाहीं सांगणार....आजहि तुजसमोर नाहीं वेंगाडणार! ....बापू खोकूं लागले, हसूं लागले, ताठ उभे झाले !!

'बापूनाना....आज इथं कुठे? या वेळी?'

बापू दचकून ताठ उभे झाले. कावरे बावरे झाले. त्यांनी समोर पाहिलें. सामक उभे होते.... 'अरे....हीऽ क्षिप्रा, तशीच वाहते आहे संथपणानं....खरंच क्षिप्रामाय इथें....मी इथं कसा?'

क्षिप्रेच्या काठीं एका फडक्यांत चणे कुरमुरे पसरून सामक बसत. शनीसारखे काळे कुळकुळीत....कानांत भिकबाळी, मळकं धोतर. एकेकाळीं बापू मनांतून त्याच्यावर नाराज असत—बायको दळण नि सण करी दुसऱ्यांचे....पण हा एवढसं दुकान मांडून या इथं गेलीं चाळीस वर्षं बसलाय, साधू जोगी लोकांसोबत गांजा ओढीत.... त्याची साध्वी गेली तेंव्हा हा कठोर शनी लालबुन्द डोळ्यांतून आसवं ढाळीत बसला होता. बापूंनी त्याला लहान पोरांसारखं समजावलं होतं. सामक त्यांच्यापेक्षां वडील पण बापूंना बघून तो एकदम उभा झाला होता. त्याच्या वातड नि तेलिया चेहऱ्यावर एक प्रकारचं

आदरसूचक नम्र हसं पसरलं होतं.

'बापू ! आपण यावेळीं इथं कसे ? ' सामक व्यग्र होऊन म्हणाले.

'अंऽ मी इथं कसा घारू अण्णा ? ' पण सामकानं चाळीस वर्षं इथं थंडी व पावसांत काढली....बच्चीचं लगीन करून दिलं नि ती सुखांत आहे. हा बैरागी !! कधीं कोणाला यानं फसवलं नाहीं, कधीं कुणाचा पैसा दाबला नाहीं.असेंच पैसे दोन पैसे गाठीला लावीत राहिला. पण बापू तुला....उद्या तुला....सारं जग हंसेल !! हे घारु अण्णा.... तुम्ही नाहीं हंसणार....तुम्ही जुनी माणसं....मी जुना माणूस....पण घारुअण्णा....मग घारुअण्णा हे नवंच काय आहे हो ? '

सामकांनी बापूंच्या शरिराला दोन्ही हातांनी धरून हालवीत म्हटलं—

'बापूनाना !! आज हे असं काय ? काय झालंय तुम्हाला ? इकडं कुठं निघून आलात आज ? '

'घारुअण्णा ! कुणास माहीत कसा आलो ते....मला क्षिप्रेनं दर्श-नाला बोलावलं....या दगडांनीं दर्शनाला बोलावलं बरं कां....तुमच्या ....तुमच्या दर्शनाला मी आलोय....'

बापू खालीं बसूं लागले.... भुई चाचपडूं लागले....सामकाचा खांदा चाचपडूं लागले !! मग खजीलपणानं हंसले !!

'बापू असं काय करतां बरं.... तुमची तब्येत बरी नाहीं....त्या नुक्कडवर वळलं कीं आलं तुमचं घर....आतां तुम्हाला घरीं पोंचवून देतो !! 'सांई ! जरा खयाल रखना दूकान की ओर....अभी आया.'

बापूंनी चकित होऊन सांईकडे पाहिलं. वडाच्या झाडाखाली राखेंत चिमटा उभा करून चिलीम ओढीत सांई बसला होता.

'कोई फिकर नही बच्चा ! जरूर जावो ! नरायन मालिक है. '

सांईने उत्तर दिलें.

बापू ताठ उभे झाले, खडबडून जागे झाले.

‘ छेः छेः घारूआण्णा ! कुणास माहीत कसा आलो इथं....मी खडखडीत बरा आहे बरें का....मी जाईन, नका येऊं माझ्यासोबत.... मी चांगला धडधाकट चालतो आहे. बसा....बसा दुकानावर जाऊन.’ बापूंनी पाठ वळविली. ते जलदीनें परतले. पण क्षणभरांत त्यांची चाल एकदम मंदावली.

सामक चकित होऊन त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे बघत राहिले. बापू दूर निघून गेल्याचे पाहून सामक सांईला म्हणाले—

‘ देवता आदमी है !....सांई महाराज ! देवता आदमी है !’

‘ भगवान की लीला अगाध है बच्चा !’

जिन खोया तिन पाइयां । गहरे पानी पैठ
लेना हो सो लेइले । उडी जात है पैठ’

सांईनी चिलमीचा जोराचा झुरका ओढतांच तिचे निखारे लाल फुलून आले !

बापूंची काठी फिरून चांचपडत दगडादगडावरून सरकत आहे. ‘ नाही मी अजून खडखडीत चांगला आहे ! कचेरीत जाईन....टांगा करून जाईन. आजवर सुटी काढली नाहीं. अन् आज तरी सुटी कां काढूं मी ? मी काय केलं आहे ? मला काय झालं आहे ? हे केस मी बेईमानी करून पिकविलेत कीं काय ? कोण म्हणतं असं ? कोण म्हणणार आहे ? बापूनानानं कोणाचं वाईट नाहीं केलं....कोणाला मागं ढकललं नाही. आज बापूनाना अडचणींत सांपडला आहे म्हणून का सारी दुनिया टाळ्या वाजवील? टाळ्या....टाळ्या....हो! हो! टाळ्या...’

‘चुकतेस रमे तूं. तुला उगीच वाटतं की मी भोळा आहे. छेः

छेः ग ऽ, मला सारं कांही समजतंय.... तुझी माया समजते.... प्रेम समजतं....मी थकलों कीं तूं वृक्ष बनून मजवर छाया धरतेस.... मी संकटांत सांपडलों कीं तूं कवच बनून माझं रक्षण करतेस....का ग ऽ तूं कोण आहेस ? माझ्याबरोबर चतकोर तुकडा खाऊन रहायला कुणी शिकवलं तुला ? तूं आहेस माझी बायको....छेः ! माझी आई ! छेः छेः माझी शक्ति !! बापूनं पैसे खाल्लेत म्हणून तूं नाहीं म्हणायचीस....या या बापूनं....या केस पिकलेल्या भोळ्या सांब समजल्या जाणाऱ्या बापूनं....नाहीं ! तू नाही ह्मणणार असं.... पक्कं माहीत आहे मला.... तुझा माझा सहवास जन्मोजन्मीचा आहे.... नाही ! रमा ! मी कशाला हार खाऊं ? भक्तांचा पराभव होत नसतो ! खरे ना ? असेंच ना तुझे म्हणणे ? रमें ! तूं मला सोडूं नकोस....घर घर, मला घर....'

बापूंची काठी दगडावरून घसरूं लागली; तसे ते ताठ उभे झाले! कपाळावर उन्हाचा भयंकर मारा होत होता. त्यांना खूप घाम सुटला होता. ते गोपाळ मंदिरा शेजारी येऊन उभे झाले होते....

'गोपाळ मंदिर ! आपण उभयतां कितीतरी वेळा दर्शनाला आलो होतो इथं ऽ रमे !माहित आहे पहिल्या प्रथम केंव्हा आलो ? जेंव्हां एकाएकी तुझं माहेरचं घर सोडून तू हट्टानं नवं घर थाटलंस तेंव्हा...तूं फार जिद्दी रमे ! मला कांहीं सांगितलं नाहींस. सांगितलं नाहींस तरी ओळखलं नाही म्हणतेस ? मला माहित नव्हती का एका माणसाची गम्मत ? अग तुझ्या आईला माझ्यासारखा गबाळग्रंथी गरीब नवरा नको होता ! खरं ना ? ती मला कांही तरी बोलली नि तूं ऐकलं असावं, खरं की नाहीं ? हाः हाः किती जिद्दी आहेस तू रमे ! तूं जिद्दी....मग हट्टानं आपण उभयतां गोपाळ मंदिरांत दर्शनाला आलो. काय मागितलं

होतंस तेवढा डोळे मिटून कीं म्हातारपणी आपूला संकटांतून वाचव म्हणून? जरुर, जरुर वाचेन मी. जरुर माझं रक्षण होइल! तुझी जिद्द थोर आहे रमे! मी जातो कचेरींत....कोण म्हणतं कांही बदललं आहे म्हणून? शंकरजी तर तेच आहत; रमाहि तीच आहे; सामक.... वामन्या....सारे तेच आहेत; हा रस्ताहि तोच आहे, सरळ कचेरी-कडे गेली चाळीस वर्षं माझ्यासाठी पसरला आहे. मला ओळखतोस ना गड्या तूं....? मी तोच आहे ना ?....मी....मी....

बापूंना घेरी आली.

' तांगा तयार है पंडीतजी....आइए....'

बापूंनी मोठ्या मुष्किलीनं डोकं वर करुन पाहिलं. महंमद टांगे-वाला बोलावीत होता.

' अस्सं....आपला महंमद काय? काय घेणार महंमद? बोलो महंमद, कचहरीं में पोहोंचना है '

' बैठ जाइए चाचा! मैं भला क्या लूंगा आपसे....आप बैठिए तो, मैं तो बहुत वसूल कर लूंगा औरों से....मालिक!'

बापू टांग्यांत मोठ्या मुष्किलीनं बसले. टांगा कचेरीकडे धावूं लागला. ' गफूरचा मुलगा हा महंमद...महंमद मेरे बेटे! मुझे पहचा-नता है नाऽ? मेरे बाल सफेद हो गए महम्मद! मैं नहीं बदला और तू बदला बेटे...नाहीं, कांहीच बदललं नाही. मग तोच कसा बदलला?'

बापूंच्या डोळ्यासमोर तो दिसूं लागला. बापू म्हणाले होते—'या! या!! '

चांगल्या आसपास तिशीच्या वयाचा गोरापान माणूस होता तो. काळसर भिंगांचा उंची चष्मा नि जुना झालेला पण ऐटबाज सूट

त्यानें चढविला होता. त्याचं नाक धारदार नि बारीक होतं नि बोलतांना इंग्रजी पद्धतीनं खांदे उडवायची त्याला संवय होती. बापूंना अर्थातच हे असं का करतात हें माहीतच नव्हतं.

बापू म्हणाले—'बसा! काय काम आहे आपलं?'

तो गृहस्थ बसत म्हणाला होता—

'मी ऐकलंय आपल्या हाताखाली कारकुनाची जागा रिकामी झालीय....मी करीन ते काम!'

बापू म्हणाले—'होय, चिंतोपंत रिटायर झालेत. जागा रिकामी झाली आहे खरी पण तुम्ही...तुम्ही कराल ते काम?'

'होय!'—तो गृहस्थ उसासा टाकून म्हणाला होता—'मी करीन...करणं भागच आहे मला...मी आपल्याविषयीं ऐकलं आहे. आपण मला मदत कराल तर पोरंबाळं दोन वेळां जेवतील!'

बापू चकित होऊन त्यांच्याकडे पहात राहिले. त्यांच्या रुबाबाकडे पाहून त्यांची बापूंना फारच कीव आली.

'ठीक, ठीक...मी अवश्य सांगेन दप्तरदार साहेबांना...मी शक्य ती खटपट करीन! नांव काय आपलं?'

'केशव गंगाधर देशपांडे'

'जरुर, जरुर खटपट करीन मी'

'उपकार होतील आपले-' असं म्हणून तो गृहस्थ निघून गेला होता.

'चांगले उपकार केलेत देशपांडे तुम्ही!' वामन खरंच म्हणाला होता. 'तुम्हींच माझे साहेब शोभता....कोण आहांत तुम्हीं! काय काम होत माझ्या आयुष्यांत यायचं? चिंतोपंतावर मी जन्मभर विसंबलो होतो....तुम्ही घात केलात....तुम्ही, घात केलात तुम्हींच! नाहींतर तिजोरींतले सहाशे रुपये कमी कसे झाले असते. माझी सही

आहे. पण मी घेतले नाहींत....कुठं आहेत मग ? तुम्हीच वसूल कर-
-ताना पैसे ? माणसा ! काय केलंस हें तूं ! मला तुझा चेहरा नाहीं
आठवत. तूं....तूंच मजकडून सह्या घेतोस ना ?....अरे ! तूं....तूं
माझ्या मधूसारखा, बिशूसारखा तुला म्हटला अन् तू हें काय केलंस ?
हा कुठला नवा कायदा रे ? ही कुठली नवी रीत रे ? मला सुभेसाहेब
ओळखतात....कचेरींतलें सारे ओळखतात ! माझी सही....सही आहे
त्यावर ! मग कुठे गेले पैसे ? आज बचावेन, दुसऱ्या खात्यांत बदलीन
पण कोणत्या तोंडानं हें काम करूं ? उद्या ?....उद्या नाहीतर परवां ?
वामन ! वामन ! गड्या; पण तुला नाहीं म्हणणार....देशपांडे ! सारं
तेंच आहे आणि ही तुझी नवी रीत कोठली रे ?....रमे ! रमे! हात दे !
रमे ! वाचव ! सांग काय करूं....देवा ! वाचव...ती कचेरी....
चाळीस पायऱ्या....एक, दोन, तीन चाळीस, पंचेचाळीस पायऱ्या....
पंचावन पायऱ्या चढलों....आतां नाहीं चढवल्या जाणार....पंचे-
चाळीस पायऱ्या ! छेः छे! महंमद....काठी !'

टांग्यांतून उतरतां उतरतां बापू एकदम घेरी येऊन पडले. एकच गर्दी! वामनराव धांवत आले. दप्तरदार धांवत आले. देशपांडे कुठे आहे? आज आला नाहीं. बापू कशाला आलांत ? घरी जा....दूर व्हारे सारे. मोकळं वारं येऊ द्या....पाणी शिंपडा डोळ्यांवर....महंमद इन्हे घर ले जाओ ....वामनराव ! जा तुम्हीच जा....'

'क्या हुवा मेरे मालिक ?'

'कसं वाटतंय बापू....टांगा धावतोय, ताजी हवा लागतेय् !'

'कोण ? वामनराव ? वामनजी....काठी कुठंय माझी ? ठीक! वामन.... हा नवा बदल कसला झालाय रे ?....'

'कशाचा नवा बदल ?....'

‘ काय सांगू रे वामन ! तुला काय सांगू ?....’ वामनचा चेहरा गंभीर झाला होता.

+ + +

रमाबाईंनी धडधडत्या अंतःकरणानं बाहेर पाहिलं. बापूंना आधार देत वामनराव आंत येत होते. त्या घाबऱ्याघुबऱ्या झाल्या. त्यांनी किंकाळी दिली—‘ मधूऽ बिशूऽ ’ बिशु शाळेंत गेला होता. रमाबाईंच्या डोळ्यांतून अश्रू वाहिले. बापू वामनरावांच्या आधारानं हळूं हळूं वर आले. त्यांचा चेहरा पांढरा फटफटीत पडला होता. वामनराव म्हणाले—

‘ वैनी सांभाळा. बापूंना जरा घेरी आली होती. मी जातो, येईन संध्याकाळीं. ’

वामनराव गेले. बापू बिछान्यावर आडवे झाले.गोठलेल्या डोळ्यांनीं त्यांनीं रमाबाईकडे पाहिलं.

‘ डोळ्यांना पदर कशाला लावतेस ! भलतंच ! सुमी काय म्हणेल ? बिशू, मधू कुठं आहेत ?

रमाबाईंनी जवळ जवळ किंकाळी फोडली— ‘मधूऽऽ’

‘ कुठं आहेत ? कुठं आहेत?’ बापूंना मूर्च्छा येऊं लागली होती. मधू माळा उतरुन खालीं आला. हातांतलं पुस्तक दूर फेकलं....

‘ बापू ! माझे बापू !! ’

मधू बापूंच्या छातीवर डोकं ठेवून मूक रुदन करूं लागला.त्यांच्या तोंडावर, गालावर मायेच्या अतिरेकानं हात फिरवूं लागला.

‘ बापू ! घाबरूं नका; मी आहे ना ?.... हा मध्या तुमचा.... ऐकलं का बापू.... काय ? ’

बापूंनी मंदपणे डोळे उघडले. हळुहळूं हात वर नेऊन मधूच्या

पाठीवर फिरविला ! खोल आवाजांत बापू म्हणाले—

‘ हो रे बेटा !!....’

## : १९ :

बिशू अतिशय गोंधळला. बबड्या नि तो झोपाळ्यावर बसले होते. बिशूच्या हातीं पोह्यांची बशी होती. कुठल्या दिशेला.... कोणत्या कोपऱ्याकडे दृष्टि वळवावी हें त्याला कळत नव्हतं. म्हणून त्याची दृष्टी नुसती बशीवरच खिळून राहिली होती.

‘ गोंधळलाय् बरं का ’ कोपऱ्यांत मंजुळ आवाज किणकिणला, त्या आवाजासोबतच दुसरं कोमल बालिश हंसू खुदखुदूं लागलं....

मग बिशूनं मोठ्या प्रयासानं नजर वर केली. दोन जोडव्या घातलेले गोरे पाय नि दोन लहान लहान साजिरी पाउलें....

थोरामोठ्यांच्या घरीं जायची बिशूला संवय नव्हती. परकी बायामाणसं त्याच्या सभोवर अशी कधींच जमली नव्हतीं....साऱ्यांच्या कौतुकानें लकलकत्या नजरा त्याच्यावर अशा कधींच खिळल्या नव्हत्या. सारीं आपणाकडे बघताहेत या जाणिवेनं त्याला अतिशय लाजल्यासारखं झालं. प्रयासानं नजर वर करीत करीत त्यानं कमरे पावेतो आणली नि झटकन नजर खाली करुन पोह्याचा एक चमचा तोंडांत टाकला. तो जोरानं घास चघळूं लागला नि बबड्याकडे बघूं लागला.

‘ पोहे आवडले नाहींत का रे ? किती गोंधळलाय हा ? ’

‘ छेः छेः पोहे छानच झालेत. कांहीच बिघडलं नाहीं ’ हें त्याला म्हणायचं होतं म्हणून संकल्पानं त्यानं एकदम डोळे वर केले.

पण तो पुटपुटला—‘ छेः तसं नाहीं....मला. ’

त्याच्या नजरेला दोन मुलींचे हंसरे डोळे भेटले. एक बबड्याची ल्हान बहीण होती नि दुसरी मोठी. मोठीच्या सौम्य चर्येवर कमालीचं कौतुक पसरलं होतं नि ल्हानी निर्मळ कुतूहलानं नि गमतीनं बिशू-कडे बघत होती.

लाजेनं आपला लाल चेहरा बिशूला लपविता येईना. तरी तो धीर करून म्हणाला—' फार छान झालेत पोहे ! ' असं म्हणतां म्हणतां त्याचं अवसान एकदम संपलं, अन् त्याची नजर बशीवर गुंतून राहिली...!

घरीं परततांना हाच प्रसंग त्याच्या मनांत उसासत होता. बबड्या-च्या नव्या सुसज्जित घरांत शांति, समाधान, मोकळेपणा नि निश्चि-तता बिशूला खोलवर जाणवली होती आणि त्या तृप्त प्रेमळ आनंदी घरानं त्याच्या हृदयाला विलक्षण ओढ लाविली होती. घरीं परततांना तें घर त्याला गोड स्वप्नासारखं वाटूं लागलं. त्या घरांत दैन्य, चिंता नि भयाची काळी छाया भेडसावीत नव्हती.

फ्रो गंजांतील बबड्याच्या घरांतून परततांना उन्हं कलली होतीं तरी छाया रांगत नव्हत्या...संध्याकाळ गंजलेली नि हूरहूरती वाटत नव्हती ! त्या मोकळ्या नि रेखीव वस्तींत चांगलाच उजेड होता. गुलाबी संध्याकाळ मनांत अननुभूत गोड संवेदना निर्माण करीत होती. आकाशाचा विराट निळा घुमट पश्चिमेस गडद गुलाबी झालेला होता नि त्याच्या पार्श्वभूमीवर छायामय टॉवरचं दिव्यानं उजळलेलं घड्याळ साडे सहा वाजवीत होतं. सूक्ष्म आल्हादानं, हृदयाच्या अंतर्हृदयांतील अज्ञात स्वप्नद्रवाच्या भारानं एक प्रकारचा मधुर विषाद बिशूच्या उम-लत्या मनांत दरवळूं लागला.

त्याचे पाय हलुहळूं शहराच्या दिशेनं पडत होते. पण मन मागे

मागे रेंगाळत होतं. टॉवर शेजारी एक चांदणी लुकलुकत होती. त्या चांदणीच्या लुकलुकत्या प्रकाशांत वयःसंधीतील अश्रूसारखं लुकलुकतं अंतःकरण थरथरूं लागलं...नि त्या अश्रूच्या शुभ्र लकाकती बबड्याच्या लहान बहिणीचा चेहरा थरथरूं लागला. दूर एकाकी वनांत संध्या-काळच्या सरत्या रंगाच्या नीलिमेंत....घरी परतणाऱ्या बैलाच्या मंजुळ घंटारवाच्या किणकिणाटांत नि गोधूलीत किसान कन्येच्या कंठांतून निघणाऱ्या मनमोकळ्या तानेसारखं कांहीतरी खोलवर अंतःकरणांत वलयांसारखं उमटणारं....

बिशुच्या मनाला उमज पडत नव्हता. मधुर व्यथेच्या पीडेनं त्याचे पाय पुढें पुढें जात होते पण मनांत कुणीतरी उसासत उमलत होतं; जागं होत होतं. आकाशाच्या निळ्या तरंगाप्रमाणें मनभर पसरत होतं.

हलुंहळूं समोर पूल दिसूं लागला. तिथं नवी वस्ती संपणार होती. पूल ओलांडला कि धूळच धूळ....धुळीच्या ढगांत पिंगट खड्या-सारखे विजेचे बल्ब....आज एकटा किती दूर आलाय तो. बापू, आई काळजी करत असतील. कुठं गेला....कुठं नाहीं. पण इथवर एकटे यायला कोण भीतो ? वझेची खोड मोडल्यापासून मला भय उरलेलं नाहीं. उलट वझेच सोबती झालाय् आपला ! बबड्याचा गोडपणा त्याच्यांत नाहीं. बबड्या देखील तेंव्हापासून किती धीट झालाय; अन् आता लहान का आहे मी ? चांगल्या दोन दोन वर्गाच्या एकदम परीक्षा देतोय....पहिली नाही....दुसरी नाहीं....तिसरी नाहीं, चांगला सहावींत आहे. मी नि बबड्यानं तेंव्हापासून एक ठरवलंय—भ्यायचं म्हणून कधींच नाही. आतां रोज फिरायला जातो ना ? चांगली एक बांबूची काठी घेतली ! बस्स् ! ती मी हातीं घेतों, एक बबड्या घेतो नि जातो दोघं फिरायला...चांगले क्षिप्राब्रिज पर्यंत जातो नि अंधार

पडायच्या आधीं परततों आम्ही ! काठी जवळ असली कीं मग कशाची भिती ? हो काठी मात्र लागतेच्. बबड्याला कुत्र्यांची फार भिती वाटते अजून ! मलाहि वाटते थोडी थोडी...पण काठी ठेवायला लागल्यापासून कुत्र्यांची सुद्धा दिक्कत वाटेनाशी झाली आहे ! परततांना आम्हीं ड्रेनजचे नळ पडले आहेत ना त्यांत काठ्या ठेवून देतो ! बस्स् ! बबड्यानं त्याच्या बहिणीला हें सांगितलं तर कोण जाणे कां खो खो हंसली ती ! काय होतं हंसायसारखं कोण जाणे ?

हृदयाच्या थरथरत्या अश्रूंत बबड्याच्या लहान बहिणीचा चेहरा थरथरुं लागला ! त्या घरचा तो निश्चित आनंद...त्याची ऊब जाणवूं लागली नि एकाएकी आइचा ओढलेला चिंताग्रस्त चेहरा त्याच्या नजरेसमोरुन तरळून गेला.

'आपलं घर ! आइला कुणास ठाऊक—काय झालंय् ! चोरुन डोळे पुसतांना दिसते. आई, आई, काय झालंय् ग ऽऽ तुला ?'

'कुठं काय झालंय ? जा बेटा खेळ...खेळायचं वय आहे हे'

'असंच खेळता खेळता ढासळलं होतं ना ते ?'

अन् बिशूच्या नजरेसमोर रात्रीं पाहिलेलं ते स्वप्न उभं झालं...

'हाच वाडा. हेंच मधलं शेवाळानं गचगचीत हिरवं आंगण. बिशू खेळता खेळतां जिन्याशेजारी येतो; तों काय एकदम कमानी ढांसळू लागतात. तो धूम पळतो नि डळमळत्या भिंतींच्या मधून घाबऱ्याघुबऱ्या स्वयंपाक घरांत येतो ! स्वयंपाक घराच्या मागे गचीवजा पत्र्याचं छत आहे ना तिथं पळतो....तों समोर त्याला भलतंच दिसतं. अंगणाच्या मधोमध पिंपळाचं झाड आहे ना त्या ऐवजी प्रचंड वडाचं झाड त्याला दिसतं. अगदी जुनं. पारंब्या जमिनींत मूळ धरुन नवीन झाडं झालेलीं. एकाएकी त्याच्या पायाखालचा पत्रा एकदम

ढासळूं लागतो ! काय आश्चर्य, एवढं मोठं वडाचं झाड एकदम उन्मळून पडतं !! जमिनींत खोल गेलेली त्याची पाळंमुळं एकदम आकाशांत उडतात अन् त्यांच्या फासांत गळे अडकलेली शुभ्र प्रेतं वर फेकली जातात !! फास लागल्यासारखी लोंबू लागतात !! अन्...

त्यांतला एक चेहरा थेट बापूंसारखा. धोतर आंगभर गुंडाळलेल्या बापूसारखा...

भयंकर किंकाळी फोडून बिशू जागा झाला होता. त्याचे पाय थरथरुं लागले. 'बापू हो ! बापू किती किती मोठे आहेत.मग बापूंना काय होतं ? आईसुद्धा किती मायाळू आहे ? पण बबड्याच्या आईचा चेहरा किती भरलेला नि हंसरा आहे. किती थाटामाटाची आई आहे बबड्याची नि वडील देखील किती रुबाबदार आहे. त्याचे....माझे बापू....माझी आई....हे असं कां होतं ? आई लपून लपून डोळे कां पुसते ? सुमाताई अशी कावरीबावरी कां असते ? म्हणे आपण गरीब आहोंत. पण कां बरं गरीब आहोंत ? बापू किती चांगले आहेत. बबड्याच्या वडिलांपेक्षा शंभरपटीनं....छेः छेः बापूंची परीक्षा देव पहात असतील. असंच नव्हते का म्हणाले ते ? '

अन् बिशूची पावलं जलद पडूं लागली. बापू—आईजवळ जलद उडून जावंसं त्याला वाटूं लागलं. वाट बघत असतील बापू डोळ्यांत तेल घालून. दादा बाहेर गेला असेल. दादाचा-मधूचा चेहरा बिशूला साफ दिसूं लागला. दादासंबंधी बापूंना फार काळजी वाटते ! बापूंना नि आईला दुःख देतो म्हणून बिशूला दादाचा फार फार राग येतो ! पण फिरून त्याचा त्यालाच उमज पडत नाही. आपला दादा वाईट का आहे ? पण तो कसल्या तरी विचारांत गुंग असतो. आपल्याशीच बोलतो. नि दुसऱ्यांशी बोलता बोलता त्याला साफ विसरून जातो.

काय विचार करतो एवढा? आपला दादा आपला नाही !! तो कुठंतरी दूर राहतो. पण दादा कसा विलक्षण आहे. बिशूच्या डोळ्यासमोर फिरून तो प्रसंग तरळूं लागला—

मधू बिशूला म्हणाला होता— ‘ चल रे बिशा ! आज तुला भर्तृहरीची गुफा दाखवतो. ’

बिशू आनंदानं तयार झाला होता. त्याला गुफा पाहणं म्हणजे केवढं धाडसाचं काम वाटत होतं. पण दादाबरोबर चालता चालतां बिशूचा जीव किती घाबरा झाला होता. मधू बिशूच्या गतीनं चालायचा प्रयत्न करी आणि फिरून स्वतःच्या तंद्रींत चालायला लागला कि भरभर चालूं लागे. मधेमधें थांबून म्हणें— ‘ कां ! थकलास एवढ्यांत ? अजून कितीतरी चालायचंय.... चाल भर भर....’

सायंकाळचें पांच वाजायची वेळ. क्षिप्रेच्या जुन्या पुलाला एका बाजूस सोडून एक बांधून काढलेली वाट नदीच्या काठाकाठाने दूरवर गेलेली दिसली. मधू म्हणाला–‘ चल बेट्या बिशू ! आपण जवळच्या वाटेनं जाऊं !! ’

त्या नीट बांधून काढलेल्या वाटेवरून मधूदादाबरोबर चालताना बिशूला खरोखर मोठी गम्मत वाटत होती. बिशूला दूरवर मोठा जाळ दिसला. सायंकाळच्या तिरप्या पिवळ्या प्रकाशांत दूर लालभडक ज्वाळा फडफडत उंचावत जात होत्या नि ठिणग्यांचे कण तुषारासारखें उडत होते !! जसजसा तो जाळ जवळ येऊं लागला. तसतसं बिशूचं कुतूहल वाढूं लागलं. बिशूनं आश्चर्यचकित होऊन विचारलं— दादा ! ते काय आहे रे ?.... काय पेटवलंय बरं ते ?

‘ चिता पेटली आहे ती चिता.... !! ’

बिशूच्या छातींत एकदम धस्स झालं. त्याच्या पायांत गोळे आले.

' चिता जळतेय म्हणजे प्रेत जळतंय ' भितीनं बिशूची छाती धडधडूं लागली.

'अरे ! भिता काय त्यांत एवढा....चल आपण झटकन शेजारून निघून जाऊं....'

असं म्हणून मधूनं जवळजवळ ओढतच त्याला चितेशेजारून नेलं. माणसाच्या आकृतिसारखं कांही दिसलं नाही म्हणून बरं ! पण कसल्यातरी अज्ञात भयानं बिशूचं हृदय पिळून निघालं. बिशू एकदम म्हणाला—' दादा ! घरी जायचं मला परत....'

ती पिवळी सायंकाळ.ती लालभडक चिता. तें अज्ञात दारुण भय!

बिशू व्याकुळ होऊन म्हणाला होता.... 'मी नाहीं येत रे आतां'

बिशूची पाठ थोपटत मधू म्हणाला— ' तें बघ प्रचंड वडाचं झाड....बघ आलों की नाही आपण ! माझा भाऊ असून भीतोस ? माणसानं कसं बहादुर असायला हवं.'

जुनाट वडाशेजारी निर्जन एकांत होता. दूरवर नदीच्या उथळ प्रवाहांतून डोईवर गाठोडं ठेवून पिवळी ओढणी घातलेली माळवीण संथपणे चालली होती. आणि समोर एक प्राचीन शिल्पकलेची ठेंगणी दगडी कमान दिसत होती. ते कमानीखालून आंतील काळोख्या अंगणांत गेले होते.

कोपऱ्यांतील ओवरींत शेंदूर नि भस्म चोपडलेला नाथपंथी बैरागी बसला होता ! त्याची लाल नजर या दोघांवर खिळली; तो म्हणाला—अभी न जाना बच्चा ! अंधेरा हो चला....!!

मधू म्हणाला—' इथं गोरखनाथांनी तपश्चर्या केली होती ! ' बैरागी उठून आंत गेला. जुनाट पिंपळ झाडावर ' टीह....टीह....' असा एकाकी आवाज तळमळला. शांतता अधिक गहन झाली. गोर-

खनाथाच्या उल्लेखानं मन फार प्राचीन काळाच्या आभासांत जडावूं लागलं....

बिशू म्हणाला—' दादा ! घरीं चल ! '

मधू हंसला. ' भर्तृहरीची गुफा नाही पहात झालं. पण ती शेजारची गुफाच पाहूं या. एवढ्या दूर उगीच का आलो आपण ? '

ते त्या दुसऱ्या गुफेच्या तोंडाशी आले तेव्हां बाहेर ऊन उतरत होतं. सपाट जमिनीवर एक शिळा ठेवलेली होती. ती दूर केली नि खालीं जमिनीच्या पोटांत पायऱ्या गेलेल्या दिसल्या. मधू आधी आंत उतरला. हळुहळू त्याचं शरीर नि मग मस्तक आंत गेलं. जमिनींतून खोल आवाज आला–' बिशू....बिशू ये ! उतर आंत '

बिशू धडधडत्या अंतःकरणानं आंत उतरला. दहा पंधरा हाताएवढा अंधुकसा उजेड आंत पसरला होता. ते आंत सरपटत चालूं लागले. गुहेच्या छिद्रांतून येणारा उजेड संपला नि गुडुप्प अंधार पसरला....पुढे रांगणाऱ्या मधूने टॉर्चचा उजेड पाडताच दोहोबाजूस रांगेत ठेवलेल्या मूर्ती अंधुक दिसूं लागल्या नि बॅटरीच्या अंधुक उजेडाच्या जादूनं त्यांच्या मनोहर मुखांवर गूढ स्मिताचा भाव पसरला. मधू भान विसरून त्या मूर्तीकडे पहात होता.

बिशूच्या कपाळावर घामाचे थेंब टपोरले. कुबट अंधारांत तो गुदमरुं लागला. गुफेचं छत थोडं पुढे गेल्यास डोक्यास भिडणार होतं.

'पुढे चल ! गम्मत दाखवितो....' भरभर रांगत मधू पुढे गेला. बिशू त्या मूर्तींच्या गूढ मनोभावांच्या प्रभावाने भारून अत्यंत प्रयासानं मागोमाग जाऊं लागला.

' पहा ! '

मधूच्या टॉर्चचा प्रकाश एका अगदी लहानशा देवाघराएवढ्या

दरवाजाच्या कमानीवर पडला. तिथं गुफा संपली होती. अत्यंत सुबक शिल्पाचे गुळगुळीत काळ्या पाषाणाचे खांब लखलखत होते. आंत शिवाच्या संगमर्वरी ज्योतिर्लिंगावर अगदी ताजी फुलं वाहिल्यासारखी दिसत होती.

बिशूला एकदम तृप्त बरं वाटलं. त्यानं मनांतल्या मनांत नमस्कार केला. त्यानं अधिक आंत डोकावून पाहिलं. वाट कुठं तरी अंधारात गडप झाली होती. तो मागे वळला नि एकदम किंचाळला—दादा ऽऽ

मधूनं एकदम मागे वळून पाहिलं. दोन हिर्वेगार डोळे रेडिअम-सारखे लखलखत होते.

मधूच्या अंगावरहि सराऱ्न काटा उभा राहिला. बॅटरीचा झोत फेकतांच एका जनावराची आकृती गुफेच्या तोंडाकडे पळून गेली.

मग एकदम बिशूला जोरजोरानं ओढीत मधू म्हणाला—'चल,... चल, अरे वेड्या मांजर होती ती....मांजर! ....'

मग बिशूला खांद्यावर बसवून त्या सरत्या सांजेंत मधूदादा भर-भर घरीं गेला होता. मधून मधून त्याला गोंजारींत होता. त्याचे अश्रू पुशीत होता.

ती जळती भडकलेली चिता....ती लाल सायंकाळ....गुफेच्या अंधारांतील ते मूर्तीचे गूढ स्मित....ती बॅटरीच्या पिवळ्या प्रकाशांत लखलखणारी शाळुंका....बिशूच्या मनांत कुठे तरी भयाच्या काळ्या लाटा उसळत गेल्या नि त्याच्या दादाचे केस पाण्यावर पसरले गेले. डोक्याचा उंचवटा काळ्या खडकासारखा दिसत होता.

पण दादाचा मायाळू हात पाठीवर फिरत होता. त्याच्या मायेची गाढ प्रतीति त्याला यावेळी पुन्हा होऊं लागली !

आणि यावेळी त्या पिंवळ्या जर्द मण्यासारख्या शाळुंकेच्या ऐवजी

बबड्याच्या लहान बहिणीचा निरागस चेहरा दिसूं लागला. तो हसूं लागला. बिशूला फार फार बरं वाटलं. त्यानं समोर पाहिलं. पुलाच्या टोकाला धुळीचे ढग तरंगत होते. मागे वळून पाहिलं सुरेख टॉवरच्या प्रकाशित वर्तुळांत साडेसहा वाजून पांच मिनिटं झालीं होतीं. टॉवर शेजारी एक टपोर चांदणी लखलखत होती. बबड्याची वडील बहीण....नि....नि माझी सुमाताई !! सुमीचा गोल पोरसवदा प्रेमळ चेहरा त्याच्या समोर उमटला.

'सुमाताई....किती ग तूं मायाळू....मऊ शालीसारखी वेढून घेते तुझी माया....किती शांत...बबड्याची वडील बहीण नि तूं.... तिचे डोळे कसे चमकत होते. ताई ! तुझे डोळे कां ग उदास असतात? चमकत कसे ग नाहीत ?

बिशूचं हृदय पिळून निघालं. त्याला एकदम जाणवलं कीं दादाची धोंघावत वाहणारी नदी वळण घेऊन कुठंतरी निघून गेली आहे. तो स्वत: एका संथ डोहाशी उभा आहे. त्यांत बापू....आई नि सुमाची प्रतिबिंबं तरंगत आहेत.

शेजारुन कापसाच्या गठ्यांनी शिगोशिग भरलेली प्रचंड लॉरी भरवेगांत निघून गेली. उडी मारून तो पुलाच्या कडेस खेटून चालूं लागला.

तो भरभर चालूं लागला. घराकडे धावूं लागला. अन् वाटेवर येतायेतांच तान्ह्याच्या विलक्षण किंकाळीने त्याच्या धडधडत्या अंतःकरणावर जोराचा आघात झाला !

त्याचं हृदय शतशः विदीर्ण झालं.

पुलाच्या कमानीखालून लक्तरें सावरीत छाया भरभर येत होत्या केस पिंजारलेल्या एका बाईचा आक्रोश सगळीकडे पसरत होता....

स्वतःचे कोपरे सोडून महारोगी सर्पटत सर्पटत तिच्या सभोंवार गोळा होत होते....एका वीतभराच्या तान्ह्यावरून मोटारीचे दुहेरी टायर निघून गेलं होतं. तान्ह्याचं डोकं चेचून भुईसपाट झालं होतं. पोटां-तली सगळी आंतडी बाहेर निघालीं होतीं. रक्ताचा एक ओघळहि दिसत नव्हता....त्या आईचा आक्रोश अंधाराला चराचरा कापीत होता....बिशूच्या अंतःकरणास चराचर कापीत होता....छायांची धुडं मूकपणें थिजलेल्या डोळ्यांनी तें पाहात होतीं ! बिशूच्या गळ्यांत एक किंकाळी गरगरा फिरूं लागली. भितीनं तो गपकन खालीं बसला. त्याचे गाल ओले चिंब झाले होते.... तो बसला होता.... एक मिनिट....दोन मिनिट.... तीन मिनिटें....

## : २० :

बापूंना बरं वाटलं.

रमाबाई हळूच म्हणाल्या—

‘ म्हटलं ! वामनरावांना कळवून द्यावं....!! ’

बापूंच्या उतरलेल्या चेहऱ्यावर आठ्या पडल्या.

‘ नको ! आजवर जसं जगलो तसंच जगूं दे !! मला कांही होणार नाहीं रमे !! तू पहाशील....तू पहाशील....मी विचार केलाय्....देश-पांडे जरूर अडचणींत सापडला असेल अन् म्हणूनच एकाएकी सुटी काढून इन्दूरला निघून गेलाय् तो !...असेल, तो पैसे परत करणार असेल...मला कुणी आजवर फसवलं नाहीं...कांहीतरी घोटाळा झालाय्...तो पैसे आणील आणि कदाचित् माझी क्षमा देखील मागेल....देव अन्याय नाहीं करणार असा...मी उगीचच घाबरलो

होतो. हे बघ, देशपांडेला भेटायला मीच इंदूरला जातो....त्याला गाठतो....मला पहाताच जरूर त्याचं अवसान गळेल....' बापूंच्या उदास चर्येवर क्षणभर तरतरी दिसूं लागली.

रमाबाईंचा चेहरा पडला होता. त्यांचे डोळे खोल गेले होते. कपाळावरचे केस पांढरे दिसूं लागले होते !

' मला वाटतं वामनरावांचा सल्ला घ्यावा '— त्या म्हणाल्या.

बापूंनी किंचित दचकून रमाबाईकडे पाहिलं ! त्यांच्या आयुष्याला उचलून धरणाऱ्या, त्यांच्या आंतरिक श्रद्धेस विजयी करण्यासाठी त्यांच्यापेक्षाहि अधिक जिद्दीनें झगडणाऱ्या आपल्या पत्नीकडे त्यांनी निरखून पाहिलें आणि तरी यावेळीं तिच्याशी सहमत होणे त्यांना शक्य नव्हतें. वामनरावांचे आणि त्यांचे मार्ग भिन्न होते. ते बाळमित्र होते खरें! नि वामनाविषयीं त्यांना आपुलकी वाटत होती हेही खरें! पण वामनचें शास्त्र त्यांचें शास्त्र नव्हतें ! वामनरावांचा त्यांनी कधीच जोराने विरोध केला नव्हता, नुसते दुर्लक्ष केलें होतें !! आणि त्याची धार वामनरावाच्या अंतर्यामाला पूर्णपणें माहीत होती !! छेः छेः कसं शक्य आहे तें ! कसं शक्य आहे.... ' वामन मी हार खाऊनहि जिंकेन ! पण तू गड्या जिंकूनहि हरशील....'

रमाबाईंच्या तोंडाकडे पहात बापू अतिशय खजीलपणें हसले.

' उद्या सकाळच्या गाडीनं अवश्य जाणार मी इंदूरला !

रमाबाईनी विषण्ण नवलानं कृश बापूंकडे पाहिलं. त्यांच्या हृदयावर सतत सत्ता चालविणारी बापूंची आंतरिक मूर्ति त्यांना दिसली. !! त्या खालच्या मानेनंच विवश स्वरांत म्हणाल्या—' हो !! पण संभाळायचं असतं मात्र !! ' असं म्हणून त्या कोपऱ्याकडे बघूं लागल्या.

÷ ÷ ÷ ÷

सकाळीं दहाच्या सुमारास बापू इंदूर स्टेशनवर उतरले. उज्जैन स्टेशनवर फेटेवाल्या शेतकऱ्यांची नि .कारकुनांची गर्दी विशेषें करून असायची. इथं अद्यावत पद्धतींची गर्दी विशेष. पेंट कोट घातलेलीं सुटाबुटांत वावरणारीं माणसं आणि तशाच सुशिक्षित तरुणींची धांवपळ विषेश. आज स्टेशन रंगी बेरंगी गर्दीत नुसतं फुलून गेलं होतं. बापू कितीतरी वेळा इन्दूरला आले असतील पण हा भेद त्यांना आजच खोलवर जाणवला !! आपल्या कोटाची बटणं लावीत पिशवी उचलून ते गर्दीतून हळुहळूं वाट काढूं लागले !

बापूंजवळ पत्ता होता. ते हळुहळूं शहराकडे जाऊं लागले. सुंदर नि शानदार शहर ! चारी बाजूला गुळगुळीत डांबरी रस्ते पसरलेले नि रस्त्याच्या दोहोबाजुस उंच नि भरघोस झाडांच्या रांगा, युक्लिप्टसची उंच डौलदार रुपेरी बुंध्याचीं झाडं त्यांचीं पानं सूर्यप्रकाशांत लखाखत असलेलीं. दोन्ही बाजूंनी लखाखत्या मोटारी भर्र करीत शेजारुन जात होत्या ! बापू फूटपाथच्या कडेकडेनं हळुहळूं जात होते. चौरस्ता पार करताना बापूंना हिरव्या वृक्षराजीत लपलेला लाल टॉवर दिसला. तिथं साडेदहा वाजत होते. बापूंनी जलद चालायला सुरवात केली. पण त्यांची चाल आपोआप मंदावली. आपण अतिशय अशक्त आहा याची जाणीव त्यांना झाली. काठीवर जोर देत निश्चयानं ते चालूं लागले.

जेल रोडच्या एका घरासमोर उभे झाले. तेंव्हा त्यांच्या बगलेंत पिशवी तशीच होती. ते ठाम उभे झाले. मग हळुहळूं बारका जिना चढून वर गेले. दार बंदच होतं. त्यांनी हळुहळूं टकटक केलं. घोगऱ्या आवाजांत त्यांनी हाक दिली—

' देशपांडे ! अहो ऽ देशपांडे....'

बराच वेळ कुणी बोललं नाहीं. एक दोन मिनिटं बापू स्तब्ध उभे झाले. कदाचित देशपांडे आंत असेल. आपणाला पाहून तो किती शरमिंदा होईल. बापूंना त्याचा शरमिंदा चेहरा साफ दिसूं लागला. त्यांच्या हांकेला कुणीच 'ओ, देईना. त्यांनीं नेटानें आवाज उंच करून फिरून हांक दिली.आंतून कुणी तरी आलं नि दार उघडलं ! बापूंनीं विचारलं—

'देशपांडे आहेत का ?'

'कोण देशपांडे ?'

'केशवराव देशपांडे !'

ती बाई तशीच आंत पळाली. आंत दोघातीघांचा हंसण्याचा आवाज ऐकूं आला. कुणीतरी खिदळत म्हणालं—'कोण पाव्हणा आलाय हातांत पिशवी घेऊन....'

बापूंनी हें वाक्य स्पष्टपणें ऐकलं ! आत कुजबूज चालूच होती. बापूंना खोळंबून ठेवण्यांत आलं होतं. शेवटीं एक काडी–पहिलवान तरुण—छातीच्या पिंजऱ्यावर गंजीफ्राक नि बारीक मनगटावर घड्याळ बांधलेला—दाराशी आला. दोन्ही हात दाराच्या दोहोबाजूस ठेवून वाट अडवून उभा झाला ! रुक्ष आवाजांत म्हणाला—

'ते इथं नाहीत....उज्जैनला असतात !'

बापूंच्या डोक्यावर प्रचंड आघात आला. त्यांच्या तोंडावर दार दडपण्यांत आलं. कांपऱ्या पायांनी बापू फिरून वाटेवर उभे झाले !

'संपलं सारं !'

बापू कोरडं हंसले ! ते हळुहळू चालूं लागले. एका हातांत काठी नि दुसऱ्या हातांत पिशवी. ते नातेवाइकाकडे उतरणार होते. पण आतां काय करायचं तिथं जाऊन ? अकराची वेळ. ऊन त्यांना बेजार करूं लागलं. आपली सगळी शक्ति पार गळून गेल्यासारखी त्यांना

वाटली. ते तसेच दगडी पुतळ्यासारखे मंद गतीनं पुढे सरकूं लागले. ते चौरस्त्यापावेतो आले. अन एकाएकी त्यांच्या छातींत धस्स झालं.

'तोच तो; देशपांडेच.... ! खोटं सांगितलं त्याच्या घरच्यांनी ....अं ?'

बापू जलदीनं शरीर ढकलूं लागले. कोपऱ्यावर प्रचंड अद्यावत पद्धतीचं हॉटेल होतं—'कॉफे कोहिनूर'— तिथं, बाहेरच तो उभा होता तीघा चौघा अत्यंत फॅशनेबल तरुणांसोबत. त्याची पाठ होती. बापूंनी लगबगीनं आपलं शरीर पुढं ढकलायला सुरवात केली. बापू तिथवर पोंचेपर्यंत ते लोक हॉटेलांत शिरून एका कोपऱ्यांत मेजाभोंवती बसले देखील. हॉटेलची पायरी बापू आजवर कधींच चढले नव्हते. ते क्षणभर घुटमळले नि पायऱ्या चढून कॉफेंत शिरले. त्यांना वाटले, त्यांना पाहतांच देशपांडेचा चेहरा खाडकन् उतरेल. तो लगबगीनं पुढे येईल अन्....!

बापूंचं मन किंचित सुखावलं. देशपांडेच्या अगदी तोंडासमोरच्या कोपऱ्यांतील मेजाशेजारी बापू जाऊन बसले. त्यांची छाती धडधडूं लागली. त्यांनी समोर पाहिलं नि तत्क्षणीं देशपांडेची नि त्यांची नजरानजर झाली ! त्यांचं शरीर एकदम गोठून गेल्यासारखं झालं ! कारण बापूंच्या नजरेला देशपांडेची नजर भिडली तरी त्याच्या चेहऱ्यावर परिचयाचा लवमात्र भाव दिसला नाही. देशपांडेने जितक्या सहजपणे बापूकडे पाहिलें तितक्याच सहजपणे त्यांच्यावरून नजर काढून घेऊन तो मित्रमंडळीशी बोलूं लागला. त्याचे काळे केस चापून चोपून मागे वळविले होते नि मित्रांशी तो सभ्यपणे हंसत बोलत होता. त्याने फिरून बापूंकडे पाहिले फिरून सावकाशपणे त्यांचेवरून नजर काढून घेतली. पण, जराहि त्याची नजर चळली नाही; खुर्चीतल्या

खुर्चीतहि त्यानें बैठक बदलली नाही !

बापूंची छाती विलक्षण धडधडूं लागली !

...बापूंच्या मनांत निराळाच संशय आला. भलताच माणूस तर नव्हे ना हा ? त्याच्याकडे ते निरखून पाहूं लागले. छेः ! चेहरे पट्टी तीच....केस तसेच....चश्मा तसाच....छे, दिशाभूल होणं कसं शक्य आहे ? कारण, हो ! कोटहि तोच...

बापूंना दरदरून घाम फुटला. म्हणजे ! समोर तोच बसला आहे आणि अगदी अनोळखी माणसारखा वागतोय् ! कसं शक्य आहे हे ?

'काय देऊं !' बॉयनें विचारलें. बापूंना कांही नको होतं. पण तिथं बसणं भाग होतं. त्यांनीं पाणी मागविलं. बापू पाणी घटाघटा पिऊं लागले. आपणाला अतिशय अतिशय तहान लागली आहे हें जाणवलें. त्यांनी दुसरा ग्लास तोंडाला लावला.

तेवढ्यांत तें मित्रमंडळ उठून बाहेर गेले. देशपांडे सर्वांत पुढे गेला होता.

ग्लासांतलें पाणी संपवून बापू लगबगीनं फुटपाथवर आले. उजवी-कडच्या फुटपाथवर दहा हात अंतरावर तो संथपणे चालत होता ! सगळें बळ एकवटून बापू ओरडले—'देशपांडे ! अहो देशपांडे ऽऽ'

पण त्या गृहस्थाच्या चालींत किंचितहि फरक पडला नाहीं. झाडांच्या छाया संथपणानं त्याच्या पाठीवरून सारख्याच सरकत फुट-पाथवर अलगत पडत होत्या. त्याचीं पाउलें संथपणानं पुढं पडत होतीं. जणूं तो गृहस्थ म्हणजे देशपांडे नव्हताच. जणूं बापूंची हांक त्या माणसासाठी नव्हतीच....

काठीच्या आधारानं बापू जलद चालायचा प्रयत्न करूं लागले. त्यांनीं पिशवी बगलेंत धरली, अन् लगबग केली. बापू नि त्या गृह-

स्थाच्या मध्ये अंतर कमी कमी पडूं लागलें. तरी तो गृहस्थ तितक्याच संथपणानें पुढे पुढे जात होता. बापूंची हांक वाया जात होती. बापूंचं मन आंतल्या आंत ढासळत होतं.

शेवटी बापूंनी पुढे होऊन त्या गृहस्थाची बाही धरीत म्हटलें—'देशपांडे! ओळखलं नाहींत का हो मला?' तो गृहस्थ भरकन मागे वळला. नवलानं भिवई उंचावून म्हणाला—

'ओ हो! बापूनाना का? कसं ओळखणार नाही? कां ओळखणार नाही?'

'म्हणजे? मला ओळखलं होतं तर....तरी....तरी'

क्रोधाच्या उर्मीनं बापूंचं सर्व शरीर विद्ध झालं. त्याच्या कपाळावर घामाचे मोठाले थेंब टपोरले.

देशपांडे शांतपणानें म्हणाला—'काय बापूनाना! बरी नाही दिसत तुमची तब्येत?....'

तो जरासा हंसला. त्याच्या हंसण्यांत जें प्रकट झालं तें एरवी दिसणं कठिण होतें.

'देशपांडे! चला, कुठं तरी बसूं या! मला तुमच्याशी कांहीं तरी बोलायचं आहे! कांहीं तरी अतिशय महत्वाचं सांगायचं आहे.' बापू काकुळतीस येऊन म्हणाले.

देशपांडेवर त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. तो थंडपणानं म्हणाला—'छेः छेः बापूनाना, मला फार कामं आहेत. त्या उज्जैनच्या नौकरीवर का माझं पोट चालतं?...मला....'

'देशपांडे! देशपांडे! माझ्या वयाकडे पहा! या पिकल्या केसाकडे पहा! तुमच्या वडिलासारखा आहे मी!!'

देशपांडेचे ओठ किंचित् रुंदावले. तो तुच्छतेनं म्हणाला—'माझे

वडील केव्हांच वारले ! ते वारले नि मी माधुकरी मागूं लागलों !!

' काय हें ?....काय बोलता हें ? केशवराव माझं ऐकून घ्या.... तुमच्या हातून कांहीं घडलं असलं तर दोष देणार नाही मी तुम्हाला' बापू काकुळतीस येऊन म्हणाले.

आतां मात्र देशपांडे मोठ्यांदा हंसला.

' दोष देणार नाहीं ? कशाबद्दल एवढी दया दाखवित आहांत बापू ? अन् कोणत्या बाबतीत दोष असतो? बरं, मुद्याची गोष्ट बोला पाहूं ? मला वेळ होतोय. ' देशपांडे निक्षून बोलला व दुसरी सिगारेट शिलगावूं लागला.

' म्हटलं...म्हटलं....नीट ऐका हं माझं म्हणणं ! तहसिलींत येणाऱ्या वसुलींत सहाशे रुपये कमी पडताहेत केशवराव ! सहाशे रुपये; तुम्ही पैसे घेता नि मी सही करतो. कधीं मोजतो, कधीं तुम्ही मोजून देतां तसेच तिजोरीत ठेवून देतो...'

' म्हणजे कमी मांडले गेले आहेत का ? तुमची सही सहाशे-कमी रुपयांवर आहे का ? ' देशपांडे नवलाचा भाव दाखवीत म्हणाला.

' छे हो ! तसं नव्हे ! माझी सही पुरत्या रकमेवर आहे. पण तिजोरीत सहाशे रुपये कमी पडताहेत. '

' म्हणजे ती रकम तुमच्यापाशी आहे असा याचा अर्थ...काय कुठं खर्च बिर्च केलेत कीं काय ? ' संथपणानें देशपांडे म्हणाला.

' देशपांडे ! असं नका बोलूं हो ! या नोकरींत माझी सारी उमर गेली....केस पांढरे झाले. आजवर कधी असं झालं नाहीं. तुम्ही रजिस्टर पुढे करतां, मी सही करतो. रक्कम तिजोरींत ठेवून देतो. तुमच्या भरंवशावर...फक्त तुमच्या भरंवशावर....चिंतोपंत होते तेव्हांहि असंच चालायचं. आमचं कधीं कधीं....'

'म्हणजे? काय म्हणतां काय? मी घेतले? वेड तर नाहीं ना लागलं तुम्हाला? कसा कबूल करीन मी हें?'—देशपांडे तिरस्कारानें म्हणाला.

बापूंना अतिशय श्रम पडत होते. ते खोल आवाजांत म्हणाले—'विचार करा; विचार करा देशपांडे! विश्वासावर, भरंवशावर सारं जग चाललंय्....'

आतां मात्र देशपांडे खो खो करुन हंसला.

'कुठल्या त्रेतायुगांतल्या गोष्टी करताहांत बापू! म्हणे भरंवशावर जग चाललंय्! कुणी सांगितलं हें तुम्हाला? मला तसं बिलकुल वाटत नाहीं! जग संशयावर चाललेलं आहे! अखंड सावधपणानं झडप घालण्यास टपून बसायचं असतं....मुंगूस नि सर्पाची लढाई पाहिलीय् का हो?एकमेकांवर झडप घालण्यापूर्वी ते एकमेकांवर कसे नजरा रोखून उडी घालण्याच्या तयारीच्या पवित्र्यांत बसतात.तसं जग चाललंय्! दुसऱ्याच्या असावधक्षणीं एकदम झडप घालायची असते, तोंवर दगडासारखं निर्जीव पडून रहायचं असतं....शर्यत असते शर्यत, भलता चेव चढतो. भलती इर्षा जागी होते. स्वतःच्या आड येणाऱ्याचा चेंदामेंदा करुन टाकण्याची धुंदी चढते. हीच तर जगाची गंमत आहे. आज हरेकाला धांवायची मुभा आहे; धांवण्याची नि पुढे जाण्याची....पुढे जाण्याची नि धांवण्याची...आड येणाऱ्याला नेस्तनाबूद करण्याची....अन् तुम्ही म्हणतां भरंवशावर जग चाललंय्....कुठल्या त्रेतायुगांतल्या गोष्टी करताहांत बापू...!' देशपांडे फिरुन विचित्र हंसला.

बापूंच्या सभोवार जग फिरुं लागलं. खरंच कोणती दुनिया आहे ही? चिंतोपंत असं बोलले नव्हते. कुणी असं बोलत नव्हतं. शिव

शिव ! कसला ब्रम्हघोटाळा आहे हा ?

' देशपांडे ! निर्दय होऊं नका ! विचार करा....या म्हातारपणाचा विचार करा....तुमच्याशिवाय कोण उचलणार पैसे ?....पहा....पहा ....कांहीं तरी तोड काढू या....नाहीं तर माझा आत्मा शाप देईल तुम्हाला....माझ्या कच्चाबच्च्यांची हाय लागेल तुम्हाला....गरिबाची हाय फार वाईट असते देशपांडे !'

देशपांडे भरकन वळून म्हणाला—' जा जा, बचावाची व्यवस्था करा....नाहीतर प्रसंग गुदरेल....म्हणे गरिबाची हाय वाईट असते. अहो ! गरिबाची हाय वाईट असती तर झाडून सारे कोट्याधीश, धर्ममार्तंड नि पुढारी जमीन दोस्त झाले असते....जा, बापूनाना ताप देऊं नका आणखी....'

देशपांडे सरळ पुढे चालूं लागला. बापूंना घेरी येऊं लागली. जग गरगर फिरुं लागलं.

' देशपांडे मी तुमच्या पाया पडतो ! देशपांडे मी तुमच्या पाया पडतो....!' दाती तृण धरून बापू दीनपणे म्हणूं लागले. देशपांडे दूर निघून गेला होता.

आपण खोल खोल जात आहोंत....आपल्या डोळ्यावर झांपड येते आहे असं बापूंना वाटूं लागलं. ते पुढे सरकण्याचा यत्न करीत पुटपुटत होते—

' देशपांडे....तुमच्या पाया....'

## : २१ :

' उशीर झालाय म्हाताऱ्याकडे जायला. आतां तो खवीसासारखा ओरडणार....'

मधूच्या कपाळाला आठ्या पडल्या होत्या. बाबासाहेबांकडे कारकुनी करायला त्यानं सुरवात करून आज बरेच दिवस झाले. पण एकेक दिवस त्याला अतिशय जड वाटत होता. आज रविवार असूनहि त्याला बाबासाहेबांकडे कामाला जाणं भाग होतं. पायांतल्या बेडीसारखं या कामानं त्याचं मन जखडून टाकलं होतं. तो घराबाहेर पडला तेव्हां चारा ऐवजी चांगले पांच वाजून गेले होते. हातातलं पुस्तक बाजूला सारून त्याला बाहेर पडावं लागलं होतं. तो भरभर चालूं लागला. चांगलं दीड मैल त्याला तंगड्या तोडत जायचं होतं——

'संध्याकाळची वेळ म्हणजे क्षिप्रेच्या काठीं भावे बरोबर किंवा कवि शिरीष बरोबर हिंडायची वेळ....त्याचं भावविवश काव्य ऐकायची वेळ ! आतां म्हाताऱ्याच्या अंधाऱ्या कोठडींत त्या काव्याचा खून करावा लागेल. यावेळीं त्याच्या खोलीसमोरचं दालन अंधारलेलंच असणार. पण तिथं विजेचं बटण दाबू देणार नाहीं तो ! विजेचं बिल जास्त येईल ना ! कान लपेटून अंधारांत बसलेलं ते पांढरं भूत ! धनावरचा तो निर्दय पुरातन तक्षक ! मला पहातांच तो दातकिच्चा खाऊन धांवेल.....डसायला फूत्कार सोडील आणि मग त्याचं सारं अंग एकदम पंख कापलेल्या पक्षासारखं फडफडेल....दिवसभराचा सांचलेला सारा राग तो मजवर काढील. मी खोलीत शिरतांच तो घड्याळाकडे पाहील...अन रागारागानं लहानशी डायरी काढून माझ्या येण्याची वेळ तो लिहून ठेवील ! मग धापा टाकीत तोंड उघडून तो उभा राहील...नळींतून एकदम गळणाऱ्या पाण्याप्रमाणं खुळखुळ बुळबुळ करुन शब्द त्याच्या तोंडांतून सांडतील आणि मीं नेहमीप्रमाणं सुन्नपणें त्याच्याकडे पहात राहीन....तो काय म्हणतो आहे हें मला कांहीहि समजणार नाहीं.'

आणि हें सारं महिन्याकाठीं पंधरा रुपड्यासाठी.... हा जन्म टाचा घाशीत मरण्यासाठीच का मिळाला आहे ? मी साधा माणूस नाहीं. माझी स्वप्नं वेगळीं. माझ्या आकांक्षा वेगळ्या. चार चौघां-सारखं जिणं मीं जगणार नाहीं. मला व्यवहारी जीवनाची रुक्ष वाट नको. ती घट्ट पडून इतकी खोल व्हायचीं कीं तींतच पुरला जायचा. माझा हा बेचैन जीव....माझ्या जीवनांत अद्‌भुत दिव्यपणा हवा. जीवनाचा प्रत्येक क्षण जगण्यासाठी झडप घालावीशी वाटेल अशी तळमळ माझ्या हृदयांत सतत पेटली असावी. चार चौघांच्या व्यव-हारी संकुचित जगाशी मला काय करायचं आहे ? मध्यरात्रीं विराट रत्नखचित आकाशाच्या घुमटाखालीं एकटा उभे रहावें तेव्हां शीतल श्वासानें—सूक्ष्म मंद सुगंधानं माझा ऊर भरुन येतो—तेंव्हां काय होतं ? क्षिप्रेच्या गर्द झाडी मागून एकाहून एक प्रचंड घनश्याम मेघ धुंदकारून उसळून येतात ! हां हां म्हणतां प्रत्येक श्वेत मंदिर शिखरांमागे नीलकान्त मेघांचा कज्जल कल्लोळ हवरतो ! सोसाट वारें सुटून क्षिप्रेच्या उन्मत्त लाटा महावेगानें उसळत डुचमळत जातात व किनारा खणूं लागतात ! आणि विजेच्या प्रचंड कडकडाटानं महा-काळ मंदिराचा घुमट दुभंग होउं पहातो ! त्यावेळीं वरसणाऱ्या कोऱ्यावधी जलधारांच्या खालीं एकटं वडासारखं....विजेच्या लवल-वीत उजळत, लपत नि निथळत उभं राहावेंसं वाटतं—तें काय आहे ? पुनवेच्या दूध सागांरातील अपरंपार सीमाहीन कल्लोळांचीं अंतर्लय हृदयांत घुमूं लागते व तिच्या तालावर हृदयाची वीणा आपोआप झंकारूं लागते. तेंव्हां कुठेतरी अंतर्यामांत अतिशय खोल मूक कल्लोळ उसळतो, मन कासावीस करतो ! बोल ओठीं आलेसे वाटतात, पण येत नाहीत ती व्याकुळ विव्हलता—तें सारें

काय आहे ? अन् ते कांहींहि असलं तरी मी कुणालाहि देणार नाहीं. तेच माझं जग. त्यांतील प्रत्येक क्षणाला मी बोलका करीन आकार देईन नाहीं तर मरुन जाईन ! तेच माझं काम; चार चौघाचं काम ते माझं काम नव्हे ! चार चौघांची रीत, ती माझी रीत नव्हें!! आणि तरी मी महिन्याकाठी दहा रुपड्यासाठी धांवत जाते आहे. त्या अंधारांत तो खाष्ट, पिंवळ्या जर्द तोंडाचा म्हातारा !! त्याच्याच खोलींत कुणी त्याचा गळा जरी दाबला तरी कळायचं नाहीं !!

मधुकरचे हात गळ्याशीं पोचले देखील !! ते दोन पैलवानी हात म्हाताऱ्याच्या गळ्यावर घट्ट बसले. दारुण भयानं म्हातीऱ्याचे डोळे विस्फारले गेले. पांढरे होऊं लागले ! सुस्कारे सोडीत त्याचे हात ‘ नयो नयो ’ म्हणत वाकडे तिकडे होऊं लागले ! हाताची पकड घट्ट घट्ट बसत चालली तोंडातील शब्द फेसासारखे फसफसूं लागले ! अधिक घट्ट दाब....अधिक घट्ट !! तडफड कमी होऊं लागली ! डोळे बाहेर आले. ‘ नयो नयो ’ म्हणणारा, शिरा तट्ट फुगलेला जर्जर हात, म्हतारा दूर कोपऱ्यांत धाडकन फेंकला जाताच तसाच पुळ्यांत पडला !! जणूं म्हणत होता–‘ नको ! मला जगूं दे...’

धाडकन आवाजानं टेबलं, कित्येक चेहरे....धडधडूं गडबडूं लागले. अन् मधुकर अतिशय हादरला....तोंडानं पुटपुटूं लागला—‘छेः छेः छेः’

आणि त्यानं अनाहूतपणें स्वताशीच चोरून स्वतःचे हात न्याहाळले ! मग विचारांची कोळीष्टिकं झटकावी म्हणून त्यानं जोरानें मान हलविली.

‘भावेशी म्हातारा मात्र खुष राहतो. कां कुणास माहित ? भावेचं हृदय का दगडाचं आहे ? कीं त्यानं गीतेंत सांगितल्याप्रमाणं स्वतःचं मन अलिप्त नि शांत ठेवलं आहे.परिस्थितीचा कसलाच कसा आघात

त्याचेवर होत नाहीं ? आश्चर्य आहे !! ड्राईंग मास्तराची नोकरी करून तो दिवस नि रात्र मूर्ती घडवीत असतो ! काय चाललं असतं त्याच्या हृदयांत ? कां करतो तो हें सारं ?.... त्याच्या मूर्ति कोण पहाणार आहे ? अन् त्याच्या मूर्तींत प्राण तरी असतो का ? भावेला मेहनत आहे, पण vision नाहीं....व्हिजन नाहीं....'

मधुकरला एक प्रकारचं सूक्ष्म समाधान वाटलं. तो भावेनं तयार केलेल्या मूर्ति डोळ्यासमोर आणूं लागला. पण एकहि स्पष्ट दिसेना. त्याला जाणवलं—आपण भावेच्या मूर्ती पूर्ण झालेल्या कधीहि पाहिल्या नाहींत !! त्या दाखव म्हणून भावेला आपण एकदाही म्हटलेलं नाहीं. आणि आज इतकी वर्षं स्नेह असूनहि भावेनं आपणाला त्या दाखवून मत विचारलेलं नाहीं. अन् हें जाणवताच भावेचा मधुकरला मनस्वी संताप येऊं लागला. ' अलिप्तपणानं तो हें सारं करीत असतो ! हः मीच त्याला सारं अंतरंग उघडं करून दाखवितो...पण त्या थंड माणसाला त्याचं काय ? कीं भावे सारं दुःख पिऊन गेला आहे अन् तरीहि त्याचं मन घटांतील ज्योतीसारखं निष्कंप आहे ? अन् मग त्याची सहानुभूति ? '

या विचारानं मधूचं मन दबल्यासारखं झालं.स्वतःच्या उणेपणाच्या जाणीवेनं व्यथित झालं ! तो वरमला. त्या म्हाताऱ्याला भावेबाबत वाटणाऱ्या जिव्हाळ्याचे कारण भावेच्या अंतःकरणाचा पोक्तपणा हें आहे—हा विचार मनांत येताच मधुकरची थंड पडूं पाहणारी गती किंचित् हुरूपानं जलद झाली. तरी अज्ञान अनामिक हुरहूर त्याच्या मनाला चंचल करूं लागली. बाबासाहेबांचं घर दोन फर्लांगावर आलं तसं तसं त्याचं मन फिरून बेचैन होऊं लागलं. तास दीड तास तिथं बसायची कल्पना त्याच्या मनाला डाचूं लागली ! वळणाशी

येतांच तो डावीकडे वळणार इतक्यांत उजव्या हाताच्या त्या टोकाला मंद गतीनं येणारी भावेची मूर्ति मधूला दिसली ! तो थबकला, चरमला. कारण बाबासाहेबांकडे मागे भावेबरोबर तो गेला होता. त्यानंतर भावेची नि मधूची भेट नव्हती. भावेनं आपणाला बाबासाहेबांकडे नेलं म्हणून रागावून न बोलतांच आपण निघून गेलो !! त्यांच्या कडेच आपण जातांना भावेला दिसावें हे मधुकरला बरं वाटलं नाही!!

आतां म्हातारा भावेसमोर मला त्या दालनांत एका सतरंजीवर बसवील नि स्वतः शेजारी बसून मजकूर सांगायला सुरवात करील. शेजारूनच म्हाताऱ्याची नात जा ये करीत असते ! ती कॉलेजांत शिकते !! हा अपमान !! अन् म्हातारा नसला नि तिष्ठत बसून रहावं लागलं तर ?

साऱ्या घराला दिवसभर फाडफाड बोलत असतो म्हातारा ! जुना जहागिरदार आहे ना ? नातवानं त्याच्या मनाविरुद्ध परभू मुलीशी लग्न केलं म्हणून त्याला कपर्दिकहि न देता घराबाहेर काढलं त्यानं ! अन् त्यानं आता कोर्टात स्वतःचा हिस्सा मागितला आहे म्हणून जीव तोडून म्हातारा लढतोय केस. वकीलांचे खिसे भरतोय....कुणास माहीत कसले कसले अर्ज नि दरखास्ती दिवसाआड शंभर पाठवीत असतो ! परवां ते कुठलेसे जहागिरदार आले तर म्हातारा लुटूलुटू करीत सारखा घरभरांत भणभणत होता. अन् मला तेथून उठून जायला सांगितलं त्यानं. त्याच्या नातीनं अर्थात हे पाहिलं ! आता हा भावे...

मधूला अपमानाचं अतिशय दुःख होऊं लागलं. आज मात्र तो पाठ फिरवून जाऊं शकत नव्हता !

भावे अगदी जवळ येऊन ठेपला. त्याला ओळखून किंचित हंसला. भावेच्या साध्या स्मिताची भूमिका कळूनहि मधूचं हृदय कापल्या-

सारखं झालं....त्याचा चेहरा खाडकन् उतरला.

'आज या वेळीं ?'—मधूनं विचारलं.

'सकाळीं जमलं नाही म्हणून दुपारी येईन म्हणून कळवलं होतं.'

'कां ? बाबासाहेबांकडे तुलाहि यावं लागतं की काय ?'

'मी नीराला ड्राइंग शिकवितो ना ?'

मधुकर एक अक्षर बोलला नाहीं. एक शब्द न बोलता दोघं बंगल्यांत शिरले. भावेकडे न पाहतां मधू सरळ आंतल्या दालनाकडे गेला.

दालनांत खरोखरीच वीज लागलेली नव्हती. अजून उजेड होता. पण तो अंधुक नि उदासवाणा वाटत होता. दालनाच्या त्या टोकाच्या खोलींतहि गार अंधार पसरला होता. म्हातारा शाल पांघरुन नि सोनेरी चष्मा नाकावर अडकवून काहीतरी लिहीत असल्यासारखा दिसत होता. मधूची चाहूल लागतांच म्हातारा दचकला नि एकदम ताठ उभा झाला....भुजंगासारखा....अंधाऱ्या कोपऱ्यांत टराहून फूत्कार सोडणाऱ्या भुजंगाप्रमाणे त्याचे सुस्कारे जोरजोरानं सुटूं लागले! आणि एवढा मधुकर....तो पण थिजला....

'कशाला आलात् ? तुम्हाला नोकरी नको आहे.'

'छेः छेः आज जरा उशीर झाला मला....काम लागलं....'

'राऊ द्या..राऊ द्या. नका सांगू मआ ते. नको आहे तुम्हाला नोकरी'

. मधुकरचा संताप अनावर झाला. त्याचे डोळे तांबडेलाल झाले. म्हाताऱ्याच्या उद्धट वागणुकीला खरमरीत जबाब द्यावा असं त्याला वाटलं. अत्यंत प्रयासानं राग गिळून तो खालच्या आवाजांत म्हणाला—

'नाही नाही बाबासाहेब ! उद्यापासून येईन वेळेवर मी !'

'विसरा सारं....नोकरी नकोय तुम्हाला...आजपासून बंद

समजा....' म्हातारा धोतराच्या खुंच्या पिळीत नि डोकं जोरजोरानं हालवीत म्हणाला. मधूचं अवसान एकाएकी गळालं. चेहरा खर्रकन उतरला. तो खालच्या आवाजांत म्हणाला—

' खरंच नोकरी हवीय मला बाबासाहेब !! '

म्हातारा हें ऐकताच तरातरा पुढे आला. संतापानं त्याचें निळें डोळे लडबडूं लागले. तो मधुकरच्या अगदी समोर जाऊन उभा झाला. शक्य तितकी कंबर ताठ करीत तो ओरडूं लागला.

' कुठे हवी नोकरी ?....मला दिसत नाही. '

तो मधुकरच्या उद्धट डोळ्यांकडे बोट दाखवूं लागला. त्याच्या ताठ मानेकडे तिरस्कारानें बघूं लागला. त्याच्या विशाल नि पुष्ट छातीकडे घृणेनं पाहूं लागला. एकाएकी मधुकरच्या डोळ्यासमोर बोटं नाचवीत म्हणूं लागला—

' असे नसतात नोकर ऽ....जा....जा... तुम्ही....शुर्मी जा.... तुमच्यासाठीं नाही नोकरी जा, जा, तुम्ही...'

त्या अंधाऱ्या कोपऱ्यांत म्हातारा भुजंगासारखा फुसकारत होता. त्याला नोकर कुठेच दिसत नव्हता दिसला नव्हता. नि हाच अपमान त्याच्या तळपायाची आग मस्तकाला भिडवीत होता. समोर नोकराची जात नव्हती ! म्हणून शत्रू होता.

मधुकरचा धीर खचून गेला त्याला म्हाताऱ्याच्या दृष्टीतील संतापाचा अर्थ खोलवर जाणवला !! त्याची मनस्थिति विचित्र होऊं लागली. एका क्षणांत त्याच्या डोळ्यासमोर त्याच्या परिस्थितीचं पंधरा रुपये महिन्याच्या अभावानें निर्माण होणाऱ्या दुःखाचं चित्र तरळून गेलं ! तो वाकूं लागला !! लीनतेचे शब्द शोधूं लागला. चेहऱ्यावर शक्य तितका नम्रपणाचा भाव आणायचा प्रयत्न करूं

लागला. तो जरा-पुढे झाला—

' फक्त आजच्या दिवस उशीर झाला आहे. ' आणि तरी आपो-आप वाक्याचा शेवटचा आर्धांश संतापाच्या आगींत सळईप्रमाणे लाल तापून निघाल्यासारखा झाला !

म्हाताऱ्यानें डायरी बंद केली. शेजारी असलेलं दिव्याचं बटण दाबलं नि मधुकरच्या धृष्टपुष्ट व्यक्तित्वाला झळकतांना पहातांच म्हाताऱ्याचा पिंवळा चेहरा हिरवाकंच झाला !–' जा....जा ऽ ऽ...' तो तापून ओरडला.

मधुकर वणव्यातल्या पहाडासारखा भडकला ! तिरस्कारानं विकृत झालेल्या त्या बोळक्या तोंडावरील तो तिरस्कार दोन बोटांच्या चिमटींत धरुन त्याची तडफड पहावीशी त्याला वाटली. मुंगूस आणि सर्प जसे एकमेकांचे हाडवैरी ! एकमेकांचें अस्तित्व जाणवताच द्वेषानें भडकून पवित्र्यांत उभे राहतात तीच अत्यंत खोल द्वेषाची भावना त्याच्या अंगात भिनली. म्हातारा तरातरा निघून जाऊं लागला. आणि त्याला मधूनं एकदम अडवलं—

' माझे पैसे....वीस दिवसाचे !! ' त्याचा आवाज घोगरा झाला होता.

म्हातारा कासवासारखा एकदम आकसला. संतापानं त्याचा चेहरा पार बदलून गेला. त्यानं दूरवर दालनांत पाहिलं. तेथवर कोणीच नव्हतं. तो पुढे गेला; वळला नि शक्य तितकी पाठ ताठ करून त्याच्याकडे कमालीच्या तिरस्कारानं पहात ह्मणाला—

' पैसे....पैसे ? लाज नाहीं वाटय तुह्माला क्रा ? जा....जा....!!'

मधुकर ह्मातान्याला अडवून वणव्यासारखा जळत उभा झाला. पुढे पुढे सरकूं लागला. तो भयंकर आवाजांत ह्मणाला—

' बाबासाहेब ! माझे पैसे टाका....! ' आणि त्याचे प्रचंड दंड, त्याची पोलादीं छाती; त्याच्या एकावर एक चढलेल्या भिंवयां. तें पाहून म्हातारा एकदम ओरडूं लागला—

' अरे कोण आये रे तिकडे ! '

' मधुकर ऽऽ '

मधुकरने दचकून मागं पाहिलं. दाराच्या कोपऱ्यांत छायेसारखा रोडका भावे उभा! तो पुढे झाला. मधुकरला दाराबाहेर ढकलूं लागला. भावे ओढत असतां मधुकर म्हाताऱ्याकडे जळजळीत दृष्टीनं पहात ओरडला—

' भावे ! हा थेरडा मला पैसे देत नाहीं....मी वसूल करीन.... ' म्हातारा नाकांतून फूत्कार सोडीत ओरडूं लागला—

' हरामखोय....शिंचा....पैसे मागतोय....'

त्याच्या मागोमाग म्हातारा तरातरा चालत खोकूं लागला. शेवटीं त्याला जोराची ढांस आली.

रस्त्यावर अंधारून आलं होतं. मधुकरच्या डोळ्यांतून ऊन ऊन अश्रू न कळत ओघळूं लागले. ते भावेला दिसले नाहींत पण उमजले होते. कारण मधुकरचा हात त्यानं हातांत घट्ट धरून ठेवला होता.

## : २२ :

' पण....'

आणि वामनरावांचा चेहरा एकदम पडला. स्वयंपाक घराच्या कोपऱ्यांत रमाबाई उभ्या होत्या. समोर पाटावर वामनराव बसलेले. रमाबाई शून्यदृष्टीनें पहात होत्या. त्या उभ्या असल्यामुळें लुगडयाला

लागलेलं ठिगळ गुडघ्यावर आलेलं दिसत होतं ओठ आवळलेले नि डोळे लाल झाले होते.

वामनराव खालीं मान घालून जमीनीवर रेघोट्या ओढीत होते. ते कर्कश आवाजांत म्हणाले—

' पण मला ह्यांनी स्वतः सांगायला काय झालं होतं ? तुह्मी सांगा रमा वहिनीं मला तुम्ही लोक....'?

' भावजी !' रमाबाई व्यथित स्वरांत बोलल्या.

रमाबाईंचा व्यथित स्वर ऐकून कुठेतरी खोलवर खुपल्यासारखं झालं. ह्मणून विनाकारण उसळून ते ह्मणाले—

' मला समजत नाही असं समजता कां तुह्मी ? आज उभं आयुष्य गेलं...उभं आयुष्य....पण लहानपणापासूनच माझ्या मनाला जी गांठ घातली आहे बापूनानांनीं....या नारायणानं....सांगा मला....इतके उपद्व्याप केले पण मला विचारलं का....?'

' पण भावजी '

' जोडा कुठं चावतो तो ज्याचा त्याला कळतो वहिनी ! त्याला मी काय करूं ? तोडता तोडवत नाही असे हे संबंध....तो कोण कुठला. देशपांडेला बापूंनी लावला तेव्हां मीच...'

छातीवर हात ठेऊन वामनराव सांगू लागले—

' तेव्हां मी सांगितलं होतं की हा मनुष्य लफंगा दिसतो ह्मणून. आठवतं तुह्माला ? तेव्हां बापू मला क्षुद्र समजले. मित्राचा अपमान ....घराची राखरांगोळी नि लफंग्याचं घर भरणं याला तुह्मी ह्मणा संतपणा हवं तर ! पण मी ह्मणणार नाहीं, कधींहि ह्मणणार नाहीं.... ह्मटलं नाहीं.'

' तुह्माला कमी लेखायचं नव्हतं हो त्यांना....' रमाबाई काकुळ-

तीनें ह्मणाल्या.

‘ मलाही मन आहे. सारं आयुष्य गेलं माधुकरी मागत. मला नारायणसारखा श्रीमंत सासरा नव्हता मिळाला ! शिळ्या तुकड्यांवर पोसलेला! मलाहि जगायचं होतं. मरायचं नव्हतं. आंगठी करायला सोन्यांत थोडं तांबं मिसळावं लागतं तरच तें टणक बनून टिकतं. आणि जगायचं असेल तर कमअस्सल धातू मनांतहि मिसळावे लागतात. नाहींतर परिस्थितीचा केव्हां वणवा पेटेल व केव्हां वितळून जाऊं याचा नेम नसतो. हा कडू धडा मला अनुभवांतून मिळाला ! पण बापूंना त्याचं काय ?’

रमाबाईच्या गालावर अश्रू ओघळला. त्या अगदी हळुवार आवाजांत ह्मणाल्या—

‘ वामन ! मी तुला ओळखत का नाही ?’

वामनराव दचकले ! गडगडले ! त्यांनी रमाबाईच्या डोळ्यांकडे टक लावून पाहिलें ! त्यांच्या तोंडावर अनेक भाव उमटले. रमाबाईच्या तोंडाकडे त्यांनी पाहिलं. तोच निर्मळ मृदुभाव होता ! ते चकित झाले, दबले. बोटें उगीच चाळवीत ह्मणूं लागले—

‘ पण....पण....मी....!’

‘ ते आजारी आहेत भावजी....त्यांच्या मनाला मोठी जखम झालीय. माझी पुण्याई थोर मी त्यांच्या पदरी पडलें...’

‘ रमाबाईचा आवाज एकदम कणखर झाला. आणि त्यांची हो वाक्यं वामनरावांना मर्मभेदक वाटली. ते चवताळून म्हणाले—

‘ मी पुण्यात्मा नाहीं....मला पिचून टाकणाऱ्या दारिद्र्याशीं मी दोन हात केले....ह्मणूनच माझ्या पोरांच्या पोटांत आज चार घास जाताहेत....आणि आणि तुमच्या नि बापूंच्या दृष्टीनं ह्मणूनच मी

कमी लेखण्यासारखा आहे....मला सगळं समजतं वहिनी ! नाहींतर बापूनाना माझ्याकडे धावत आले असते....धांवत...तुमच्या या 'मी' पणाची कवडीची किंमत आहे जगांत....कवडीची.... नीट ऐका नीट'....वामनराव क्रुद्ध झाले. चाळीस वर्षांत आज ते प्रथम दातओठ खात बोलत होते. त्यांच्या फेंदारलेल्या नाकपुड्या थरथरत होत्या....

'नीट ऐका नीट! बापूंचा हा संतपणा फक्त तुमच्या बळावर होता'

'काय बोलता हे....काय बोलता हे. पुरे झालं. माझंच चुकलं. मी तुह्माला बोलावणं पाठवलं ! ते सांगत होते....मी ऐकलं नाहीं अन् तुह्माला बोलावणं पाठवलं....परमेश्वराला स्मरून सांगते....हा या अन्नावर हात ठेवला आहे ....तुह्मी त्यांना बोलून भयंकर अपमान केलाय माझा !! नको होतं असं बोलायला तुह्मी ! नको होतं.' रमाबाईंनी आधारासाठी खिडकी घट्ट धरून ठेवली नि मग त्या एकदम मागें पऱ्यावर निघून गेल्या. सुमीनं त्यांना आवरलं ह्मणून ठीक !!

'बापू नको बोलावूं ह्मणत होते' वामनरावांच्या डोक्यावर घण आदळला. ते पांढरे फटफटीत पडले. त्यांचा भरींव चेहरा वृद्ध दिसूं लागला. अपराधी भावनेनं खजील नि खिन्न दिसूं लागला. ते पुटपुटले 'रमे....रमे....तूं....मी....बापू....लहानपणापासून तूं कधीच कांही मागितलं नव्हतं नि आज....' वामनरावांच्या छातींतून एक दीर्घ उसासा बाहेर पडला. ते हलुहळूं उठले. 'अस्सं....' ते पुटपुटले.... घुटमळले....छताकडे डोळे लावून तें वोगऱ्या आवाजांत ह्मणाले—

'येतो वहिनी. जमलं तर मजवरचा राग सोडा ! उद्या पाठवा मधूला घरी !!'

वामनराव पुटपुटत होता— ' मला तुमचा अपमान नव्हता करायचा पण....'

अन् जिन्याशीं येतांच ते एकदम दचकले. त्यांना बापू दिसले. बापू समोर बिछान्यावर झोपलेले होते. त्यांचं तोंड उघडं होतं अन् चेहरा निर्जीव पिवळा पडलेला दिसत होता ! तरी त्यावर भोळ्या भावांची आभा पसरलेली होती. वामनरावांचा भार काठीवर अधिक पडूं लागला ! जमीनींत ती खोलवर रुतूं लागली !! ' नारायण.... नारायण, त्यांना ह्मणावेसे वाटूं लागले. पण शब्द उमटेना

वामनराव जडपणें जिना उतरूं लागले. तो ओझ्याखालीं करकर वाजूं लागला.

× × ×

' आई '

सुमी मुसमुसूं लागली. चपापून अश्रूंनी अंधुक झालेल्या दृष्टीनं त्यांनी सुमीकडे पाहिलं. डोळे पुसून सुमीचं तोंड वर करीत त्या उदगारल्या—

' वेडी कुठली ! असं काय करतेस ? ऊठ, ऊठ बधूं. चल घरांत'

सुमी अधिकच मुसमुसूं लागली. रमाबाईंना भडभडून आलं. त्यांनी तिला जवळ ओढली नि हृदयाशीं धरली. प्रेमाचा उमाळा अनावर झाला. 'माझी सुमी ती ! सकाळपासून रात्र पडे पावतर कष्ट करते ! हूं का चूं न करतां; आदळआपट न करतां; भावंडासाठी, आईवडिलांसाठी मुकाट्यानं झटते ! अगदी मंद सुवासासारखी वावरत असते नकळत ! रमाबाईंनी सुमीचं तोंड हनुवटी धरून वर केलं. तिचे काळेभोर डोळे डबडबलेले होते ! तिच्या गोऱ्यापान तोंडावर

तरुण रक्त फांकलं होतं ! सुमी लग्नाची झाली ही कल्पना येतांच रमाबाईंच्या पोटांत तुटायला लागलं ! 'नक्षत्रासारखी पोर. पण कष्टा-शिवाय काय मिळालं हिला ? हिच्या मनांत काय चाललं असेल बरं ? माझी बेटी !! माझी बाळी ! काय दुःख झालंय हिला आज ? कोण बोललं ? '

सुमीच्या डोळ्यांतून अश्रू वाहत होते !

रमाबाईंचे दोन्ही बाजूचे केस थोड्यांच दिवसांत एकदम रुपेरी झालें होतें. डोळ्यांच्या सभोंवार काळीकाळीं वलयें पडलीं होतीं !! 'उदास! कधी हट्ट करणार नाहीं ही! कधीं रडणार नाहीं. स्वतःचं खरं करणार नाहीं....नि आज काय झालं हिला ? कां रडते बाळ माझी? हसायखेळायचे दिवस....उगी....उगी..सुमेबाई शपथ आहे तुला.. कोणी बोललं का तुला ? मधुकर ? नको ग असा अंत पाहूं माझा..'

रमाबाई अतिशय शिणल्या होत्या.

सुमीनं चटकन डोळे पुसले. आईच्या गळ्यांत विळखा घालून ह्मणाली—' चल आई घरांत ! बघ सायंकाळची वेळ झालीय्.... नि बापूंना चहा हवा असेल....'

रमाबाईला अधिकच दाटून आलं. सुमीच्या आधारानं उभ्या राहत त्या ह्मणाल्या— ' अन् रडलीस कशाला एवढी ? पोटांतलं लपवून का ठेवतेस मजपासून ? '

' तूं चल आई आंत ! नको शिणू उगीच....माझं भलं विचार-लंस ! मला रडायला काय लागतं ? वामनकाका तोडून बोलून गेले नि वाईट वाटलं....झालं....'

' किती लबाड आहेस ग ! पोटांतला थांग पत्ता नाहीं लागूं द्यायचीस....'

‘ तूं उगीच विचार करतेस....’

‘ तुला लागलं का ? खुपलं का ? कुणी उणंदुणं बोललं का ? मला चैन नाहीं पडायचं हो सुमे ! माझी शपथ आहे तुला ! ’ रमाबाईंना भडभडून आलं होतं. त्यांचा जीव या मुलीसाठीं कासावीस होत होता.

त्या म्हणाल्या—‘ अग ऽ नउ महिने पोटांत वागवलं ! तें उगीच का ग ? सांग तुला काय हवं ! कशाचं वाईट वाटलं एवढं ! उगीच नाहीं रडायचीस एकाएकी....’

सुमीचे डोळे उदास झाले. तिची दृष्टि पायावर खिळली—‘खरंच ! खूप वाईट वाटलं ग मला तुझी दशा पाहून ! मला तूं हवी-यस....कसं होईल....तूं काळजी....’

रमाबाई या वृत्तीनं भिऊन गेल्या. थरथरल्या ओठांनीं म्हणाल्या—‘ अग ! किती खपशील साऱ्यांसाठी ? हें बरं नाहीं सुमे ! अग हें बरं नाहीं.... आईबाप का जन्माचे सोबती असतात ? नको मन जडवून ठेवूं इथं.... इतका भाबडेपणा कसा चालेल ग तुझा ? मला फार जड जातं.....फार जड जातो ग तुझा हा भाबडेपणा....कसं होईल तुझं माझ्यामागं’ रमाबाईंना जोराचा हुंदका आला.

आतां मात्र खरेंच रागावली सुमी, आईला बळेंच ओढीत ती म्हणाली—‘ चल ! चल पाहूं आंत तूं !! अग बघ तर खरी.... निमा आलीय्.... ’

× × ×

‘ ये बाळ निमा ! अग ऽ चहा ठेव सुमे हिच्यासाठी....’ रमाबाई हुरूपानें म्हणाल्या.

‘ नको ! चहा नको....’

‘अहा ! अगदी परक्यासारखं नको कांहीं वागायला’ सुमी हळूंच

म्हणाली.

आणि कुणास माहीत कां भावेच्या बहिणीचा चेहरा तांबूस झाला.

‘ कशी काय तुझ्या आईची तब्येत ? बऱ्याच दिवसांत डोकावल्या नाहींत इकड ? ’

‘ असंच आपलं...घरचं काम धाम....उसंत नसते तिला नि दत्तूदादा तर सारखा आजारी असतो !! ’ भावेची बहीण–निमा म्हणाली.

‘ तरीच म्हटलं भावे फिरकले नाहींत आमच्याकडे....आमच्या मधूची नि त्याची फार गट्टी आहे हो !....’

निमाची नजर बैठकीच्या खोलीकडे घोटाळत होती. ती भानावर येऊन म्हणाली—‘ होय काकू....पण मधू...मधुकरराव....’असं म्हणतांना ती एकदम अडखळली, थबकली, लाजलाजून चूर झाली. तिची नजर पायांवर खिळून बसली ! खालच्या मानेनंच ती म्हणाली–

‘ तेहि नाही आलेत दोन तीन दिवस झालेत. दादा म्हणत होता....’

रमाबाईंना प्रेमाचा उमाळा येऊं पहात होता. खालीं मान घालून बसलेल्या निमाकडे त्या अपार वात्सल्यानें नि कौतुकानें पाहत होत्या.

निमा दोन्ही गुडघे पोटाशी दुमडून पाटावर बसली होती. जमिनीवर रेघोट्या ओढीत होती. तिचा चेहरा अजून थरथरत होता. तों आपलं आरक्त तोंड वर करायचा धीर तिला होत नव्हता. रमाबाईंची स्नेहाळ दीठ तिला स्नेहानं गोंजारीत होती.

‘ अग ! मधू दोन चार दिवसापासून घरीं देखील कमीच असतो. मोठा समजूतदार नि मायाळू आहे हो आमचा मधू....थोडा गरम डोक्याचा आहे. पण फार फार मऊ मनाचा....’ रमाबाई आर्जवानें बोलल्या.

सुमी ही सारी गंमत पाहत होती. चुलीतील लाकडं चाळवताच जाळ झाला, त्याच्या लाल प्रकाशांत सुमीचे डोळे खट्याळपणे लक-लकूं लागले. निमानें रमाबाईकडे नि सुमीकडे आळीपाळीनें निरखून पाहिलें. ती गडबडून गेली. फार लाजली नि ते लपवायसाठी आंव आणून म्हणाली—' कधी आलं म्हणजे चहा करायलाच हवा का ग सुमे ? '

' अग वा ऽ ग ! मधूच्या मित्रांसाठी आम्ही चहा करावा आणि माझ्या....माझ्या....' असं म्हणून सुमी मनमोकळेपणानं हंसली. अन् निमालाहि हंसू अनावर झालं.

तिघी अगदी मनःपूर्वक हंसल्या !!

मग त्या दोघी मैत्रिणी मागच्या पऱ्यावर जाऊन उभ्या झाल्या. रमाबाई त्या पाठमोऱ्या आकृतींकडे टक लावून पाहत होत्या. त्या मनाशीच आनंदानें पुटपुटल्या—

'किंचित् अशक्त आहे ! पण भारी प्रेमळ नि शहाणी...!'

' काय बघत आहेस ? मनांतले मांडे खात बसलीस का ?'

रमाबाईनी दचकून मागे पाहिलें. क्षणभरासाठीं त्यांना सर्वगोष्टाचा विसर पडला होता. बापूंचा अशक्त नि खिन्न चेहरा स्मितानं किंचित् उजळला होता. डोळे मात्र थेट पूर्वीसारखे प्रकाशानं लुकलुकत होते.

रमाबाईचं हृदय भरून आलं. कंठ दाटला. बापूंनी मनांतलं अचूक हेरलेलं पाहून त्या भरलेल्या डोळ्यांतून हंसल्या....

अन् पिंपळ झाडावर ओळीनं झेपावत परतणाऱ्या हिरव्यागार गंगा-रामांकडे पाहून त्या उभयतां मैत्रिणी हंसत उभ्या होत्या !

× × ×

आईबापूंना हंसताना पाहून बिशूला खूपखूप हलकं वाटत होतं.

सांज टळली. दिवेलागणी झाली. रात्रहि होऊन गेली. देवापुढे निरांजन लागलं. बापूंच्या मनांत खळबळ सुरुं होती तरी ते डोळे मिटून ध्यानस्थ बसले होते. सायंकाळी ते म्हणाले होते—

'फक्त चार दिवस ! चार दिवसांत पैसे भरले पाहिजेत....नाहींतर ....नाहींतर किडुक मिडुक सारं विकून टाकावं लागेल....'

बिशूचं मन फिरुन जड झालं होतं...

आठ वाजले....नऊ वाजले....मधुकर आला नाहीं.

फिरून काळजी ! बाबासाहेबांकडे कामाला गेला असेल ! तरी परतायला हवा होता ! साऱ्यांची मनं काळवंडलीं; रमाबाईंचा चेहरा काळवंडला ! अन् बिशूच्या मनांत विखार सांचू लागला. ' मधूदादाला स्वतःशिवाय कांही सुचत नाहीं. बापूंच्या–आइच्या दुःखाला हाच कारण झाला ? देवा मला लौकर मोठा होऊं दे ? '

जिन्यावर पाऊलें वाजलीं. मधू वर आला. त्याची दाढी वाढलेली. आला तसा तो वर माळ्यावर जाऊं लागला—

' कुठं गेला होतास मधू ?....अरे थांबशील जरा....'

मधुकर थांबला नि म्हणाला—' आखाड्यांत '

बिशूच्या मनाला डाग दिला गेला. म्हणे अखाड्यांत !!

' किती वाट पहायची रे तुझी ? पोटींशी अन्न घेऊन बसतें; तुझ्याशिवाय जेवत नाहीं, माहीत नाहीं का तुला ? बाबासाहेबांकडून येऊन आधी जेवत जा ! मग जात जा आणखी कुठे ! ' रमाबाई म्हणाल्या.

मधुकरचा चेहरा अधिकच गोठला. तो आईकडे तोंड वळवून निक्षून म्हणाला—' पैशाची आशा नको ठेवूंस आई !! बाबासाहेबांची नोकरी परवांच संपली ! '

चिमणीच्या मिणमिणत्या उजेडांत साऱ्यांचे चेहर भकास दिसत

होते. सगळीकडे स्तब्धता पसरली. घोगऱ्या आवाजांत रमाबाई ह्मणाल्या—' कां रे, कां झालं असं ? '

मधूला बोलावसं वाटत नव्हतं. त्या प्रश्नानं त्याला अक्षरशः यातना होऊं लागल्या. मधूला स्तब्ध पाहून विशूला त्याचा अतिशय तिरस्कार वाटूं लागला—'किती छळतोय हा बापू-आईना !...स्वार्थी माणूस !!'

' अरे बोलत कां नाहीस बाबा ? निदान वीस दिवसाचे पैसे तरी?....'

' एक पै त्यानं दिली नाही आई ! आतां जास्त विचारूं नकोस..' मधुकर खोल आवाजांत म्हणाला.

' नाहीं दिसायची....आपली दशा नाहींच दिसायची तुला....' रमाबाई रागानें म्हणाल्या.

बापू मध्येंच कण्हत्या आवाजांत म्हणाले—' अग ऽ राहूं दे पाहूं तूं....। मधू जा, पाय धुवून घे नि जेवून ये....'

मधुकर वर निघून गेला. पाठीमागे विषारी वातावरण धूमसूं लागलें.

स्वयंपाक घरांत चिमणीचा लाल प्रकाश पसरला. त्याचा भयानक उजेड हलूं लागला. रमाबाईनी पाट मांडला. कल्हई उडालेलं ताट मांडलं. पोळी नि वरणाची वाटी समोर ठेवली. चिमूटभर मीठ वाढलं. भिंतीला टेकून त्या स्वस्थ बसल्या. मधूची दाढी वाढलेली होती. त्याच्या तोंडांत घास फिरत होता.

' आई ! कांदा वाढ....'

समोर ठेवलेला कांदा पाटावर ठेवून मधूनं त्यावर जोरांत बुक्की मारली. कांदा ठेचला गेला. मागलं पुढलं टोक दातांनी तोडून त्यासोबत पोळीचा तुकडा गिळायचा तो प्रयत्न करूं लागला !! रमाबाई

चकार शब्द बोलल्या नाहींत.

मधूनं रमाबाईकडे एकवार निरखून पाहिलं नि ताट ढकलून उठून उभा झाला—' आई! झालं जेवण.'

' थांब ! असा उठूं नकोस ! घे....तेल तिखट घालतें म्हणजे चव लागेल ! ' रमाबाई रुक्ष आवाजांत म्हणाल्या. तेल तिखट वाढून त्या अबोल बनल्या. मधूला ती स्तब्धता असह्य झाली.

'अशी मुकस्तंभासारखी बसणार असशील तर कसा गिळवेल घास ?....'

' काय बोलूं ? कशासाठी बोलूं ? '

' बरं ! तर भरलं माझं पोट... !! '

' अरे बैस ! अन्नाचा अपमान करुं नये ! तुला दिसत नाहीं. स्वतःची परिस्थिति कळत नाहीं !! '

रमाबाईचा स्वर घोगरा झाला होता.

' आपली व्यथा कुणाला कळत नाहीं. बापूआई सारे वेड्यात काढतात आपणाला !'— मधुकर फिरून उठून उभा झाला.

' पुष्कळ झालं आई ! घांस गिळवत नाही अशानं ? ' तो उभा झाला. त्याचं शरीर चिमणीच्या प्रकाशाच्या वर्तुळावर गेलं. त्याच्या पोट-ऱ्याचे केस तेवढे लख्ख दिसूं लागले.

' पुरे झालं जेवण ! घास नाहीं गिळवत—उद्या निघेन बाहेर... तुझ्या हातावर पैसे ठेवीन, मग घरांत शिरेन, हेच हवं ना तुम्हां साऱ्यांना? मग लागेन ना मी गोड ?'

' मधू ऽऽ '—रमाबाईचा आवाज कातर झाला. ' का छळतोस उगीच ? कीं छळायलाच जन्माला आलास ?....चांगले पांग फेडतोस आई-वडिलांचें....हें बघ ! तूं नोकरी बघ कीं नको बघूस....मी आहे

धडधाकट अजून...आज स्वतः आजारी पडलेत....संकटांत सांपडलेत म्हणून तुझी जीभ चुरुचुरु बोलतेय् ! एवढं कर की उद्या सकाळीं वामनरावांकडे जा !

‘ मी जाणार नाहीं त्या दीड शहाण्याकडे !’ मधुकर संतापानें बेभान होऊन ओरडला. मोरींत भराभर हात धुवूं लागला.

‘ बरं ! राहूं दे !’ ‘ रमाबाई उष्ट सावरींत म्हणाल्या.

मधू धुमसत उभा होता. मग तो एकदम मागे वळला. समोर सुमीं छायेसारखी उभी होती. तिची नि मधूची नजरानजर झाली. आणि त्याचे डोळे खजीलपणे पायावर खिळले....

तो बैठकींत आला. समोर बिशू उभा होता !

बिशूची नि त्याची दृष्टादृष्ट झाली. त्याचे डोळे तिरस्कारानें पेटले होते. या चिरमुड्या नि अगदी अपरिचित मनाच्या बिशूकडे पाहून मधुकरच्या तळपायाची आग मस्तकाला गेली.

बिशूकडे तुच्छतेनं पाहून तो माळ्यावर जाऊन बसला !

आज सारं जग त्याच्या विरूद्ध झालं होतं. अशा निर्बुद्ध, अन्यायी नि क्रूर जगाचा त्याला सात्विक संताप आला होता. कवितेच्या अत्यंत उत्कट ओळी जुळविण्याचा तो प्रयत्न करूं लागला. कोमल नि सरळ हृदयावर या व्यवहारी जगाच्या अत्याचाराचं वर्णन तो कवितेंत करणार होता.

बिशूला झोप येईना. दादाच्या वागणुकीचा त्याला अर्थ कळत नव्हता. बापू असे संकटांत सांपडले असतांना शांतपणे विचार करून मार्ग काढण्यास मधू कां तयार होत नाहीं, याचं त्याला आश्चर्य वाटूं लागलं. त्याच्या विचित्र स्वार्थीपणामुळे बिशूला मोठा धक्का बसला ! तो निजल्या निजल्या पुटपुटूं लागला—

'देवा ! मला लौकर मोठा कर! मी आईबापूंना सुख देईन....मला लौकर मोठा कर !'

\+ + +

रात्रीचे बारा वाजले. चंद्राची एक तिरिप खिडकींतून आंत आली होती. सगळीकडे सामसूम होतं. पण माळ्यावर मधू घिरट्या घालीत होता. त्यामुळं अगदीं छातीवर छत करकर वाजत होतं. कदाचित् तो कवितेच्या ओळी जुळवीत होता,

' पाहिलं कसा करतोय ?....'

' कशाला बोललीस त्याला ? देवाला कबूल असेल तेंच व्हायचं पोराबाळांना नको त्रास....आतां थोडे दिवस राहिलेत. परवां कचे-रीत जाईना....कुजबुज सुरूं झालीय....एक दोघांशी गोष्ट काढली होती. पण समजा....पण समजा....मग मधुकरच पाहणार सारं... त्याला दुखवूं नकोस...अग ऽ हें जीवन क्षणभंगुर आहे. तूं त्याचेकडे पहा....!!'

रमाबाईच्या दबलेल्या हुंदक्याचा स्वर स्पष्टपणे बिशूला ऐकूं आला.

' वेडी ! कधी कुणाला फसवलं नाही ! जंटलमन माणसानंच गळा कापला शेवटी....सगळंच बदललं...आतां भकास वाटतं स्वारस्य नाही उरलं. ' बापूंनी दीर्घ सुस्कारा सोडला.

सगळीकडे गाढ स्तब्धता पसरली होती.

' आपण उगीच वाईट नाही वाटून घ्यायचं....मी खंबीर आहे ना ? मी बरी भलतं सलतं होऊं देईन ?...स्वतःचंच मन कच नाहीं खाऊं द्यायचं....पण मधूचा नाहीं भरंवसा बरं ! तो ऐनवेळी दगा देईल !!'

' नको ग ऽ ' बापू व्यथित आवाजांत म्हणाले.

'दगा देईल ! मधूदादा दगा देईल !!' बिशूचे डोळे सताड उघडे होते. त्याच्या मनाला एक गाठ मारली गेली.

: २३ :

कुणालाच न सांगता मधू बाहेर पडला. या वेळी त्याचं तोंड अतिशय फिकट दिसत होतं. तो खाली पहात नाकाच्या सरळ रेषेंत चालला होता. मनाशी पुटपुटत होता; हातवारे करीत होता. त्यानं एक दीर्घ उसासा सोडला. त्याला फार आवडणाऱ्या खालील ओळीं तो पुटपुटूं लागला—

मै वह धनु हूं जिसे साधनेमे प्रत्यंचा टूट गई है।
स्खलित हुआ है बाण यदपि ध्वनि दिकदिगंत में-धूम गई है ।

तो मान हलवून स्वतःशी कोरडें हंसला. त्याने असहायतेने सभोवार पाहिलं. मग गति वाढविली—'वामनरावकडे जा. आई म्हणाली होती !! ' ' वामनराव !! ' त्याचा चेहरा तुच्छतेनं रुंदावला बकल्स आवळून निकर फिट बसविली. बाह्या दंडावर दुमडल्या. मग छाती काढुन तो चालूं लागला.

' वामनराव !! हुंः ' फिरून त्याचा चेहरा तुच्छतेनं रुंदावला. मला व्यवहारज्ञान शिकवायचा मक्ताच घेतलाय साल्यानं. विधवेचा पैसा बळकावला ! असे धंदे ! पैसा !! '

मधुकर रस्त्यावर थुंकला.

' हृदयाचं वाजलंय दिवाळं...बापूंनी सगळीकडे हात पसरले.... पण त्याच्याकडे नाही पसरले....म्हणे जुन्याकाळचा घरोबा....हुंः बापू संकाटांत सांपडल्यापासून एकदा तरी फिरकलाय का घरीं ? एरवी

नाक फेंदारून हंसत हंसत चहा पिऊन जातो लेकाचा ! मला सगळं समजतं....'

'पण बापू-आईला समजेल तेव्हां ना ! त्याला भेटलो तर तो मला नोकरी मिळवून देणार आहे का ? फुकटचा सल्ला देईल. दहा ठिकाणीं खेटे घालायला सांगेल....म्हणजे मग मी म्हणावं—ठीक आहे, वामन काका ! मग विजयी मुद्रेनं तो माझी पाठ थोपटेल. '

मधुकरचं अंग अक्षरशः शहारलं. त्याचा पारा चढूं लागला. त्यानं रस्त्यांतला एक दगड ठोकरीनं उडविला ! तो घरंगळत समोरच्या नालींत जाऊन पडला....

समोर वामनरावांचं घर आलं होतं.

तें एक बाहेरुन बांधून काढलेलं पण आंतून अत्यंत कोंदट असं घर होतं. एक लहानसा चौक होता. पण त्यांत सूर्य प्रकाश शिरणं शक्य नव्हतं. मधोमध एक तुळशी वृंदावन होतं. पण त्यांतील तुळस वाळून कोळ झाली होती. अंगणांतल्या वरंड्यांत एक झोपाळा होता. त्यावर एक वाकडमानी आजारी दिसणारी मुलगी बसली होती. मधूला पाहिल्या बरोबर तिचा चेहरा उजळला ! ती धांवतच आली नि आनंदानं ओरडली—' मधूदादा ! मधूदादा आला ! '

वरच्या मजल्यावरील लहान खिडकींतून एक सोवळी विकेशाबाई डोकावून म्हणाली—' कोण ? मधू का ? ये बाबा ! '

' हीच किशाताई ! वामनरावांची नातलग. इथंच राहते ! सांज सकाळ खस्ता खाते....याचा संसार रेटते !! '

मधू विचार करूं लागला.

तेवढ्यांत एक चौदापंधरा वर्षांची मुलगी धांवत खिडकीशी आली. सोनी–किशाताईची मुलगी ! ती धांवत आंत गेली !

'मधू आलाय् ग काकी! मधूऽऽ' ती ओरडून सांगत होती. आणि त्या अरुंद अंधाऱ्या अंगणांत मधू हतबुद्ध उभा!

एक चिंचोळा जिना वर चढून मधू गेला. किशाताई समोर आली. आनंदाने हंसत म्हणाली—'आतां मोठे झाले ऽऽ शिकले सवरलेऽ! आता यायला कष्ट पडतात पोरांना....' किशाताईचा कुरूप चेहरा खुलला होता.

'काय म्हणत्ये मी? एवढासा होतास बेटा ऽऽ तेव्हा अस्सा खांद्यावर खेळवलाय्' खांद्यावर हात थोपटीत किशाताई उत्साहाने म्हणाल्या.

'कोण आलाय् ग ऽऽ'

पलीकडच्या असूर्यंपश्या खोलींतून एक आजारी किरकिरता आवाज आला.

'रमाचा मधू आलाय् हो ऽऽ'

'अग ऽ त्याला चहा बिहा देशील की नई ऽ'

मधुकर स्तब्ध उभा होता. त्याला खोलींत जाणं भाग होतं.

त्याला आधीं काहींच दिसेना. मग अधारांतूनच आवाज उमटला—मध्या का? बैस बाबा! अरे तिथं नव्हे! तिथं! फार दिवसांत आलास? काय खबर बात? मला मेलीला नाही होत यायला!

हा नेहमीचा आजार आहे ना! हे सांगतात तिकडची हकीगत! तेवढंच बरं वाटतं! ठवला का ग चहा किशाताई?...'

किशाताईनं केव्हांच चहा ठेवला होता. त्यांनी भरकन कप समोर आणून ठेवला. मधुकरनं किशाताइकडे पाहिलं. त्या कोपऱ्यांत हंसत उभ्या होत्या. अंधारांत त्यांचे पिंवळे दांत तेवढे दिसत होते. मधुकरला या सर्वांनी लहानपणीं खेळविलं होतं. त्याच्या गळ्यांत आवढा

अडकला....

त्या अंधाऱ्या खोलींत मग त्याला स्पष्ट दिसूं लागलं होतं. पलंगावर निजलेली व पांढऱ्या फटफटीत चेहऱ्याची यमुना काकी—वामन काकांची बायको—त्याचेकडे कौतुकानं बघत होती. खोल किरकिऱ्या आवाजांत ती म्हणाली—

' अन् काय रे मध्या ! आतां मोठी माणसं झालांत म्हणून विसरायचं का रे साऱ्यांना ? '

' तसं नव्हे ग काकू !! ' स्वतःच्या आवाजांतला खोटेपणा जाणवून मधुकर स्वतःशीच दचकला. त्याच्याशीं स्नहाची नाती जोडणारं हें कोणतं कुजलेलं जीवन ! ही किशाताइ, सोनी....ही सारी माणसं वामनरावाच्या घरीं जेवणावारी खपणारी ! राबतात, खस्ता खातात, उणीदुणीं सोसतात....नि सारे कुजतात. असं असूनहि यांना त्याची जाणीव नाहीं. कोणती सुत्रं यांना इतकीं घट्ट गोवून आहेत ?

मधुकरचा चहा तसाच होता.

' साखर हवी का रे ? '

त्या सर्वांच्या आस्थेनं मधुकर अत्यंत गोंधळला, शरमला नि तरीहि पळून जाण्यासाठी तो दाराकडे बघूं लागला.

तेवढ्यांत सोनी ओरडली—' वामन काका आले ग ऽऽ '

वामनरावांना भेटण्याच्या निमित्तानं मधली चिंचोळी गच्ची ओलांडून तो पलिकडच्या खोलीकडे जाण्यास निघाला.

भिंतीला टेकवून ठेवलेल्या लहानशा शिडीवरून एक पांढरं वस्त्र घातलेली विकेशाबाई उतरत होती. ही वामनरावची बहीण ! सहानुभूति....नि शिसारी !! वामनरावनं हिलाच लुटलंय....

मधूचं मस्तक गरगर फिरूं लागलं....

घरींच कुणीसं बोललं होतं तें त्याला आठवलं.

' ही वामनची दूरची बहीण ! घरची श्रीमंत बरं का ! मुंबईकडे दिली होती. नवरा मेल्यावर हिचं पडलं वाकडं पाऊल. सगळीकडे गवगवा झाला. सासरच्यांनी घालवून दिली. माहेरच्या मंडळींनी लोकांच्या भितीनं घरांत घेतली नाहीं. शेवटी वामनकडं आली. तशी वाईट नव्हती बिचारी. तिला आसरा हवा होता. वामन घाबरला, पळूं लागला. तिला घालवूं लागला. साऱ्या जगाची खिल्ली उडविणारा प्रत्येकाच्या चुलीपर्यंत पोचणारा हा नारद लटपटला... अगदी दीनवाणा झाला; क्षिप्रेकांठच्या धर्ममार्तंडांची केवढी धडकी भरली होती त्याला ! पण शेवटी दिला आसरा त्यानं....तेव्हापासून अशी रहाते कोंडलेल्या पशूसारखी....लपविलेल्या पापासारखी ! बापूंच्या सांगण्यावरुन झाला होता तयार ! कुणास ठाऊक पैशासाठींहि असेल...नक्की पैशासाठीच....तसा वामनराव भेकड आहे.

मधू वामनरावाच्या बसण्याच्या खोलींत शिरला जुन्या ढंगाचं ते वाडावजा घर नि ही खोली यांत जमीन अस्मानाचं अंतर होतं. ते जर्जर पेशवाई वजा घर नि ही अत्याधुनिक पद्धतीनं श्रृंगारलेली खोली! वामनराव जातीचा गुलाम आहे. हे नवं कातडं त्यानं पांघरलं आहे !

बिशू सोफ्यावर जरा उद्धटपणानं पाय ताणून बसला आणि स्वतः-वरच तो खूष झाला. पलिकडे सोनीची धांदल चालली होती. वामन-राव तिथं गेले होते. तो समोरच्या खिडकींतून दिसणाऱ्या प्रचंड ढिगा-वर उगविलेल्या लिंबाच्या झाडाकडं पाहूं लागला ! तिथं वाडा होता. आतां ढीग आहे आणि पुढे....शेवटी तो कंटाळला. वामनराव आंत कां येत नाहींत ? तो चरफडूं लागला. त्याच्या मनश्चक्षूसमोर वामनरावांची विजयीमुद्रेनं हंसत आंत येणारी मूर्ति उभी झाली. मधू

ताडकन उठला नि येरझारा घालूं लागला. तितक्यांत वामनराव खोलींत शिरले. मधुकर चकित झाला. नवलानं पहात राहिला.

वामनरावांचा चेहरा गंभीर होता. एरवी तुकतुकीत दिसणारं तोंड घरी किंचित् सुर्कुतलेलं दिसत होतं. जवळून डोळ्याखालचीं वलयें स्पष्ट दिसत होतीं. त्या वलयांतून डोकावणारे डोळे शांत....गंभीर....

मधुकरच्या लक्षांत आले कीं बाहेरचे वामनकाका निराळे ! हे घरचे वामनकाका आहेत.

'दोन वामनकाका !' मधू कडूपणानें मनाशी पुटपुटला !

मधूला पाहून वामनराव म्हणाले—'अरे उभा कां ? बैस... बैस....' मधू बसला. वास्तविक तो वामनकाकासाठीं उभा झाला नव्हता. उभाच होता. पण वामनरावांच्या समजुतीप्रमाणे आपण उभे झालों नि बसलों हें जाणवून तो चरफडला; चुळबूळ करूं लागला ! मग त्याला स्पष्टपणे जाणवलं की आपण दबत आहोंत !....

पण वामनरावांचं लक्ष खरं म्हणजे मधूकडे नव्हतं. मधूच्या डोक्या-वरुन ते शून्यपणानें पलिकडे पाहात होते. हलुहळू ते वर्तमानपत्रावरून नजर फिरवूं लागले.

मधुकरला तें असह्य झालं. तो शांततेचा भंग करीत म्हणाला—

'आईनें पाठवलंय मला !'

'माहीत आहे !' वामनराव रूक्ष आवाजांत संक्षिप्तपणे म्हणाले. तरीहि ते मधूकडे पाहत नव्हते.

'काय म्हणते बापूंची तब्येत ?....' दुरून कुठून तरी विचारल्या-सारखा वामनरावांचा आवाज आला.

मधू जरासा गोंधळला. त्याला खरंच जाणीव नव्हती. त्याला एकदम सुचलं नाहीं.

‘ कशाला ठेवाल खबर तुम्ही ?....’ वामनराव अतिशय गंभीरपणानें म्हणाले. वामनरावांची वातड कातडी सुर्कुतून गेली होती.

मधुकरच्या जिव्हारी लागला तो बाण ! पण तो स्वस्थ बसला. त्याची मान आपोआप खाली गेली !

वामनराव उठले. शेजारच्या खोलींत गेले नि कांही वेळानंतर चोपडी घेऊन आंत आले. कोचावर बसत ते म्हणाले—

‘ दौत टाक आण बघूं !! तो पहा तिथं टेबलावर....’

मधुकर संतापला. संतापायच्या आधी त्यानं दौत टाक आणून समोर ठेवला होता. आणि ‘आतां आपण वामनरावांशेजारी अदबशीरपणे उभे आहोंत’ याची जाणींव मधूला होताच मधू दूर कोचावर जाऊन बसला ! व पलिकडे पहात शीळ घालूं लागला.

पण वामनरावांनी मधूकडे नजर वर करून पाहिलंहि नव्हतं. ते स्वतःतच अतिशय गढून गेले होते. त्यांचा टाक त्या चोपडीवरील हिरव्या पानावर हलुहळूं सरकत होता...

मधूच्या मनांत एकदम प्रकाश पडला—चेकबुक !!

मधुकरनं वामनरावांकडे गोंधळून पाहिलं. ते पाकीट शोधत होतें. पण त्यांना तें सांपडत नव्हतं. मग त्यांना तें सांपडलं. त्यांत कागद ठेवून तें व्यवस्थेशीरपणें बंद करून ते उभे झाले. दोन तीन क्षण ते तसेच स्तब्ध उभे होते. हळुहळूं त्यांची नजर मधूवर गेली. ते जरासे चकित झाले.

‘ चहा प्यालास ?....’ ते मोठ्यानें म्हणाले.

‘ हो ! ’ मधुकर घसा साफ करीत म्हणाला.

खालच्या नजरेनंच ते म्हणाले–‘ घे ! आईला म्हणावं....’ मनांतली खळबळ लपवीत ते म्हणाले– ‘ बापूंना म्हणावं....कांहीं नाहीं. येईन मी घरीं...’

मधुकर जमिनीस खिळून उभा होता. तो आश्चर्यचकित होऊन वामनरावांकडे पहात होता. जणूं काय तो त्यांना पहिल्यांदाच पहात होता.

' पहातोस काय ? जा...जा....ताबडतोब घरी जा ! '

अन् वामनरावाच्या आज्ञेप्रमाणें मधू तडक घरी निघाला. जातांना त्याची मान विचारांत गढल्यासारखी खाली झुकलेली होती.

+ ÷ ÷

आणि रमाबाईनी ते पाकीट बापूंच्या हातांत ठेवलं. बापू उभे झाले नि पाकीट फोडलं. त्यांनी वाचलं–'Six hundred Rupees.' ते शून्य दृष्टीनें त्या चेककडे पहात राहिले. त्यांच्या हातांतला चेक जोरांत थरथरूं लागला. पण ते स्तब्ध उभे होते.

' म्हटलं....! '

' सहाशे रुपये....! '

आणि स्तब्धता पसरली ! बापूंचा अशक्त चेहरा एकदम सुकून गेला. त्यांचे डोळे गोठून गेले. ते ओशाळ हंसले ! म्हणाले—

' घे ! आज वामननं माझ्या बालबच्चांना वाचवून घेतलं....' रमाबाई घाबरुन, दगडाप्रमाणे निश्चल उभ्या बापूंना हालवीत म्हणाल्या—' पण...'

बापूंनी शून्य नजरेनं रमाबाईकडे पाहिलं. भयाचा काटा सरारुन रमाबाईच्या अंगावर उठला. त्या भेदरुन म्हणाल्या—' पण....! '

बापू जणूं काय कुठं तरी दूर निघून गेले होते. त्यांना जणूं सारं कांहीं अपरिचित होतं. बापू हळुहळूं स्वयंपाक घराकडे निघाले. त्यांचे हात थरथरत होते. त्यांचे पाय डगमगत होते. बिशू घाबरुन कोपऱ्यांत उभां होता अन् मधुकर खिडकींतून बाहेर बघत होता....

बापू डगमगत दाराशी गेले. रमाबाईंनी डोळ्यांतली आसवं पुसली. त्यांनी देवाकडे वळून मनोमन नमस्कार केला अन् त्या स्वयंपाक घराकडे जात म्हणाल्या—' ऐकलं का ?....'

बापू स्वयंपाक घरांत गेले. तिथून हळुहळूं चालत ते स्वयंपाक घराच्या मागल्या दारावरुन पत्र्याच्या गच्चीवर गेले. अगदी मंद.... अगदी संथ....पत्र्याची गच्ची ओलांडून कठड्यापर्यंत गेले नि त्यावर दोन्ही हात ठेवून ओणावले....

रमाबाई मागोमाग आल्या. त्यांनी बापूंचा हात ओढून म्हटलं—' माझ्याकडे बघायचं....'

बापूंनी रमाबाईकडे तोंड केलं. मग शून्य नजरेनं कोरडं हंसून म्हणाले—

' तो पहा, दिसतोय ना महाकाळाचा कळस....? '

रमाबाईंनी पाहिलं. नऊ दहाच्या उन्हांत आकाशाच्या गडद नीलिम्यांत सोनेरी कळस लखाखत होता. बापू खोल आवाजांत म्हणाले—' तो ऽ पहा ! पाहिलास ? आई नेहमी त्या कळसाकडे मला बघायला सांगत असे....!! ' बापू कळसाकडे निश्चल नजरेनं पहात म्हणाले—' आइ ! '

ओघळते आसू पुसून रमाबाइ म्हणाल्या—' चलायचं असतं घरांत ' यंत्राप्रमाणे बापू घरांत परतूं लागले !! स्वतःशीच पुटपुटत—' पेढे वाटा आज....बरं का रमे...मी हरलो....मी खचलो....शंकरजीना हेंच मंजूर होतं. लीला....'

' आंत चलायचं....'

बापू आधाराआधारानं घरांत आले. समोर सुमी उभी होती. तिच्या पदराशी बिशू उभा होता. बापूंची खिन्न नजर त्यांचेकडे

वळली ते एकदम पुढे गेले. सुमीला त्यांनी एकदम हृदयाशीं धरलं. बिशूच्या डोक्यावर हात ठेवला... आणि त्यांचे कोरडे डोळे एकदम भरुन आले.

ते थरथरती बोटें सुमीच्या केसावरून प्रेमभरानं गुंतवीत अडखळत बोलूं लागले—' पण ही आहे ना बाबी...खुशाल '

दुसऱ्या हातांनी बिशूला थोपटीत ते बोलत गेल ' असूं दे.... असंच का होइना....ही माझी बाळं....पाहिलंस का ग ! ही पोरं ऽऽ ....मधुकर ऽऽ....जारे, असतील हिच्याकडे आठ बारा आणे तर पेढे आण....' बापू कासावीस झाले. त्यांचे पाय लटपटूं लागले !

## : २४ :

धुकें....धुकें ! नि पुस्तक

हें पुस्तकांचं जग केव्हां निर्माण झालं, केव्हां बिशू त्यांत रमून गेला, हें त्याचं त्याला आठवत नाहीं आणि या तेरा वर्षाच्या बिशूनं कविता, कथा, कादंबऱ्या, जें हाताशीं येइल तें वाचायचा सपाटा सुरू केला आहे. कांही समजतं....कांही समजत नाहीं. दोन जगें झालीं !

एक व्यवहारांतलं; दुसरं कल्पनेंतलं. त्यांतील अनेक धूसर भाव-भावनांचं....हें दुसरं स्वप्नजग बाहेर उभ राहून पहायचं नि त्यांतील सुखदुःखांत रममाण व्हायचं....त्यांत एकाकीपणे फेरफटका मारायचा...

त्या जगांत अनक छाया उमटतात....गोड, सुरेख, दुष्ट, कठोर हळहळ, प्रेम, संताप, तिरस्कार, आकर्षण, हुहूर....! स्वप्न चाला-यचं नि तें बाहेर उभं राहून पहायचं... त्याच जगाचा छंद जडे;

त्याच जगाची ओढ लागे.. .त्यांतील अनुभव स्वताचे बनत संताप चढे; अश्रू वाहत... हृदय कुणासाठी तरी उत्कटतेनं टाहो फोडी नि व्यक्तित्व हळुहळू आकारास येई...अधिक विकसित; अधिक संवेदनशील; अधिक विचारशील... अशा जगांत वावरतांना अर्धं समजे, अर्धं न समजे...

पुस्तकें, पुस्तकें ! धुकें धुकें ! रंगीबेरंगी धुकें. अशा कल्पना—जगाच्या पसरत जाणाऱ्या वर्तुळांच्या निळ्या तरंगांवर बसून बिशू दुरवर खिन्न गुलाबी छायादेशांत जाई नि तिथं कुणाला तरी हुर्हुरत साद देई...त्याचा खिन्न आत्मा सुगंधानं उलून उसासे... किंवा—

तें विश्व विरून जाऊन रोजच्या जीवनावर तो आरळे, मग त्याचं मन अतिशय व्याकूळ होई; तो देवाची करुणा भाकूं लागे—'देवा ! मला कादंबरींतल्या माणसासारखं मोठं कर...म्हणजे मी सारं काहीं मनासारखं करीन...बापू आईना दुःखी राहू देणार नाही....'

मधू, बापूआईना फार दुःख देतो. त्याचं तंत्र कुणालाच कळत नाहीं. आपण भरभर मोठे होऊं. बापूआईना सुख देऊं; नौकरी धरूं; नि पहिल्या पगारांतूनच बापूंसाठीं धोतराचं पान; आईसाठीं नवं लुगडं नि सुमासाठीं बबड्याची बहीण घालते तशी गोल साडीसारं कांहीं आणूं !

बुकांतील शूर माणसासारखं आपण सर्व विघ्नांचा सहज बिमोड करूं ! मधूकडे पाठ फिरवून आपण बापूंच्या पायीं डोकं ठेवूं.... बिशूच्या मनांतील तो शूर माणूस वारुवर बसून सर्व विघ्नांचा बिमोड करावयास निघे.... अशीं दोन जगं ! एकांत शरीर जगवायचं नि दुसऱ्यांत रमायचं, जगायचं; अनेक भूमिका स्वताकडे घ्यायच्या....

त्याच्या धुंदींतच व्यवहारांत वावरायचं नि म्हणून सारीकडे धुकें धुकें....रंगीबेरंगी धुकें....किंवा—

तें मोटार ट्रक खालीं सांपडलेलं पोर.... ती हंबरडा फोडून रडणारी आई ! पाठीवरील झोळींत मूल बांधून तुकड्यासाठीं धांवणारी बाई ! मन दयेनं पाझरतं...कारुण्यानं सारं जग भरून गेलं आहे असं वाटतं... करकरीत तिन्ही सांजा एकटं बसून उगीच रड रड रडावंसं वाटवं....

गौतमबुद्धासारखीं भगवी कफनी घालावी, संन्यासी व्हावं नि तपश्चर्या करायला जंगलांत निघून जावं.... मग दुःखें नाहिशी करायला जगभर सेवा करीत हिण्डावं....सगळे सुखी झाले कीं क्षिप्रे-काठच्या याच विशाल वडाखालीं उगवत्या पहाटेकडे बघत निश्चलपणे बसावं....

तेरा वरीसाच्या बिशूला संन्यासी व्हावंसं वाटे ?

अशी एकमेकापेक्षा वेगवेगळीं, इंद्रधनुष्याच्या विलग रंगांसारखी अनेक जगं गहिरे रंग रंगूं लागलीं....

तो शूर पुरुष, तो संन्यासी,

नि तें स्वप्न—

त्यानं राजपुत्रासारखा चूडीदार पायजमा घातलेला; उंची, रेशमी, ढिला शुभ्र सदरा घातलेला... हातांत मखमाली कोट घेऊन तो कुणावर तरी रागावत होता. शेजारी उभ्या गोल तोंडाच्या सुंदर राजकन्येसारख्या दिसणाऱ्या मुलीवर ! ती गोल तोंडाची गोड मुलगी धाकानं रडकुंडीला आलेली ! तिचा चेहरा थेट...थेट बबड्याच्या लहान बहिणीसारखा ! बिशू लाजून चूर झाला.

सुगंधी पौर्णिमेच्या शीतल स्पर्शानं लाख स्वप्नं फुलत; खिन्न संध्या-

काळीं सनई विलक्षण गोड वाटे...

रंग गहिरे होत होते. डोळे गहिरे होत होते. कस्तूरी–मृग सुगंधाच्या आशेनं बेभान धावत होता. बेंबींतील गाठ ठणकत होती.

बाह्यकात टाकून बाहेर पडत होतं. यातनेचा अर्क इतका गाढ होता की त्याला कडवटपणाची तदखी आली होती.

÷ ÷ ÷ ÷

मन रोजच्या परस्पर संघर्षांत पिचत होतं. दबत होतं. तो विरोध त्याच्या अंतर्मनावर जळते डाग देतच होता. नि दुसरीकडे विकासासाठीं झरे झगडत होते ! मन चांचपडत होतं.

दुराफेला एक दिवस बिशू म्हणाला—' दुराफे मासिक काढूं या आपण. ' दुराफे मान डोलावून म्हणाला—' होय ! काढूं या आपण मासिक ! पण मासिक म्हणजे रे काय ? '

दुराफेचा बिशूला फार संताप आला. सारे दुराफेला शंखपंती म्हणतात तेंच बरोबर. त्याला खालच्या दर्जाचा समजून त्याला टाळतात तेंच बरं....

दुराफे बिशूच्या बुद्धिवैभावनं दिपून त्याच्याकडे बावळ्यासारखा पाहत होता.

आतां मात्र बिशूला दया आली. तो म्हणाला—

' अरे ! त्यांत गोष्टी लिहूं ! कविता लिहूं ! '

' छान ! छान रे भैय्या !! जरुर काढा...' दुराफे आनंदून म्हणाला.

बातमी प्रसरली. स्मार्ट खेळाडू तिरस्काराने हंसले. खादीची टोपी घालणारा बारीक टांग्या लडडू देशमुख म्हणाला—

' शाळा सुटली कीं मीटिंग घेऊं या ' ' मीटिंग ' शब्द उच्चार-

ताना त्याने सभोंवार फुशारकीने पाहिलें. बबड्या दुराफे वगैरे मंडळींनी एकएक आणा जमा केला. संपादक बिशूला करायचं असं कुणी बोलूं लागले. साऱ्यांना पटलं. बबड्याला हा स्वताच्या सुशिक्षत संस्कृतीचा अपमान वाटला. तें त्यानं कुणाला सांगितलं मात्र नाही. मीटिंग झाली. दिसावल, दुराफे, पाटणकर सारे हजर होते. लड्डूच अर्थात बोलायला उभा झाला.

‘ आपण एक मासिक काढायचं ठरोलं आहे ! म्हणजे आपली बुद्धी वाढेल ! आपण चांगले लिहूं ! हस्ताक्षर सुधारेल..... भाषा सुधारेल....व मराठीचे मास्तरहि शाबासकी देतील.... यासाठीं हरेकानं एकेकानं एकएक आणा द्यावा.... काहींनी दिला आहे....बिशू पूरकरला संपादक करावं असं मी सुचवितो ! ’

‘ आपणास कबूल नाहीं ! ’ बबड्या संतापाने उठून म्हणाला.

बिशू अतिशय नवलानं नि दुःखानं भेदरून बबड्याकडे पाहूं लागला.

बबड्या म्हणाला—‘ मासिकांत आपण आपले देशभक्तीचे विचार मांडूं....हा देशमुख खादीचीं टोपी वापरतो. पण मासिकाची माहिती त्याला नाहीं. कुणालाहि नाही. माझ्याकडे किर्लोस्कर येतं....मला माहित....’

देशमुख एकदम उभा राहून ओरडला—‘....चूप रहा ! त्या बिशूला तुझ्यापेक्षा शंभरपटीनं कळतं....तूं दीडशहाणा....’

गडबड करण्यासाठीं आलेला वझे एकदम ओरडला—‘ हुर्यो ऽऽ हुर्यो ऽ ऽ सभा बरखास्त करा. ’

आज दुराफेलाहि ताव चढला. सगळ्यांच्या आवाजांत स्वताचा आवाज मिसळून तोहि ओरडला--‘ पटत नसेल तर चालते व्हा....’

एक गिल्ला. टाळ्या. हूर्यो ऽ ऽ हूर्यो ऽ ऽ

बबड्या संतापून ओरडला—' टाका आमचा एक आणा. हा चाललो '

बिशू संतापला होता. त्याने एक आणा बबड्याकडे फेकला. आणा उचलायला बबड्या धावला. तो ओरडून म्हणाला—पर्वा नाहीं ! मी बिशू पूरकरला जुमानीत नाही ! '

' देऊन टाका....मक्खीचूस लेकाचा. '

बबड्या निघून गेला. बिशूच्या डोळ्यांत आसवें आलीं. कां केलं असं बबड्यानं !

× × × ×

मग बिशूनं शामराव डिटेक्टिवाची गोष्ट लिहिली. दुराफेनं आर्या-दिल्या. दिसावल पाटणकरांनी चुटके दिले. हिरवी, निळी, लाल शाई वापरुन स्वतः बिशूनं मासिक लिहिलं. आपलं मासिक फार' बढिया ' झालं असं बिशूला वाटलं. मासिकाचं नांव ' दिनकर. ' डोंगराआडून सूर्य वर निघत आहे असं रंगीत चित्र कव्हरवर काढलं. त्याचा आनंद गगनांत मावेना. कुणाला दाखवूं नि कुणाला नको दाखवूं असं त्याला झालं. बबड्याला दाखवलं असतं. पण....!! बिशू फार उदास झाला.

शेवटी हितगुज लिहलं होतं—

' आम्ही सोबत्यांनी मिळून हें मासिक काढलं. हें आम्ही दरमहा लिहूं म्हणजे आमची बुद्धी वाढेल व आनंद होईल. आम्ही लहान आहों. चुका राहिल्या असतील. त्या दाखवाव्या म्हणजे सुधारूं. देशाची सेवा करूं. शेवटीं शेरे द्यायचीं पानं आहेत. त्यावर शेरे लिहावे....मोठ्यांनी आम्हाला उत्तेजन द्यावं....'

बिशू लायब्ररींत गेला. तिथं एक म्हातारे चाळिशी लावलेल गृहस्थ काम करीत होते. त्यांच्यापाशी तो उभा झाला. ते भल्या मोठ्या प्रचंड

रजिस्टरांत डोकं खुपसून लिहीत होते. बिशू बराच वेळ उभा राहिला; हालला नाही. शेवटीं त्यांनी वर पाहिलं. कोटाच्या बाहीचा लोंबणारा दोरा तोडीत म्हणाले—'क्या है बेटा ?'

'हमारा ये मासिक है न ? हमने निकाला है ! उसे टेबिल पर लगा दीजिए !'

ते गृहस्थ छप्परदार मिशातून कौतुकानं हंसले. किलकिल्या डोळ्यांनी तें न्याहळीत म्हणाले—'तुमने लिक्खा है बेटे ?....'

'जी हां'

'जरूर लगा देंगे ! लेकीन अभी रहने दो ! कल इसी टाइम आना ....तो लगा हुआ मिलेगा....'

'अच्छा !' असे म्हणून बिशू जड पावलांनी परतला. वाटेंत बबड्या दिसला. त्याच्या बरोबर नवा सोबती होता. त्याचं मन पिळवटून म्हणालं—'पण ! हा अबोला कशासाठीं ? कारण काय ? खरंच माणसं अशीं दुःख कां देतात ?...'

दुसरे दिवशी लायब्ररी उघडण्या आधीच तो दाराशी घुटमळत होता. सोबत दुराफे, दिसावल, सारी मंडळी होती. आपलें मासिक चक्क वाचनालयाच्या टेबलावर लागलेलें पाहून सगळे परस्पराकडे बघून आनंदाने हसूं लागले. काय करावें त्यांना सुचेना. गॅलरींत जाऊन त्यांनी एकमेकांना मिठ्या मारल्या. कुणी ओळखीचा दिसतो का म्हणून बिशू गॅलरीतून पाहूं लागला.

शेवटीं आंत जाऊन स्वतःचं मासिक वाचायचं त्यानं ठरविलं.... मासिकाचीं शेरे लिहायची पानं कोरीं होतीं ! छेः अजून कुणीच कसं मासिक वाचलं नाही ! तो फार हिरमुसला झाला.

दुसऱ्या दिवशी त्याच वेळीं लायब्ररींत हजर झाला. दार उघडा-

यच्या दहा मिनिटें आधींच पोचला. दार उघडतांच धावत जाऊन त्याने मासिक चाळायला सुरवात केली. त्याच्या हृदयांत चर्र झालं ! डोळ्यात आसवें उभीं झालीं.

प्रत्येक पान कुणीतरी पेन्सिलीनं चिताडून ठेवलं होतं. हें मासिक भिकार आहे. काढणारा बेअक्कल आहे. वगैरे अनेक अचकट विचकट गोष्टीहि त्यांत लिहल्या होत्या. एके ठिकाणी लिहलें होतें—मधुकर मासिकाचा कित्ता गिरवावा !

भरलेल्या डोळ्यांनी तो मधुकर मासिक शोधूं लागला. सोनेरी शाईनं लिहिलेलं ' मधुकर ' मासिक त्याला पलिकडंच दिसलं. खरो-खर तें अतिशय लुब्रक दिसत होतें. कव्हरवर ठळकपणे नांव लिहलं होतं— बळवंत वामन प्रधान

म्हणजे बबड्या !

तें गळ्यांत गळा घालून हिण्डणं....ते परस्पराशिवाय कोणतीहि वस्तू न खाणं..एकमेकांसंबंधींचं प्रेम ! ते सारं कुठं गेलं ? हेंच मासिक त्यानं कां हातीं घेतलं नाहीं ? निराळं कां बरं काढलं....?? कसल्या तरी हिडिस सत्याचा स्पर्श झाला होता !! तो घाबरून गेला होता. त्याचं मन टाहो फोडून विचारीत होतं— कां असं ? उशीं भिजून चिंब झाली होती.

÷ ÷ +

हें दुःख ! हें असं आनंद नि दुःखाचे सोनेरी पंख पालवीत कसल्यातरी निळ्या निळ्या गुलाबी धुक्यांत तळमळत भिरभिरणं.... ही थरथरत उभी असलेलीं मायाळू, करुण, वत्सल, स्वतःला पोटाशी ओढणारी घराची छाया नि ते निरंतर गडद होणारं, आणि आका-शांत फैलावत विरणाऱ्या निळ्या समुद्रासारखं एका नव्या जाणिवेचं

जग !! त्याचे गडद रंग भरले जाताहेत, नवनवीन पुस्तकांतील रंगीबिरंगी भावविश्वांनी....

ही एकमेकापासून निराळीं, अनेक रंगी विश्वें. फुलणारी, कोमेजणारी, फिरून फुलणारी, फिरून कोमेजणारी, आणि या साऱ्यांतून अतिशय उत्कटतेने जगत तीव्र वेगाने ठणकत विकासणारें....दुखत सखोल बनणारें बिशूचें अंतर्विश्व !

धुकें नि पुस्तकें !

बिशू एकटा झाला. लायब्ररीचा सायंकाळ पासून अंधार पडेपावतरचा नियमीत वाचक झाला....अनेक लघुकथा....अनेक कविता मन कळत न कळत जोरानं भावविश्व शोधूं लागलं अन् वाचून वाचून थकलेलं मन मागच्या बाजूला असलेल्या गॅलरींतल्या बांकावर जाऊन बसल्यावर अनामिक व्याकुळतेनं हुर्हुरूं लागलं. तेंव्हा समोर सायंकाळ काळवंडत असे नि समोर मशीदीच्या प्रचंड छायामय मिनारावरुन'...ला इलाह इल्लिलाह....महम्मद् रसूलिल्लाह—' अशी एकाकी दीर्घ अजान ऐकूं येत असे....तेव्हां आकाशाच्या डोळ्यांतून मधुर अश्रू निखळे नि एक बारीकसा तारा बनून कुठें तरी चमचमत राही !

मधू कादंबऱ्या आणतो. बिशू त्या दिवस नि रात्र बसुन संपवितो. त्यांत सज्जन, न्यायी माणसाची बाजू लेखकानी घेतलेली असते. ती बिशूला आवडते. वाईट माणसांचे शेवटी वाईटच होतें. गांजलेल्या गरीब लोकांसाठी आपलं आयुष्य देऊन टाकावं असा त्याला आवेश चढतो....तो कादंबऱ्यांच्या पात्रासोबत हंसतो, रडतो. खांडेकरांच्य कादंबऱ्या त्याला नीट न समजल्या तरी फार आवडतात. त्या वाचल्या की त्याला खूप बरं वाटतं. खूप मोठं कांहीतरी करावं, देशासाठी

जीव धोक्यांत घालावा, गरीबासाठी लढावं असं कांहीसं त्याच्या मनावर ठसतं. त्याचं मन ज्योतीसारखं प्रखर बनून जळूं लागतं. एकदा त्यानं खांडेकरांना पत्र लिहायचं ठरवलं. रात्री जाग जागून त्यानं लिहलं—'मी सातवी इयत्तेचा विद्यार्थी आहे—मला समजत नाही तरी आपल्या कादंबऱ्या खूप खूप आवडतात....मला खोल अर्थ समजत नाही. पण मी मोठा होईन तर आपल्या कादंबऱ्या—तल्या चांगल्या माणसासारखा वागेन....लहान तोंडी मोठा घास घेत आहे....सबब रागावूं नये....' पण ते पत्र त्यानं कधीच पोस्टांत टाकलं नाहीं. छेः! खांडेकर वेडा म्हणतील. आपल्याला ते का उत्तर पाठवतील?

हे न्यायाचं, सत्याचं तत्व त्याच्या हृदयांत खोलवर ठसलं....आत्म-सात् झालं !! बबड्याच्या सांगण्यावरुन त्यानं इतर मराठी लेखकांच्या कादंबऱ्या आणल्या होत्या. फडके त्याला फार आवडत....पण या कादंबऱ्या वाचताना त्रिशूला एक गुप्त उत्सुकता वाटे....अज्ञात सौंदर्य-जगांत त्याचं मन रमूं लागे...नि माडखोलकरांच्या कादंबरीतील कांही वर्णनं वाचताना तो कावराबावरा होई....कोणी पहात तर नाहीं ना म्हणून चौबाजूस पाही. बापूंना नि आईला समोर वावर-ताना मनांत उगीचच लाजिरवाणा बने ! सौंदर्याचं गूढ अधिकच वाढलं होतं, मन चेतून झेपावत होतं. नि निष्कपट निर्दोष त्रिशूच्या हुर्हुरीला आकार आला असला तरी त्याला तें सारं कळत—नकळत होतं ! त्याच्या गूढ सौंदर्याचा संबंध वझेनं वर्गांत केलेल्या अश्लील खोडीशी....भिंतीवर लिहिलेल्या अचकट विचकट शिव्यांशी...आकृती-शीहि पोचत होता. एक गुप्त भय मनांत सपंटत होतं ! नि त्याच्या विळख्यांत लाल लाल गुलाबकळ्या दिसत होत्या !!

शाळेंतून एकटाच परतताना बिशूला हांक ऐकू आली–'बिशू !'

बबड्याचा आवाज बिशूनं ओळखला, पण त्यानं मागे वळून पाहिलं नाहीं. तो तसाच पुढं चालला होता.

' माझं ऐकतोस का ? मी मासिक चिताडलं नाहीं बिशू....

' पर्वा नाही. '

' नाही बिशू....तूं असं समजतोस. माहीत आहे मला. बिशू, थांब ! '

बबड्यानं एकदम पुढे होऊन बिशूची बाही धरला. त्याचा चेहरा केविलवाणा झाला होता. मधुकर मासिक मी काढलं....पण चिताडलं मी नाहीं....तें वझेनं....

' ठीक आहे. '

बिशू भराभर पुढे चालूं लागला. त्याला अतोनात यातना होऊं लागल्या. बबड्याचं मासिक चिताडलं की नाही हा प्रश्नच नव्हता !

' बिशू, आज माझ्या घरीं चल ! '

बिशू चकित झाला. बबड्याकडे त्यानं निरखून पाहिलं. बबड्याचे डोळे तुडुम्ब भरले होते. बिशूचं मन एकदम निर्दय झालं. त्यानं तोंड फिरवलं....पण पाठीमागून दाटलेला त्याचा आवाज त्यानं ऐकला–

' बिशू....'

समोर पाहिलं. बबड्याचा निरोग नि तांबूस चेहरा त्याला म्हणत होता—' चल ! माझ्या-घरीं चल !! '

बिशूचा चेहरा गोठला. कमालीचा पोक्त बनला. बबड्या कितीतरी लहान, बालिश आहे हें त्याला जाणवलं. तो मोठा झाला होता. तंतु तुटले होते. त्याला जाणवलं की बबड्याची आतां कांही गरजच उरलेली नाही !

तो थिजलेल्या आवाजांत म्हणाला—चल !!

● ●

सर्व बाजूंनी तो मोठा होतोय.

रात्र.

' बिशू चल जेवायला ! '

बिशूनं उत्तर दिलं नाही.

' सुमे ऽ ऽ त्याला बोलावून आण ! '

सुमी आली. बिशूला ओढीत म्हणाली–' चल रे !'

तो फुरंगटून म्हणाला—' मला भूक नाही.'

' आई ऽ ऽ त्याच्या अंगांत आलंय् ! तो येत नाही !! '

' सुमी निघून गेली. सुमटली निघून गेली. कुणाला पर्वा आहे आमची ! '

' बिशू ऽ ऽ ये रे बाळ.'

बापू स्वतः आले. त्यानं झोपेचं सोंग केलं. बापूंनी अंग चाचपलं. बिशूला तो मायेचा स्पर्श फार हवाहवासा वाटला. पण तेहि म्हणाले–' निजलाय् दिसतं....निजूं द्या....'

बापूहि निघून गेले. एकंदरीत बापूंनाहि आपणापेक्षा मधूदादाच आवडतो.

मनांतला संशय पक्का झाला ! आतां तो जेवणार नव्हता; लौकर उठणार नव्हता....शाळेंत जाणार नव्हता....कांही म्हणून कांही करणार नव्हता....अस्सा पडून राहणार होता. मधूदादा कसाहि वागला तरी आवडता नि मी....

तेवढ्यांत स्वयंपाकघरांतील शब्द त्याच्या कानावर येऊं लागले.

' काय म्हणतो मधू ? अजून जेवायला नाही आला ?'

' नोकरी शोधतोय् ! नि मग जातो फिरायला....झालं ! नोकरी मिळाली कीं महाकाळाला सव्वाशेराचे पेढे वाटीन....नवस बोललंय् मी....'

' कसं होईल पोराचं ? फार भाबडाय तो ! ' बापूंचा आवाज.

' त्याचं मन कळवळतं हो ! पण सारं मनांत ठेवतो तो !! असतं आपलं एकेकाचं....'

तो कसाहि वागला तरी त्याच्यासाठी जीव टाकतात. मी नावड-ताच, इतके दिवस कसं लक्षांत आलं नाही याचं त्याला नवल वाटूं लागलं. त्याने डोळे घट्ट मिटून घेतले. पण कानावर शब्द येतच होते.

' घ्या....'

' राहू द्या तुमच्यासाठी थोडी...'

' नाही ! घ्यायची असती. मला नाही लागत भाजी....!! '

' ऐकशील तरी ! त्या मधूला राहूं दे ! माझं म्हाताऱ्याचं काय ? तो तरुण आहे. टक्के टोणपे खायचेत अजून....त्याच्या पोटांत थोडं जाऊं दे. पोरांना खायला प्यायला देखील....'

' असं पानावर बसून वाईट नाही वाटून घ्यायचं....उद्या त्याला नोकरी लागेल. मग सारं कांही ठीक होईल. माझी मनोदेवता सांगते आहे !! '

' होय ! सारं कांही ठीक होईल. वाईट वाटण्याचा काय प्रश्न आहे ग ? मी मात्र काम घेतलं आहे सांज सकाळ....वाकडे दिवा-णांकडे काम करता का म्हणून विचारलंय....मी हो म्हटलंय....'

' खरंच सांगते....आपणाला नाही झेपायचं तें....'

'मी नाही करूं द्यायची. अशी अशक्त प्रकृति....माझं ऐकायचं'

बराच वेळ स्तब्धता होती. मग दुरून बोलावं तसा बापूंचा

आवाज आला—

' भोग कुणालाच सुटले नाहीत. न करून कसं चालेल ? मला माझं काम केलंच पाहिजे. वामनचे उपकार कसे फिटतील...ते तर कधीच फिटायचे नाहीत. पण आपला धर्म म्हणून कांही आहे ना. तो केलाच पाहिजे. '

फिरून सामसूम झालं...

आता सारे इकडे येतील. तो झोपेचं सोंग करून फिरून पडला. रमाबाई आल्या; म्हणाल्या—' ऊठ बिशू....अंथरूण घालूं देशील !'

' अंथरूण घालूं देशील की नाही !! इथं पोटांत कावळे ओरडताहेत नि आम्हाला उठा म्हणताहेत, तो रागानं हातपाय आपटूं लागला; फुणफुणला—' आम्हीं नाही जा ! '

'ऊठ पाहूं....ऊठ आता....' रमाबाई करड्या आवाजांत म्हणाल्या ' अपमान ! संताप...'

' लाड करणं....खुषामत करणं दूरच राहिलं अन् ऊठ ऊठ म्हणतीय....' तो तणतणत स्वयंपाक घरांत निघून गेला; अन् एकदम दचकला. खरंच की....आई नेहमी चिडवायची त्याला—' तुला दुष्काळांत एक पोळी देऊन विकत घेतलंय....' खरंच असेल तें. कसं लक्षांत आलं नाही इतके दिवस ? त्याच्या गळ्यांत आवंढा अडकला. डोळे तुडुंब भरले.

रमाबाई आंत येत येत म्हणाल्या –'बिशू, अरे !! '

' दूर हो ! मी नाही जा....!! ' बिशू तोंड लपवीत म्हणाला.

' बिशू ऽऽ ' अत्यंत घोगरा नि आर्त आवाज ऐकून त्यानं चमकून वर पाहिलं. आईचीच हाक ती !

' तूं तरी नको रे छळूंस....तूं आतां मोठा झालास बरं का बिशू...

तूं तरी नको रे...'

समोर आई उभी होती. अत्यंत खंगलेली; व्याकूळ नि जर्जर! आईचं हें पराकष्ठेचं दैन्य बिशूच्या छातींत कट्यारी सारखं घिरलं. तो थरथर कांपत खोल आवाजांत म्हणाला——

' आई ! जेवायला वाढ ग ऽ '

तो सर्व बाजूंनी मोठा होत होता.

मोठा कधीचाच होत होता. आता खरेंच मोठा झाला. विचार विचार....साऱ्यांच्या सुखासाठी हातांत कंकण बांधलं गेलं ! स्वतःचं एकाकी जग गडद गहिरं झालं. बाहेरच्या जगाकडे तोंड फिरवून स्वतःचं जग न्याहाळणं. मधुकरला नोकरी लागली. बापू घरांतून दिवसभर बाहेर राहूं लागले. त्यामुळे गडद अवजड एकांत निर्माण झाला. तो अभ्यासांत डोकं खुपसून लांबोडा होत चालला....अगद अजाणता !! कुणाला त्रास होऊ द्यायचा नाही. स्वतःच्या हातांनी सद्राचड्डी धुवायची. ती स्वतःच वाळत टाकायची. स्वतःचा बिछाना उचलायचा. घरच्या कामांत मदत करायची. पिठाच्या गिरणीवरून स्वतः दळून आणयचं नि तिथला मालक एक हिंदी दैनिक ठेवतो ते वाचीत बसायचं....' रास गुट्टास....हंः हः हः....' एवढा मोठा झाला तरी अबिसीनियन वीरांच तें विचित्र नांव ऐकून स्वतःशी हसूं यायचं.

त्याच्या उंच कपाळावर केसांची झुलपं नि आधीच मोठे डोळे, जास्तच काळेभोर झालेले ! उंच नाक नि सपाट गाल...हाताने घरींच धुतलेली स्वच्छ चड्डी, एक कुडता, पायांत कांहीं नाही ! रस्त्यावरून खालीं पाहून चालायचं; जणूं रस्त्यावर कांही लिहिलेलं वाचीत...

असा बिशू चार साडेचारच्या सोनेरी उन्हांत हळुहळू महाकाळाच्या मंदिराकडे जातो. रोज एकदा सायंकाळी महाकाळांत जायचं, प्रचंड आवारांतून खाली उतरायचं ! मधल्या अफाट दगडी पटांगणांतून अगदी पलीकडल्या टोकाकडे पोचायचं, मग आणखी खोल जाणाऱ्या लांबच लांब दगडी पायऱ्या उतरायच्या ! अगदी खाली गेलं कीं चारी बाजूंनीं मंदिरांनी बांधून काढलेलं मोठ्या तलावाएवढं मोठं, हिरव्याकंच पाण्यानं नेहमी भरलेलं कुंड आहे ! त्या कुंडाच्या पायऱ्या उतरून पाय धुवायचे नि संगमरवरी दगडाच्या ओवरींतून गेलं की प्रचंड मोठाल्या घंटा असलेल्या लहान दगडी दाराशी थांबून एक दोन वेळां उंच उड्या मारून घंटा वाजवायचा प्रयत्न करायचा ! घंटा वाजलीच तर तिचा गंभीर ध्वनि त्या अर्धकाळोख्या परिसरांत दुमदुमायचा ! तो ऐकत स्तब्ध उभं रहायचं ! मग दगडी दरवाजातून संगमरवरी दगडांनी बांधून काढलेल्या अंधारगुडूप बोळींतून पुढे पुढे खोलवर जायचं ! अगदी धरती-मातेच्या गर्भात. तिथं एका महिरापीशीं येतांच एकदम श्वास रोखून उभं राहयचं नि मनांतून भक्तिभावानं साष्टांग नमस्कार घालायचा....

'महाकाळ !....देवधिदेव, महादेव !!....'

तो एक प्रशस्त काळ्या दगडांचा अंधारलेला गाभारा ! आंत समया जळताहेत. शंकराची पिंडी नि तीवर लोंबणाऱ्या प्रचंड अभिषेक-पात्रांतून अभिषेक होत आहे. अखंड रुद्रघोष करणारे ब्राम्हण वैदिक आरोहावरोहासह रुद्रघोष करीत आहेत–

'हरिः ओम्ः इडा देव हूरर्मनुर्यज्ञ नीर बृहस्पतिरुक्ता मदानि....'

त्या रुद्रघोषानं मनांत प्रचंड आवर्तें उसळतात ! त्या अंधकारमय गाभाऱ्यांतून निघणाऱ्या 'ओम्' ध्वनींतून दबलेले, दडपलेले, स्वर उस-

ळून उमलून सहस्त्र दलासारखे विकासत गर्गरत आहेत. त्या सम-यांच्या केशरी ज्योति फडफडत गर्गर फिरत नाचत आहेत आणि ह्या ब्रम्हांड तुफानांत देवाधिदेव भगवान शिवाच्या तांडवाचे पदन्यास पडत आहेत. सारी सृष्टि, सारी पृथ्वी डळमळत आहे. ' ओम 'च्या तुमुल ध्वनीनें दशदिशा गुंजायमान झालेल्या आहेत. ते शिव तांडव!! बापूंनी आजवर हळुहळू बिंबविलेल्या शिवाचं ते विराट दर्शन !! भक्त वत्सल ! भोले....सांब !! संकटमोचन !! ' डुमडुमत डमरु ये ! खणखणत शूल ये ! शंख फुंकीत ये ! येई रुद्रा...' एक मिनिट.... दोन मिनिटें...दीर्घकाळ बाह्य जगाचा संपूर्ण विसर पडतो नि या अनुभवांतून थकून शंकराच्या पिंडीवरील गंधाचा टिळा लावून शेवटी हळुहळूं बाहेर येताना, शून्यांत तरंगत बाहेर आल्यासारखं वाटतं. तेंव्हा पिंपळाच्या पाळीशी देवदर्शन करून परतणाऱ्या स्त्रिया दिसतात !! बिशू या अनुभवाने अगदी वाकून जातो तसाच रिताहि होतो !!

' आई ! तो पहा ग ऽ बिशू पूरकर....'

बिशूनं दचकून समोर पाहिलं. पिवळसर उन्हांतून आईसह बचड्याची छोटी बहिण इंदी येत होती. तो दचकून पहातच राहिला. निमगोऱ्या चेहऱ्यावर अगदी अघळपघळ मनमोकळं हसूं फुटत होतं. परकर नि पोलकं घातलेली....कानांत टपोर पांढऱ्या कुड्या नि हातांत मोगऱ्याच्या फुलांची पुडी...पायांत मखमली नाजुक चपला...

' आई ग ऽ तो पहा ग बिशू....' ते विलक्षण हसरे डोळे !

भावनेचा तीव्र उच्छ्वास रोखीत बिशू अगदी स्तब्ध उभा !

' आई ! हा कित्ती दिवसापासून आपल्याकडे नाही आला नं.... कां रे, कां नाही आलास रे ?'

तिची आई कौतुकाने हंसत शेजारी उभी ! ती त्याच्या अगदी शेजारी उभी !

बिशूचे डोळे स्वताच्या धुळीनें माखलेल्या पायांकडे लागलेले.... स्वतःच्या काटकुळ्या नि सांवळ्या हाताकडे लागलेले....आपलं सारं शरीर त्याला जड वाटूं लागलं....त्याची लाज वाटूं लागली...हे शरीर गळून पडावं नि नुसतं मुगंधाच्या झोतासारखं उरावं....

स्वतःचे विद्रुप वाटणारे हात मागे लपवीत; गोंधळलेला....बिशु म्हणाला—'मी आलो....येणार....बबड्या !. ..'

ती झऱ्यासारखं खळखळून हंसली. हंसता हंसता तिचं तोंड लाल-बुंद झालं.

बिशू लाजला; हतबुद्ध झाला; तीव्र सुखानं व्याकुळला !

तिची आई म्हणाली—'ये बरं खाळ आमच्याकडे ! भांडला-बिंडला तर नाही बबड्या तुझ्याशीं ?'

'आई गोंधळलाय् ग हा ! ये रे आमच्याकडे !'

'बरं....'

मग सारं सामसूम झालं...ओस पडलं. इंदी आईचं बोट धरून देवदर्शनाला निघून गेली. एका निर्मळ आनंदानं त्याचे डोळे वारंवार भरून येत होते. समोर गाई वासरांच्या धुळीचे लोट गुलाबी आकाशांत उसळत होते.

\+ \+ \+

बबड्याच्या घराकडे तो निघाला. पाउलें हलकीं पडत होतीं. बबड्या ! जणूं खूप जुनी झालेली सुखद घटना !

त्याने हाक दिली—'बबड्या !....'

बबड्या जिना उतरून समोर उभा झाला. दोघं एकमेकाची दृष्टि

टाळूं लागले. दोघं एकदम बोलूं लागले व एकदम गप बसूं लागले... तेवढ्यांत जिन्यावरून दडदड उतरत इंदी खालीं येऊं लागली. 'बबड्या त्याला वर बोलाव ना रे ऽ! दोघंहि वर या!' तिचे डोळे आनंदाने चमकत होते.

' इंदे ऽऽ हो चालती वर ' बबड्या रुक्ष आवाजांत एकदम खेकसला. इंदी जिन्यांत एकदम थबकली....तिचा चेहरा तांबडा झाला, मग खाडकन उतरला. डोळ्यांत अश्रूंची गर्दी झाली. ते लपवीत ती वर पळाली !

आरसा खळकन् फुटला. गोठलेल्या नजरेने बबड्याकडे बघून बिथूनं पाठ फिरविली....!!

## : २५ :

लाल बस्ता ! त्यांत फाइलींचा गठ्ठा बांधून तो कचेरींत न्यायचा Like an unbodied toy whose race has begun ...Race has just begun.

' पाहिलांत का बापूनानांचा मुलगा ! तहसिलदारांचा एहलकार झाला आहे. पण स्वतःला काय समजतो लेकाचा ! मी एवढी सरविस केली पण डोकं वर केलं नाही ! पण तुम्ही मात्र शेंदुरमामा....'

' चूप रहा अडसुळ्या ! तुझी नस नस मला कळते आहे. माझ्या आराजीच्या केसेस आहेत तहसीलींत. तुला काय....' पाण्याच्या पखालीसारखं फोपसं अंग पसरून देत शेंदुरमामा बोलले.

' बरं ! तपकीर तर घ्याल की नाही ! हेः हेः हेः ' तोंडाची खारीक झालेले अडसुळे बोलले !

मधूला हे सारं डसत होतं. कचेरीच्या लोकांची धावपळ, मारवाडी, बनिये, शेतकरी, चोर, त्यांतून कानावर टाक ठेऊन पुस्तकांत अनेक वर्षे दबून पडलेल्या झुरळासारखे कारकून नि दरबारी थाटाच्या साहेब लोकांची ये जा....चपराशांची लगबग....एक गोंधळ, कोलाहल...नि तेवढ्यांत तंबाखूचा बार भरुन गैरहजर माणसांच्या नांवाने नवी कंडी उठवून देऊन हंसणाऱ्या कारकून मंडळींचा तो खोकाळा....

'ते जमाने और होते. आम्ही तर साहेबांकडे डोळे वर करून पहात नव्हतो साब....नाहीं तर आजकालचे लौंडे....'

' आम्ही इंग्रजी शाळा नाहीं पाहिली म्हणून आम्हाला चार चव्वल कमी मिळाले कीं काय ? '

'थूः !' तिरस्काराने मधुकरने ओठ आवळले. तो असहाय्यपणानं बस्ता सोडूं लागला. त्याचा जीव तळमळत होता. ती तळमळ कुणालाहि कळणं शक्य नव्हतं. त्याच्या मनांत कवितेच्या ओळीं घोळूं लागल्या.

भाङ् भाङ् भाङ् कारा
आघाते आघात कर ।

त्यानें कपाळावरचा घाम निरपून सुस्कारा सोडला. त्याच्या खांद्यावर कुणीतरी हात ठेवला—

' अभी नये हो, इसीलिए अखरता है, क्यों नं ? बाद में यूं समझो की आदत पड जाती है....'

एक पिंवळ्याजर्द तोंडाचा तुर्की टोपी घातलेला वृद्ध म्हणत होता. ' फिर तो दफ्तर के सिवा चैन नही पडता.'—तो पुढे म्हणाला.

'मधुकरचं शरीर शहारलं. तोड ! तोड ! हे लोखंडी गज.'

थोरात नाराज आहेत. नोकरीवरून काढलं की....काढलं की....!

मधुकरचा श्वासोश्वास जोरांत चालूं लागला.

‘ पूरकर आया कि नही ? ’

‘ जी हुजूर ! ’—डोक्यावर टोपी चढवीत मधुकर धांवला.

× × ×

ही अपमानजनक स्थिति नि जोरानं प्रतिकार करूं पहाणारं तें बंडखोर मन.

‘ ठीक ढंग से खडे रहो जी ! ’—थोरात तेहसीलदार ओरडून म्हणाले. मधुकर टेबलापासून अंतरावर उभा झाला. डोळे पेटले.

‘ माझ्याकडे डोळे वटारून काय पहातोस ? आंखें निकाल लूंगा ! समजलास ? थोरात आहे माझं नांव. ’

वयोवृद्ध मुन्शीजी चष्मा सावरीत मध्ये पडले; म्हणाले—

‘ हुजूर ! बच्चा है-ना समझ है ’

‘ जाओ ! ’

मधुकर बाहेर आला. पेटीशी जाऊन बसला. कपाळावरच्या शिरा तट्ट फुगल्या.

‘ पूरकर ! भाई संभाळून काम कर ! थोरात भयंकर माणूस आहे.’

‘ आणि मी ? ’—जळजळीत दृष्टीनें पहात मधू म्हणाला.

‘ बहोत अच्छे ! वाह रे शेर ? ’

कुणी मनापासून साद दिली. कुणी थोरातांच्या कानावर हें टाकून त्यांना खूष करायचं ठरवूं लागले. मधुकरला कशाचंच भान नव्हतं.

÷ ÷ ÷

‘ सुबह घर आना....देखो....ठीक आठ बजे....’

सुटीचा दिवस. सकाळी आठ वाजतां साहेबांच्या बंगल्यावर मधुकर बाहेर बाकावर बसलेला. साहेब फार उशीरा उठला. मग त्यांच्या-

कडे लोक येऊं लागले नऊ वाजले...दहा वाजले....अकरा वाजले....

मधुकर थकला. हताश झाला. चिकाचा पडदा उचलून चपराशी उभा झाला....मधुकर उभा झाला. थोरात बाहेर आले. पायांत पांढरा स्वच्छ पांटऱ्यांना चिकटून बसलेला पायजमा. वर काळीभोर उंची शेरवानी. लालबुंद आंकडेबाज मिशांच्या तोंडावर अंगूरी रंगाचा फेटा. हातांत चांदीच्या मुठीची छडी....! चपराशी लगबगीनं टांग्या शेजारी दार उघडण्यास धांवला. थोरात मधुकरपाशी थांबले. एकवार त्याला आपादमस्तक न्याहाळून म्हणाले—

'ठीक है ! आज तीन बजे आ जाना समझे...!'

थोरात पाठ फिरवून कंपाउंडकडे चालूं लागले. मधुकर मट्कन बेंचवर बसला. तो हळुहळू खाली मान घालून घरीं परतला.

आपल्याला सडकून ताप भरत आहे, आपलं अंग अंग दुखत आहे असं त्याला वाटूं लागलं. डोक्यांतून विचारांचे कप्पे फडफड उडत विरूं लागले. बापूंनी इतके दिवस इथं कसे काढले ? नाहीं... सारेच सारखे नसतात....कुणीतरी गुप्तपणें आपल्या जीवनाची दोर स्वतःच्या हातांत धरली आहे. आणि त्यामुळें आपलं कपाळ रक्त-बंबाळ झालं आहे.

तो असहायतेने पडून होता. त्याच्या अंगात सडकून ताप भरत आहे असं त्याला वाटूं लागलं !

एक वाजला मग दोन....नि अडीच वाजले....

तो सतरंजीवर दोन्ही हातांत डोकं खुपसून तसाच पडला होता. ऊठ ! पंधरा वीस मिनिटं तर तिथं पोचायलाच लागतील. ऊठ आतां ....साहेब रागावेल उशीर झाला तर !

नाहीं ! मी उठणार नाहीं; मी जाणार नाही; मी स्वतंत्र आहे....

पूर्ण स्वतंत्र आहे....मी त्या पशूचा ताबेदार राहणार नाहीं....हा मधुकर आहे म्हणावं, मधुकर ! तुफानाच्या हातांत हात घालून हिण्ड-णारा ! मी जाणार नाही....सब झूठ है....मी दर्यावर हिंडेन. अडीच पावणेतीन...तीन !

वेळ टळली. ताप कमी झाला· संध्याकाळ स्वतंत्र आहे. सायंकाळीं क्षिप्रेच्या प्रवाहांत मनसोक्त पोहणार—मनसोक्त ! म्हणजे माझ्या हातांची, बाहूंची रग जिरेल...मग भावेसोबत नरसिंगघाटावर नवीन कविता वाचून दाखवीन.

वेळ टळली. हुषारी वाटते आहे. ' कल देखेंगे...कुछ भी हो जाय...'

'बाबूजी, साहबने बुलाया है....'

दारांत चपराशी उभा. मनांत क्षोभाची लाट फिरून उसळली.

' कह देना....तबियत खराब है....' तो म्हणाला.

' सोच लेना बाबूजी !! साहब का मिजाज....'

' अपना काम करो रामनारायण ! '

रामनारायण जिना उतरला. मग त्याचे पाय वाजणें बंद झालें. तो गेला ! मधुकरने उत्साहाने फेऱ्या घालण्याचा मनापासून प्रयत्न केला. पण....

' छेः....तो आतां अर्ध्या वाटेवर पोंचला असेल. ही शुद्ध गुलामी आहे. पण रामनारायण आतां बंगल्यावर पोंचला असेल. त्यानं साहेबाला एव्हांना सांगितलं असेल. सांगू द्या....फांशी थोडाच देणार आहे ! '

आणि मधुकरचं मन एकदम खचूं लागलं.

सुटली नोकरी ! अरे हें काय केलंस....सरकारी नोकरी का वाटे-वर पडली आहे ? केवढी चूक केलीस ही ? एकाएकी त्याला आपण

हा वेडेपणा उगीचच केला असं वाटूं लागलं. ऊठ, ऊठ, आतां तरी ऊठ ! मधुकर उठला. त्याचे खांदे खाली गळल्यासारखे झाले होते. त्यानें ताबडतोब निकर नि कपडे घातले. त्याचीं पाउलें भरभर साहेबांच्या बंगल्याकडे पडूं लागलीं. त्याची मान खाली लवलेली होती.

‘ अंदर आ जाओ ! ’ आंतून घोगरा आवाज आला.

शहराच्या बाहेर साहेबांचा बंगला ऐसपैस होता. त्याच्या आसपास बगीचा नि कंपाउंड होतं. बंगल्याच्या दोन टोकांना दोन लहान खोल्या होत्या नि मधल्या वरांड्यांत व्हिजिटर्ससाठीं बसण्याची सोय होती. एक बाक ही पडला होता. कामाच्या वेळी साहेब कोपऱ्याच्या लहान खोलींत बसला होता. बाहेर चिकाचा पडदा पडला होता. साडेतीन चारच्या रखरखीत उन्हांत सगळीकडे शुकशुकाट पसरला होता.

‘ हुजूर....’

‘ आजाओ अन्दर ’ आंतून घोगरा आवाज आला. मधुकर किंचित घुटमळला. मग पडदा वर करून आंत गेला.

एक मोठ्या मेजा मागें खुर्चीवर साहेब रेलून बसला होता. त्याचे डोळे गुंजासारखे लाल झालेले होते. त्याच्या लालबुंद कपाळावर आठ्या पडल्या होत्या.

‘ का बे ! थापा देतोस काय साल्या ? ’

‘ मधुकर सुन्न झाला. मग साऱ्या शरीरामधून आगीची लाट उसळली. त्याचा खालचा ओठ थरथर कांपू लागला. आधारासाठी तो साहेबाच्या टेबलावर फिरून वांकला.

‘ अदब से खडा रह, बदतमीज ! तुझ जैसे बदमाशोंकी खाल

उधेड दुंगा, समझा ! बता क्यों नहीं आया टाइमपर ?'–साहेब मूठ आपटून म्हणाला. त्याचा चेहरा एकदम चवताळलेल्या पशूसारखा दिसूं लागला. माणसाच्या चेहऱ्याशीं त्याचें साम्य एकदम कमी झालें!

' हुजूर ! ' मधुकर एकदम किंचाळला. त्याच्या कपाळाच्या शिरा टरटरून फुगल्या. खालचा ओठ त्यानें करकचून दाबला. संतापानें थरथरत पण शक्य तितका राग सावरायचा प्रयत्न करीत तो म्हणाला—

' गालियाँ न दें हुजूर....!! '

' गालीयाँ ? साले तुम्हारी खाल उधेड दूंगा, खाल ! तुम लोगोंकी नसनस हम जानते हैं. इन कांग्रेसी लौंडो को कुचलना मेरे बांए हाथ का खेल है !....क्या समझ रखा है तूने ? मैं तेरी हरकतें खूब जानता हूं ! चपरासियों से तू ऐसी दोस्ती क्यों रखता बे हरामजादे ?...'

साहेब जवळ जवळ येऊं लागला....मधुकरचे डोळे मोठमोठे होऊं लागले. आपल्या डोक्याच्या चिंध्या उडतील, आपल्या रक्तवाहिन्या टरारून फुटतील ! भयंकर द्वेषानें त्याचें अंगअंग सळसळूं लागलें.... हा थोरात नाहीं...शत्रू आहे. कुठला तरी जन्मजन्मांतरींच्या ओळखीचा सर्प आहे.

' क्या देखता है मेरी ओर सूअर के बच्चे....ये काम कौन करेगा तेरा बाप ?...'

आगीची लाट मस्तकांत भिनली....

प्रचंड धडधडाट झाला. साहेबाच्या डोळ्यासमोर काजवे चमकले! खुर्चीसह साहेब जमीनीच्या कोपऱ्यांत फेकला गेला. संतापानं बेभान झालेल्या मधुकरने विजेच्या चपळाईने आपली पोलादी मूठ साहेबाच्या हनुवटीवर जोरानें हाणली. साहेब कोपऱ्यांत शिव्या देत उठण्यासाठी धडपडत होता.

मधुकर स्वतःच्या मुठीकडे सुन्नपणें पहात होता—हें काय झालं आपल्या हातून !

तेवढ्यांत साहेब दाराशी येऊन दार बंद करण्याचा प्रयत्न करूं लागला.

'ठहर जा बदमाश ! साल्या या थोरातानं तुझ्यासारखे लौंडे दारं बंद करून उघडले आहेत....साल्यांच्या XXX वर हंटर मारमारून काम घेतलं आहे....मी ओळखतो तुम्हाला....थांब, थांब, आज आली तुझी शामत'

साहेब दाराची खिटी वर सरकवण्याचा प्रयत्न करत होता. तो बेभान होता, चवताळला होता. डोळे रागानं गर्गरत होते. मधुकर त्याच्याशी झोंबत होता, दार उघडे ठेवण्याचा तो प्रयत्न करत होता ! साहेब उंचापुरा, मांसाहारी माणूस होता..दार बंद झाल्यावर मात्र... आणि सारें बळ एकवटून मधुकरनें दुसरा ठोसा साहेबांच्या तोंडावर मारला. तो डोळ्यावर लागला....साहेबाची पकड ढिली झाली. मधुकर बाहेर निसटला. जिवाच्या आकांताने तो कंपाऊंडकडे पळत सुटला. त्यानं मागे वळून पाहिलं, साहेब दाराशी दिसला नाहीं.

तो कापत कापत कंपाऊंडशी उभा झाला. त्याच्या हातापायांत गोळे आले. तो अतिशय घाबरून गेला. हे काय झालं? आपल्या हातून काय झालं ?

'वहीं खडा रह हरामजादे ! एक पैर आगे बढाया और मैंनें शूट किया....' समोर व्हरांड्यात हातांत रिव्हाल्वर घेऊन संतापानें झोकांड्या खात साहेब उभा...त्यानं मधुकरवर पिस्तूल रोखलं होतं ....प्रसिद्ध शिकारी होता साहेब....

'वापस लौट आ जल्दी ! नही तो शूट किया...!'

आणि मधूची डगमगती पाउलं व्हरांड्याकडे पडूं लागलीं. त्याचा चेहरा पांढरा फटफटीत पडलेला....शेजारीं गेल्याबरोबर साहेबानं मधुकरच्या छातीवर पिस्तूल भिडवलं....

'कमीने सूअर....हमपर हमला करता है ? रतीभर हिला और मैनें ट्रिगर दबाया....समझले !!'

साहेब तळहाताच्या उलट्या बाजूनें मधुकरच्या थोबाडांत धडाधड मारूं लागला ! मधूच्या डोळ्यासमोर काजवे चमकूं लागले ! आपले डोळे कपाळांतून बाहेर येतील असें त्याला वाटूं लागलें ! पराकाष्ठेच्या त्वेशानें व भयंकर द्वेशानें आंधळ्या झालेल्या अखाडा बहादूर मधुकरनें साहेबाला टांग मारली ! साहेबांचा प्रचंड देह दगडी फर्शीवर जोरानें आदळला. मधुकर साहेबाच्या छातीवर चढला. एका हातानें त्याच्या हातातलं पिस्तूल हिसकून घेण्यासाठीं धडपड करूं लागला ! त्याचवेळी दुसऱ्या हाताच्या मुठीनें तो साहेबाचं तोंड ठेचूं लागला.

'घे ! घे ! हरामखोरा ! पिसाळलेल्या कुत्र्या, आज तुझा प्राण घेतो !'

आणि तेवढ्यांत धडपडल्या साहेबाच्या पिस्तुलाचं तोंड एकदम मिशू-कडे वळूं लागलं. मधू खाली आदळला....जिवाच्या आकांतानें तो ओरडला—'बचाओ ऽऽऽ बचाओ ऽऽ !!'

आणि तरीहि डोळे बंद करून तो साहेबाच्या अंगावर तुटून पडला!

त्या शांत वातावरणांत ती विकृत घोगरी किंकाळी दूरवर दुम-दुमली. किचनमध्यें काम करणारा खानसामा धावत आला. त्यानें तें दृष्य दुरून पाहिलं ! त्यान दिलेल्या आरोळीमुळे आसपासचे बंगल्यांतले लोक धांवत आले ! मधुकरची पकड सुटली. साहेब त्याच्या

उरावर बसला.

'मार डालता हूं साले तुझे....'

साहेबाचे खवे धरून दोन माणसांनी त्याला एकदम मागे ओढले—

'क्या कर रहे हैं थोरात साहब ?....खून हो जायगा....'

'हट जाओ....' थोरात सुटण्यासाठी धडपडूं लागला.

'पर्वाह नहीं. इसे अभी जहन्नुम भेज देता हूं....'

धडपडत्या थोरातला धरून चार लोक खोलींत घेऊन गेले. तो अचकट विचकट शिव्या बरळत फरफटत गेला.

मधुकरसमोर जग गरगर फिरूं लागलं. त्याची दृष्टि अंधुक होऊं लागली. त्याच्या कपाळावरून वाहणारं रक्त त्याच्या नाकावरून ओघळलं. त्याला माणसांच्या आकृति पुसट दिसूं लागल्या. आतां बापूंना तोंड कसं दाखवूं ? त्यापेक्षा....!!

त्याच्या खांद्यावर एका पोलादी जड पंजाची पकड बसली. त्यानं मागे वळून शून्यपणानं पाहिलं. आसपासच राहणारा अधिकारी दिसणारा आंकडेबाज मिशांचा एक उंच माणूस म्हणत होता—

'याद रख लौंडे ! जरुर तूने साहबपर हमला किया होगा और जान के डर से उन्होंने रिव्हाल्वर उठाया होगा....लेकिन समझले अगर इस झगडे की रपट पुलिस में दी ...खैर नहीं है....चपरासी ! ले जाओ इसे !...और देखो तांगे में बिठाकर इसे घर पहुंचाना है ! समझा बे...लौंडे'

पण मधुकरला विशेष कांहीच कळत नव्हतं...कानावर कांहींतरी आदळल्याचं भासत होतं....पुढें काय झालं हे त्याच्या नीटसं लक्षांत येईना....!

× × × ×

रात्र. चिमणीची ज्योत अंधाराला अधिकच भयाण करते आहे. मधूच्या डोक्याला पट्टा बांधलेला. त्याच्या सभोंवार बापू, रमाबाई, बिशू, सुमा ! मधूला ताप भरला आहे. तो सारखा बरळतो आहे—
'मार....मार, माझे आईबाप काढतोस काय ? बापू, मी हल्ला केला नाहीं हो ! मला सहन झालं नाहीं...सहन झालं नाहीं. कसची काळजी करतां बापू ? अगदी काळजी करूं नका ! मी आहे ना ? सगळं ठीक होईल पहा !'

'उलगडावं....जीवनाचं रहस्य, संध्यारंगांत पोहत जावं....संध्या-ताऱ्यांसोबत अश्रू ढाळावें....कवि....मी स्वतंत्र....रवि ठाकुरांचा जय-जयकार असो ! भाङ् भाङ् भाङ् कारा !'

'मी सोडणार नाहीं, सांगून ठेवतो. असं चिरडलं जायचं तर माणू-सपणा काय उरला ? बोला भावे....अं....काग ! सुमीची काळजी तुला कशाला ?....'

रमाबाईनी डोळे पुसले ! सुमी हळूच उठली. दूर कोपऱ्यांत छाये-सारखी उभी झाली ! तेंव्हा प्रकाशांत बिंदु चमकला....बापूंचे डोळे मधूवर खिळले होते.

'माझा दादा, माझा भाबडा पण शूर दादा !'

—बिशुचे डोळे तुडुंब भरून आले !

## : २६ :

'अग सुमे ऽऽ'

'इश्श ! किती दचकले मी....' गल्लीच्या टोकावरुन घराकडे वळतांना सुमा दचकून थांबली.

'किती दिवसांत भेटते आहेस ग ? मी मागाहून किती हाका मारल्या तुला...पण तू खाली मान घालून पुढं चाललेली....मग अश्शीं धावत आले बघ—' भावेची बहिण निमा जोरानं श्वासोश्वास टाकीत म्हणाली !

'मला खरंच नाही कळलं..' आपले उदास डोळे निमाकडे वळवून ती म्हणाली. तिचा गोड तांबूस चेहरा अगदी कोमेजून गेला होता.

'किती रोड झालीस....नि का ग एक विचारू का ग ?' म्हणतां म्हणतां निमा अडखळली.

'सांग की ग !' सुमाच्या उदास नजरेंत कुतूहल डोकावलं.

'म्हटलं....मी ऐकलं तें खरं का ग ? तुझ्या मधुकरांना मारामारीत लागलंय...फार फार लागलंय का ग ?'

अन् असं म्हणता म्हणतां निमाचा चेहरा एकदम उतरला नि तिच्या डोळ्यांत व्याकुळ उत्सुकता पसरली.

सुमानें निमाकडे निरखून पाहिलं...मग खोल सुस्कारा सोडला.

'मग आली नाहीस घरीं ?' सुमीनं विचारलं.

'कशी येऊ बाई ? गेले तीन दिवस जीवाला सारखं...सारखं... कशी आहे ग तब्येत ?'

सुमीनें खाली वाकून तिचा हात हातांत घेतला. त्यावर हलुवार-पणें हात फिरवीत ती स्तब्धपणानें तिच्याकडे पाहूं लागली.

'मी भेटू का ग त्यांना आता ?'—निमा एकदम म्हणाली नि तिची दृष्टि तत्काळ पायावर खिळली. सुमानं भेदरलेल्या डोळ्यांनी तिच्याकडे पाहिलं.

'नको बाई ! बापू नि आई काय म्हणतील ? नि आईला खपेल का?

'आजच्या दिवस नको. उगीच....' सुमीनं खाली मान घालून म्हटलं....'मी येते बाई ! वाट बघत असेल.

सुमी मंदपणानं पाठ फिरवून जाऊं लागली. पण तिच्या हातांत गुंफलेला हात अधिकच घट्ट दाबून निमानं तिला ओढलं तसं तिचं तोंड वळून निमाच्या समोर आलं.

'मी नाहीं जाऊं द्यायची अशी....मला सारं सांग....'

सुमीचे डोळे तुडुंब भरले.

'नाही नाही ते बोलताहेत दादाविषयी....कुणी म्हणतात अडदांड आहे,उद्धट आहे. साहेबान त्याच्यावर हल्ला केला. अगदी गोळी घातली असती बरं....छातीवर पिस्तूल दाबलं होतं.'

'अयाई ग ऽ ऽ....' निमा मधेंच घाबरून म्हणाली.

'हो ऽ ऽ' अन् मग दादानं पर्वा केली नाहीं जिवाची....वाईटसाईट शिव्या दिल्यात आई-वडिलांवरून नि दादानंहि त्याला बेदम मार दिला. तो थोरात की कोण त्याला....'

निमाचे डोळे चमकत होते. मधुकरचं हें वर्णन जणूं ती कुठं तरी खोलवर जपून ठेवीत होती.

'आपुलकीनं कोण ग विचार करतो ? साऱ्या गांवांत शेजाऱ्यापाजाऱ्यांनी बदनामी चालवलीय...बापूंचा मुलगा दंडेल, उद्धट नि वाईट आहे म्हणून....आई कामाला जाते. घालून पाडून बोलणीं ऐकून परत येते. नोकरी गेली....नि....नि....'

निमानं सुमीचा थरथरता हात आपुलकीनं दाबला.

'तुझा दादा फार मोठाय् सुमा....तो शूर आहे....अभिमानी आहे. लोकांना ओरडूं दे....तो लाखांत एक आहे....'

सुमीचा श्वासोश्वास जलद होत होता. पण तेवढ्यांत तिनं चौकस-

पणानं विचारलं—

‘ दादा तुझ्याशी कधी बोलला होता का ग ? ’

‘ छेः ! ते कुठले बोलायला ? आले कि दादाशी सारखे वाद घालतात. नाहींतर कविता म्हणून दाखवतात. स्वतांतच दंग असतात ते ! ’

‘ नि तुला कविता आवडतात ? ’

‘ हो ’—असं म्हणतांना निमा तांबडी लाल झाली.

‘ बरीच की ग आहेस् ’—असें म्हणून सुमानें तिला प्रेमभरानें कुरवाळले. तिच्या तोंडावर आल्हाद पसरला होता.

‘ बरं ! येते !! ’ सुमा ह्मणाली.

‘ निघालीस ? ’

‘ हो ! बापू यायची वेळ झालीय. ’

‘ मग केव्हां येशील घरी ? ’

‘ मला वेळ नाहीं सांपडत ग ! ’—सुमा ह्मणाली.

‘ आजीबाई सारखी काय वागतेस ? ’

‘ आजीबाई सारखी ? ’ सुमीनं नवलानं डोळे विस्फारून निमाकडे पाहिलं.

‘ वचन दे, येईन ह्मणून ! ’

‘ गळ्याची शपथ येईन ’

सुमीच्या खिन्न चेहऱ्यावर हास्याचं मंद चांदणं पसरलं. सुमी घराशी आली नि जिना चढून मधल्या अंगणांत आली. मग घुटमळली. छेः उगीच निमाला परत पाठवलं आपण ! तिला पाहून आईला बरंच वाटेल....खूप आनंद होईल.. .चुकलंच ! ती भरभर जिना उतरून रस्त्यावर आली. दूर गेली नसेल, हांक दिली की झालं. ती गल्लीच्या टोकाशी आली नि हांक देणार तेवढ्यांत तिची हाक

जागच्या जागी विरली. ती स्तब्ध झाली. नुसती बघत राहिली.

‘ वामन ! ऐक माझं ! वामन, नाहीं म्हणूं नकोस ’–बापू वामनरावांच्या हातांत कांहींतरी देत होते. वामनराव तितक्याच जोरानं त्यांचा हात झिडकारीत होते.

‘ बापू ! कां माझा अंत पहाता ? मी घेणार नाही....साफ घेणार नाहीं ’—वामनराव हात झटकीत म्हणाले. त्यांचा तुळतुळीत चेहरा किंचित कंप पावत होता. फेंदऱ्या नाकपुड्या थरथरत होत्या.

‘ मला तुम्हीं काय समजला बापू ? यासाठी का तुम्हीं हट्टाग्रहानं सकाळची नि सायंकाळची नोकरी पत्करली.... याच्यासाठी ?.... तुमचं हें उतरलेलं तोंड पहा...हे थरथरते हात बघा....बापू ! जन्मभर मला छळलेस....अन आता कां छळतोस?....माझ्यावर दया कर....’

बापूंचा दिवसभराच्या कामकाजानें शिणलेला उतरलेला मलूल चेहरा नि त्यावरील सुरकुतीन् सुरकुती विलक्षण, वेगानें थरथरूं लागली, त्यांचे ओठ....त्यांचे पाय, त्यांचे हात, सारे कांही थरथरूं लागले. मोठ्या मुष्किलीनं काठीवर भार देत, स्वतःला सावरीत ते खोल आवाजांत म्हणाले—

‘ तुझे उपकार का फेडतो आहे वामन ? ते फिटायचे नाहींत गड्या ह्या जन्मीं !! मी तर माझं काम करता आहे रे...फार थोडी आहे ही रक्कम...पण दर महिना करतां....करतां...पहा !... नाही म्हणूं नकोस ..बघ...नको निराश करूस...’

वामनरावांनी बापूंचे दोन्हा हात एकदम घट्ट धरले. ओठ घट्ट आवळले. भावनेची संवय नसलेल्या त्या शरीरांत भावना कट्यारी सारखी वाकडीतिकडी गरगर फिरत बोचूं लागली. डोळ्याखालची

सुर्कुतलेली काळी कातळी थरथरूं लागली. भिवया गोळा होऊं लागल्या, नाकपुड्या जोरानं उडूं लागल्या.

'बापू ! नका अंत पाहूं बापू...तुम्ही जिंकला आहांत...मी हरलो...पण हा अघोरी उपाय नको ! बापू, मी माणूस आहे; साधा माणूस आहे.'

थरथरती काठी खाली पडून कोसळण्याच्या बेतांत आलेल्या बापूंना सांवरीत वामनराव मोठ्यांदा हुंदका देत म्हणाले–'बापू !'

'वामन ! वामन...'

सुमाचा चेहरा अतिशय करुण झाला होता.

## : २७ :

दिवस भरभर चाललेत. जगातल्या तीव्र वेगानं बदलत्या परिस्थितीचा या एका कोपऱ्यांतल्या शांत स्थगित गांवाशी संबंध नसला तरी दुसऱ्या महायुद्धाचे अग्नितंतु खेडापाडीं पोचले होते. शेतकऱ्याच्या अंगावर खाकी वर्दी चढली होती नि तो कवाईत करीत होता. लहान लहान शहरांतून अनेक लोक युद्धांत भरती होत होते. गाड्या खचाखच भरल्या जात होत्या. दुरून मनीऑर्डरी येऊन आईबापांच्या हातांत पडत होत्या. वर्तमानपत्रावर ठळक टाइपात बातम्या छापून येत होत्या. वर्तमानपत्रें वाचणाऱ्यांची संख्या वाढली होती आणि युद्धाशी कित्येकांचा हजारो मैल दूर राहूनही रक्ताचा संबंध होता....अक्षरशः रक्ताचा !

÷ ÷ ÷

आणि आज सकाळपासून मधूला बावरल्यासारखं वाटतंय. इतके

दिवस काहींच वाटत नव्हतं. पण ती ऑर्डर हातात पडतांच सारं काही पालटलं आहे.

त्या मळक्या गल्ल्या, तें उजाड पिंपळ झाड....ती एकाकी क्षिप्रा ....नि तीं विषण्ण मंदिरें ! सारें सारें डोळे भरुन पाहूं दे !....

ही क्षिप्रा ! हिच्या काठीं गवतावर खुशाल बागडलों. ही माती ! ही काळीभोर सुगंधी माती....नि सतत वहाणारा तो प्रशांत प्रवाह. हिच्याच काठावर सारं आयुष्य घडविलं गेलं. इथंच लहानाचे मोठे झालो....हिच्याच सुषमेने बालभावनेचं जग अद्भुत रहस्यमय बनलं ! वत्सला क्षिप्रा ! मेघदूतांतील त्या ओळी—

'क्षिप्रावातः प्रियतम इव प्रार्थना चाटुकारः'

शैशव आणि तारुण्याच्या मधोमध असलेल्या त्या गुलाबी वयसंधीत लाडेंलाडें येणारं नि अंगाला बिलगून केस विस्कटून निघून जाणारं ते शीतल सुगंधी वारं...

वत्सला क्षिप्रा ! क्षिप्रे ! तुझ्या काठची माती कपाळाला लावूं दे! तो महांकाळाच्या मंदिरांतून करकरीत तिन्हीसांजा ऐकूं येणारा सनईचा विषण्ण स्वर....नि रात्रीं झोपतां झोपतां कानावर आदळणारा, दूरच्या मंदिरांतून ऐकूं येणारा झांजेचा मंजुळ ध्वनि ! ते सारे ध्वनि, तीं सारी धूसर स्वप्नं, त्या साऱ्या हुर्हुरत्या आठवणी जपून ठेऊं दे ! मनांत जपून ठेऊं दे !...

मळक्या गल्ल्या नि त्यांच्यावरुन उडणारी ही धूळ ! तें सिध्दू हलवायाचं कळकट दुकान नि येतांजातां त्याचं ऐकूं येणारं—राम राम बाबूभैया !

बारके अरूंद बोळ ! दत्तमंदिरांतल्या काकू ! भावे ! शांत आणि भव्य अस्थिपंजर भावे ! त्याच्याबरोबर तुडविलेल्या वाटा, त्याचा

गंभीर सहवास...ते सारं काहीं...ती भांडणं....वितुष्टं नि वितंडवाद ...हे सारं सारं कांही प्रिय आहे. हाडामासांत भिनलं आहे !भावे !... भावेची बहिण !

मधुकर मनांतल्या मनांत किंचित हंसला—

...आणि बापू...माझी आई...गरीब सुमा...बिझ्न...हें घर...माझं वरचं तें पुस्तकांनी भरलेलं माळवद !...

मधुकर उठून उभा झाला ! डोळे नकळत पुसले. छातींत तुफान उठत होतं. पण मनांत उठणाऱ्या झंझावाताशी त्याला अगदी थंड-पणानं, अगदी संथपणानं टक्कर द्यायची होती. हा कमकुवतपणा त्याला नको होता !

इथं कोण विचारतं आहे तुला ?....कुत्रं देखील तुला बघून शेपटी हालवीत नाही ! बाहेरचा दर्या तुला हाका मारतोय.

मुख्य प्रेरणेचा स्पर्श होतांच मधुकरला हुरूप चढला. केसाची झुलप बेपर्वाईनं त्यानं मागं सारली. तो जोरात येरझारा घालूं लागला नि एकदम उंच आवाजांत तन्मय होऊन सहावीत पाठ केलेली कविता म्हणूं लागला. अतिशय तन्मयतेनं, चढत्या आवाजांत ! तो सारें काहीं विसरला...

पोटासाठी भटकत जरी दूरदेशी फिरेन
मी राजाच्या सदनि अथवा घोर रानीं शिरेन
नेवो नेतें जड तनुस या दूर देशास दैव
राहो चित्तीं प्रिय मम परी जन्मभूमि सदैव
या संसारी निशिदिनि जरी वाहतों क्लेशराशी
चिंता ज्वाला निशिदिनि जरी जाळती मन्मनासी
जाळती मन्मनासी...

मधूचा आवाज घोगरा झाला.आता मात्र त्याला यातना होऊं लागल्या.

'मधू, काय हें ?'

'कांहीं नाहीं आई ! आज इंदूरला जाणार....माझी तयारी कर सुमे...'

'दादा ! अजून अशक्त आहेस तूं...' —सुमी म्हणाली

'गेलंच पाहिजे मला ग....'

मधुकर एकदम पाठ फिरवून जिना धडधड चढून माळ्यावर जाऊन बसला.

× × × ×

बाहेर गल्लींत टांगा थांबल्याचा आवाज झाला. तसा मधू उठला. क्षणभर त्याचे पाय अतिशय जड झाले, अडखळले. मन जड झालं; माळवदांत पडलेल्या आपल्या आवडत्या पुस्तकांकडे नजर टाकली. खुंटीवर लटकणाऱ्या डंबेल्सच्या जोडीकडे पाहिलं नि सुस्कारा सोडला.

'आला रे मधू टांगा'

'आलों ग ऽऽ'

फिरून त्यानं मागे वळून पाहून घेतलं. एक सुस्कारा टाकला. त्याचा नेहमीचा अनेक विचारा–विकारांनी क्षणोक्षणी बदलणारा चेहरा आतां पार बदलून गेला. त्या जागीं एक सतरा अठरा वर्षाच्या कच्च्या निरागस तरुणाचा बाळ चेहरा घर सोडून जातांना भेदरलेला दिसूं लागला. तो खाली आला.

'बापू !'

थरथरत्या हातांनी त्याचं मस्तक बापूंनी चाचपलं. तो बापूंच्या पाया पडला. त्यांचे कर्पूरगौर पाय त्यानं घट्ट हृदयाशीं धरले. त्याला थरथरत्या हातांनी उचलून घेत बापूंनीं भरल्या कंठानं म्हटलं—

'लौकर ये ! स्वतःला जप...तिला माझा नमस्कार सांग...

पत्र टाक...'

बापू एकदम खिडकीशी गेले. बाहेर पाहूं लागले....

'आई!'

मधू आईच्या पाया पडला. त्यानं वर पाहिलं नाही! वर पहायचा त्याला धीर झाला नाही. रमाबाई कांहींच बोलू शकत नव्हत्या ...त्याच्या मस्तकावर ऊनऊन अश्रू टपटप पडूं लागले. आईचे सांवळे आणि भेगा पडलेले कठोर लहान लहान पाय मधू घट्ट धरून बसला...'आई...माझी आऊ...'

'येतो आई...'

सुर्कुतलेल्या बसलेल्या गालावर अश्रूचा एक थेंब ओघळला!

'दादा! चल लौकर...' गल्लींतून बिशूनं हांक दिली...मधूला म्हणायचं होतं 'हो' पण हा आवाज त्याच्या छातीतच घुटमळून विरुन गेला. तो एकदम दाराशी आला. पाय घुटमळले. त्यानं मागे वळून पाहिलं—सुमी मुसमुसत होती. बोटाला पदर गुंडाळीत मूक हुंदके देत होती.

'सुमाताई! नको रडूस! लौकरच येईन बरं!'—पण हे शब्द मनींच राहिले; उमटले नाहीत.

मधू तडक जिना उतरून खाली गेला.

'अरे थांब! हें घे...'रमाबाई धांवत मागून आल्या. मधुकर मागे वळला. त्याचे डबलेले डोळे रमाबाईच्या नजरेला भेटेल.

'घे हे दही! लौकर ये...'—जोराचा हुंदका दाबीत त्या म्हणाल्या. मधू एक क्षण न थांबता टांग्याशी आला. त्याचे डोळे एकदम वर गेले! बापूंचे मंद, स्निग्ध, आर्द्र डोळे आशीर्वाद वरसत होते!!

हे डोळे पुन्हा दिसतील का ?!

टांगा स्टेशनकडे पळूं लागला—खब, खब, खब,...' येतों आतां .येतों आतां...येतों आतां !'

समोर बिशूचं शरीर तालावर हालत आहे. शून्यपणानं कुठं तरी बघतोय...खब, खब, खब...खब...

बिशू शांतपणे मधूच्या चेहऱ्याकडे पाहतो आहे. मधूच्या चेहऱ्यावर ऊनसावली सारखे फरक होत आहेत.

' दादा नौकरी करील, पैसे पाठवील...मग काळजीचें कांहींच कारण उरणार नाही. सारं काहीं ठीक होऊन जाईल !...

मधूच्या चेहऱ्यावर सारखे फरक होत आहेत. ' येतो आतां.... येतों आतां...'

बिशूच्या हालत्या मूर्तीमागे ढग तरंगत जाताहेत. मधूला त्याची शांत विचारमग्न चर्या दिसत आहे.

घरच्या वातावरणाचा एक भाग असलेलं बिशूचं व्यक्तिमत्व ठळकपणे वेगळं दिसतं आहे. त्याच्या मनांत काय चाललं असेल ? त्याच्या मनाचा थांग पत्ता आपणाला नाही ! तो किती गंभीर, किती भावप्रवण दिसतो आहे. त्याचं व्यक्तित्व जोमांत घडविलं, तुडविलं जात आहे. वेगांत वाढत, विकासत, बदलत आहे. त्या वाढत्या व्यक्तित्वाच्या कोनांनी आपलं अंग अनेक वेळां खरचटतं आहे ! हा कोण आहे बरं ? कोणत्या आधारवर हा वाढतोय ? त्याची आतां इतकी ठळक छाप मनावर पूर्वी कधीच पडली नव्हती

तो आपणाला पूर्ण अज्ञात आहे. तरी हा आपला लहान भाऊ आपणास केव्हां दिसेल ?, मधूच्या मनांत विचार चालले होते.

समोर बसलेल्या-स्वतःशी रक्तामांसाच्या संबंधांनी बद्ध असलेल्या-बिशू संबंधी आपणास कांहीच माहिती नाही, या जाणिवेनें मधूला

फार असहायता वाटली. त्याच्या पाठीवर हात फिरवावा, त्याला जवळ घेऊन मायेचे दोन शब्द बोलावे असं त्याला फार फार वाटलं पण बिशूशीं बोलण्यासारखे शब्दहि त्याच्या संग्रही नव्हते.

तेवढ्यांत जोराचा हिसका बसला. टांगा वळला. खब खब खब करीत टांगा स्टेशनांत दाखल झाला.

' बिशू ! बेटा, घे ती पेटी !! '

या नव्या संबोधनानं बिशू चमकला. पण तो पेटी खाली घेण्यासाठीं धावला.

स्टेशनवर गर्दी उसळली होती. मिलटरीच्या जवानांनी अनेक डबे खचून भरले होते. उरलेल्या डब्यांत माणसें ठेचून भरली होती. एका बगलेंत वळकटी नि दुसऱ्या बगलेंत ट्रंक घेऊन मधू गर्दीतून भराभर वाट काढीत पळूं लागला. मागून बिशू पिशवी घेऊन मधूमागे धावूं लागला. शेवटल्या डब्यांतहि जागा नव्हती. दार बंद होतं. मधू अडदांडपणानं आंत शिरला. सामान आंत घेतलं. तो खिडकी बाहेर पाहण्यास खालीं वाकला तेंव्हा त्याचं तोंड घामानं निथळत होतं. या गडबडींत तो सर्वांना विसरून गेला होता—बिशूलाहि !!

बिशू प्लेटफॉर्मवरून दादाकडे पहात होता.

' दादा !! ' त्यानें शेवटी हाक दिली.

मधू भानावर आला. त्याने खिडकींतून उडी मारली.

आकाशांत काळे निळे ढग चोळून आले होते. त्यावरून एंजिनच्या काळ्याधुराचे लोट उसळत होते. ढगाळलेल्या आकाशाच्या निळ्या प्रकाशांत प्रचंड लोखंडी एंजिन—लखलखत होते.

बिशूच्या समोर उभं राहून त्याचे दोन्ही खांदे थोपटीत मधू म्हणाला—' फिकर करूं नको हं पठ्ठे !! पुढच्या महिन्यापासून घरीं

पन्नास साठ रुपयांची मनिऑर्डर येत जाईल! मग बापू आईच्या विवंचना दूर होतील. घाबरूं नको...पहात रहा फक्त! लोक काय समजतात या मधूला!'

मधुकर मोठ्यांदा समाधानानें हसूं लागला. त्याचे डोळे चमकूं लागले. तोंडावरून हुरूप ओसंडूं लागला.

'अरे! क्या समझ रख्खा है मुझे?' तो अभिमानानें ह्मणाला. बिशू आश्चर्यचकित होऊन दादाकडे पहात होता.

बिशूच्या गळ्यांत हात घालून मधू ह्मणाला 'एक गोष्ट सांगतो ह्मणजे कळेल तुला माझी करामत! मी युद्धावर चाललोंय्! बघ ही ऑर्डर.

बिशूच्या भेदरलेल्या नजरेसमोर ऑडर धरीत मधू उत्साहाने ह्मणूं लागला—'घाबरूं नको! मी मुद्दामच कुणाला कळविलं नाही. कुणी जाऊं का दिलं असतं? अरे! भरपूर पैसे घरीं पाठवितां येतील.... साऱ्या विवंचना दूर होतील. मी युद्धावर चाललों ह्मणजे माणसा-सारखं जगता येईल..माणसासारखं..निश्चिंत रहा..बिलकुल बेफिकिर!!

'एकला चलो रेऽऽ एकला चलो रेऽऽ'

मधू आनंदाने गुणगुणूं लागला.

बिशू बधिर झाला होता; हतबुद्ध झाला होता. मधू आनंदाने गुणगुणत होता— एकला चलो रे ऽऽ

गाडीनं शीट दिली. हिरवी झंडी फडकली. मधू खिडकींतून डोकें बाहेर काढून उभा झाला. डब्यांतूनच बिशूच्या खांद्याला स्पर्श करीत तो ह्मणाला— 'आधी आईला सांग...बापूंना नको हं...' तो बिशूच्या तोंडाकडे पाहूं लागला!

फिरून गार्डानं शीट दिली. फिरून हिरवी झंडी फडकली. इंजिनानं भप्कन् धूर सोडून लांबलचक कर्कश शीट दिली. बिशूच्या दृष्टीसमोरून डबा हालला.

खिडकींतून खाली वाकून मधू ओरडला—'घबराना नहीं !'

गाडी झक् झक् करीत स्टेशनच्या आवाराबाहेर जाऊं लागली. मधू खिडकीबाहेर आंग काढून स्मित मुखाने जोराजोराने हात हालवूं लागला. गाडी दूर जात होती. मधू सारखा हात हलवीत होता. अश्रूंनी अंधुक झालेल्या दृष्टींतून मधूची हात हालविणारी मूर्ति अंधुक अंधुक होत गेली. दृष्टीआड होईपर्यंत हात हलत असल्याचा बिशूला भास होत राहिला. अश्रूंच्या जोराच्या फवाऱ्यामुळे सारे कांहीं पुसलें गेलें.

÷ ÷ ÷

गाडी निघून गेली. स्टेशन ओस पडलं. तो हळुहळूं घराकडे परतला; मान खालीं घालून !

हातांत औषधाची बाटली घेऊन येणाऱ्या भावेनं त्याला पाहिलं. तो थबकला.

'बिशू....' त्यानं हांक दिली. बिशूनं वर पाहिलं. त्याचे गाल भिजले होते.

'कां रे....काय झालं ?'

अश्रूंचा आवेग आवरीत एवढा मोठा बिशू (चौदा वर्षांचा झाला ना तो !) म्हणाला—

'दादा...दादा....गेला नोकरीवर....'

'वाः जाणारच होता तो...तो इन्दूरला राहील. तिथं लागेल नोकरी...वेड्या रडायला काय झालं ?'

'नोकरी लागलीय त्याला....!'

'म्हणजे ?....'

'लढाईवर गेला दादा....!'

भावे स्तब्ध उभा झाला. किंचित् घुटमळला. मग हलुहळू पुढे निघाला. त्याच्या धोतराखाली पांढऱ्या काटकुळ्या पोटऱ्यावर फुगलेल्या निळ्या नसा स्पष्ट दिसत होत्या. तो थोडा पुढं गेला मग थांबला व मागे वळून म्हणाला—

' बापू, आईला सांगून गेलाय....?'

' नाही ....'

' मलाहि माहीत नव्हतं !! '

दोन तीन क्षण शातपणानं बिशूकडे तो पहात राहिला. मग त्याच्या खांद्यावर हात ठेऊन तो म्हणाला–' घाबरूं नये ! सहन करावं....'

मग तो म्हणाला—' चल ! माझ्या घरीं चल....'

ते दोघे चालू लागले. भावे फार हळू चालत होता. बरेच अंतर गेल्यावर तो थांबून म्हणाला—' आपण इथं बसू या का ? '

' कां ? मी नाही थकलों ! '

' तू नाहीं रे ! मी थकलोय....आजारी आहे ना....'–कपाळा-वरचा घाम पुशीत तो म्हणाला.

' काय होतंय....'

' फारसं कांहींच नाही. बारीक ताप येतोय झालं. '

ते घरी आले. जिना चढून वर गेल्यावर भावे म्हणाला–'बैस !...'

' अग ऽ निमा ऽ ऽ, हा बिशू आलाय ग....चहा-बिहा देशील कांही ? ' निमा अतिशय लगबगीनं आंत आली नि बिशूला पाहू-तांच एकदम थबकली.

' बिशू का ' तिनं मनाशी विचार केला, बिशूचे डोळे अश्रूंनी धुतलेले मोठाले दिसत होते. त्याचा ,बाळ चेहरा सुतीक्ष्ण रेषांनी

विलक्षण चणचणीत दिसत होता. तिला तो, कुणास माहित कोणत्या दृष्टीनं फार फार आवडला....

'बघतेस काय अशी! मधू कुणाला न सांगताच लढाईवर निघून गेला. म्हणून रडत होता पोर....कुणाला न सांगताच निघून गेला..

शेवटलं वाक्य भावे स्वतःशीच, टोपी खुंटीला अडकवीत असतांना म्हणाला.

त्यानं मान वर करून निमाकडे पाहिलं. ती जागी खिळली होती. तिचे डोळे डबडबले होते.

भावेच्या नजरेशी नजर भिडताच तिची नजर एकदम पायावर खिळली. शरीराला एकदम जोराचा वळसा देऊन ती अश्रू सांवरीत आंत पळाली. भावेच्या अशक्त पिंवळ्या चेहऱ्यावरच्या भिंवया बोलतांना वर गेल्या! अनेक भाव त्याच्या तोंडावर एकदम थरथरले.

तो एकदम म्हणाला—' असं ?....मला !....'

## : २८ :

रात्र झाली आहे ! मध्यरात्र, पण झोप येत नाहीं ! घरांत कोपऱ्यांत चिमणी टिमटिमते आहे. सारीं अंथरुणावर झोपलीं आहेत. बाहेर आकाश ढगांनी काळकुट्ट झालंय. एकहि तारा दिसत नाहीं. आंत चिमणीच्या अंधुक लाल थरथरत्या प्रकाशांत भिंतीवर निरनिराळ्या वस्तूंच्या भेसूर छाया हालत आहेत. शंकरजींच्या समोरील निरांजनातलं तूप केव्हांच सरलं ! आतां देव्हारा अंधारांत आहे ! बाण दिसत नाही ! सारं विस्कळित झालं आहे. मधूचा कोपरा रिकामा आहे ! मधू नाहीं इथं झोपायला....तो इंदूरला झोपला असेल...

कुठं कुठं झोपलाय माझा मधू ? तो खिडकींतून हेंच आभाळ पाहत असेल !! हेंच काळकुट्ट आभाळ....बाळा ये रे !! बाळा ये रे !!

कधीं नाहीं जवळून दूर केलं ! म्हाताऱ्यासाठी निघून गेलास....!! झोप नाही. देह बिछान्यावर मासळीसारखा तळमळतोय.

रमाबाई बापूंपाशी हळूच आल्या. मग अत्यंत हळुवार आवाजांत म्हणाल्या—' मन हळवं नाहीं करायचं बरं. एक गोष्ट सांगू का ? म्हटलं....' रमाबाई अतिशय भेदरलेल्या व्याकुळ नजरेनं बापूंच्या तोंडावरील मनोभाव बघूं लागल्या.

' सांग....'

बापूंनी रमाबाईच्या हाताला किंचित स्पर्श केला होता.

' मधू....मधू....इंदूरला नाहीं गेला. लढाईवर गेलाय तो...'

एवढं बोलून रमाबाई एकदम भिंतीशीं टेकल्या.

'गेला !....गेला !!....लढाईवर गेला !! आता नाही भेट होत....' गोठलेल्या डोळ्यांनी संथपणाने बापू म्हणाले—

' असं बोलूं नये....असं बोलूं नये....' विद्ध आवाजांत रमाबाई बोलल्या

' नाही ! शंकरजी त्याचा केस वाकडा नाही होऊ देणार, पण भेट नाहीं होत आतां....'

' नका हो ! नका बोलूं असं ! ' रमाबाईनी एक अस्फुट किंकाळी फोडली....

' बरं !!'—खजील स्वरांत बापू म्हणाले, त्यांचे डोळे आंत ओढले गेले होते, विझून गेले होते. गालाच्या सुरकुत्या लोंबत होत्या. ' फार दूर गेला तो ! ' ते पुटपुटले. मग तेहि एकदम वळकटीवर आडवे झाले.

दिवस खचला होता ! रात्र वाढत होती ! पंजे चाचपडत होते. पाय डगमगत होते. ज्योतीनं मान खालीं घातली होती ! मधोमध उभा खांब कलथूं पहात होता, नि छताच्या एका कोपऱ्याने जमिनीवर बसकण घेतली होती !!

झोंप नाही. बापू बिछान्यावर तळमळताहेत. किंचित गुंगी येत आहे ! पुढे पुढे देशपांडे चालला आहे फुटपाथवर ! मागून बापू पिशवी सावरीत त्याला गाठायला धांपा टाकीत चालले आहेत. तो थबकला. मग एकदम वळून विचित्र हंसला. मग म्हणूं लागला. 'कोणत्या त्रेतायुगांत राहताहांत बापू....कोणत्या त्रेतायुगांत....जा जा....तुम्ही पैसे घेतले आहेत, उघड आहे' आणि खंगलेल्या छातींत यातनेचा डोंब उसळला.

फिरून अंधाराच्या लाटा उसळत चालल्या ! बापू काळ्या लाटांच्या गर्जनांना पहात उभे आहेत !! काय हे ! शिवशिव...काय हे ....पाण्याचा चांगला शुभ्र रंग जाऊन हे काय झालंय ? घेरी येते. शिवशिव....कुणी मणभराचं वजन पायांत बांधलंय जणूं ! तो पुढे चालला आहे ना ? तोच ऐटबाज पोषाख....तीच संथ चाल. गळ्यांत शब्दांचे बुडबुडे उमटतात—' देशपांडे ! पहा, मी तुमच्या वाडिलांच्या जागी आहे....!! माझे वडील तुमच्या सारखेच होते. ते वारले नि मी माधुकरी मागूं लागलो. हः हः !'

नाहीं चालवत, नाही बोलवत.

पण मी मन लावून जगलो, प्रेमानं जगलो. सारं मन लावून केलं ! एका पै ची अफरातफर नाही केली कधी...गोपाळकाका सांगून गेले होते ना...!

ती अगदीं निंच छत असलेली जुन्या वाड्याची एकीकडची

भूभारवजा खोली ! अस्थिपंजर, मिशांचं छप्पर असलेलें बापूंचे वडील मृत्युशय्येवर ठाणवई जळते आहे...पण लहान नारायणाचे डोळे झोपेंत जड झालेत. त्याला फारसं कांहीं कळत नाही !...पण सभोंवार माणसांच्या छाया चित्राकांत उभ्या आहेत ! गोपाळकाकाच्या डोळ्यांनीं किंचित उघड झाप केली ! अश्रूंचा एक ओघळ डोळ्याच्या खोबणींतून गालहाडावरून ओघळला. त्याच्या हातांनी चादरीशी चाळवाचाळव केली होती. मग डोळे शोधूं लागले होते....कुणीसं म्हणालं—'अरे नारायणा ! हो पुढे....त्यांचा हात हातांत घे....' लहान नारायण पुढे सरकला. तो मांसहीन हात हातांत घेऊन बसला ! मग त्याच्या चेहऱ्यावर ते डोळे खिळून बसले....मिशाखाली ओठांची किंचित हालचाल झाली !

कुणीसं म्हणालं होतं....'अरे ! त्यांच्या तोंडाशी कान ने.... वाक जरा बेटा ..'

मग नारायणानं स्वतःचा कान त्यांच्या तोंडाशी नेला होता.... अत्यंत प्रयासानं ते ओठांतून शब्द निसटूं लागले—'तूं...तूं बेटा...इमानानं...वाग....वाग...शंकरजी....बरं...करतील ! मी... मी....'

मग पाठीमागून एका हातानं शांतपणानं त्याला हळुवार स्पर्श केला—'हो बाळ मागं आतां....'

नारायण मागे झाला !....पण गोपाळकाकांचा ताठ हात एकदम हटेना....कुणीतरी हात बाजूस केला....अंधारांतून हुंदका ऐकूं आला —'गेले बिचारे....सुटले. ! !'

मग प्रेतयात्रेंत....गोपाळकाकांचं प्रेत नि पुढे हातांत विस्तव घेऊन नारायण चालला होता...दोन्ही दंडांना दोन्ही बाजूंनी कुण

धरून ठेवलं होतं....डोक्याचा गोटा झालेला नारायण....भर रस्त्यांत टाहो फोडून रडत जात होता—हः हः हः हऽऽ हा हा हा हाऽऽ.... ती छाया मनावरून कधीच पुसली गेली नव्हती! गोपाळकाका! तुम्ही सांगितलं तसं....सारं काही केलं....पण....पण काका होऽऽ....

'उठायचं असतं! हे काय?' रमाबाई बापूंना जोरांत हालवून म्हणत होत्या....

'अंऽऽ'

'छातीवर हात पडलाय्! कसली कसली स्वप्नं पडताहेत?...किती घाबरलें मी....'

'मला झोपी जाऊं दे...!'

  

दिवस-रात्रीच्या काळ्या-पांढऱ्या पट्ट्यावरून काळाची बोटं भरभर सरकताहेत. आजारीपणामुळे लांबची सुटी! तेवढाच उरलेला जगाचा संबंध तोहि तुटला. जग दूर गेलं म्हणून त्याचा तोंडवळा....छाया, प्रकाश....उंच सखलपणा सारं स्पष्ट दिसूं लागलं. रमाबाईच्या खंगलेल्या मूर्तीचं ठसठशीत दर्शन होऊं लागलं. तसे बापू फार कावरे बावरे झाले........त्यांच्या जीवनाला वळण लावणारी, ती हृदयांत सदोदित तेवणारी ज्योत खजील झाली. तें सत्य खजील झालं! हें आपलं नाही....इथं आपली अटकळ चालायची नाही! ते घाबरून रमाबाईना हाक मारायचे-'अग ऽऽ ए....अग ऽऽ ए....काही नाही.... तूं तरी काय सांगशील?'

'घाबरूं नये! सारं ठीक होईल. मधूचं पत्र येत असेल!' रमाबाईंचे ठाशीव उद्गार. जीवनाच्या कराल लाटेला वेसण घालून तीवर आरूढ होऊं पाहणाऱ्या शक्तीचे ते उद्गार.

'पण, कसं सांगू...सारं बेचव वाटतं....उगीच वाटतं....भयंकर हुर्हुर वाटते....सारें ठीकच होईल...पण....' भिंतीला टेकून तापांतच बापू तासन् तास बसूं लागले—

रमाबाई समोर उभ्या. हातांत पत्र. सारी गोळा झाली. दूरवर कुठें तरी आनंदध्वनि होत आहे व तो जवळ जवळ येत आहे असा बापूंना भास झाला.

'बघायचं ! बघायचं मधूचं पत्र !'

'काय म्हटलं !'—गुंगींतून जागे होत बापू म्हणाले !

'मधूचं पत्र आलंय् बापू !' सुमी अतिशय आनंदाने म्हणाली.

'अस्सं ? बघूं ?'

० ० ०

समोर पत्र धरलं. मधूची मोत्यासारखीं वळणदार अक्षरं डोळे निरखूं लागली ! मग ती एकमेकांत मिसळूं लागली. ओळी अंधुक होऊं लागल्या; जवळ येऊं लागल्या व मागे पळूं लागल्या. बापूंनी चष्म्याची दोरी कानाशी नीट बांधली ! बराचसा भाग मधेमधे कुणीतरी खोडून काढला होता. सगळी शक्ती एकवटून ते वाचूं लागले—

बालकें मधुकरचा शिरसाष्टांग नमस्कार....

मी आपणाला न कळवितां निघून आलों. सांगून गेलों असतों तर आपण परवानगी दिली नसती. पण माझी कुणी काळजी करूं नये ! मी अगदी आनंदांत आहे. आम्ही सकाळीं उठून कवाईत करतो. खूप शिस्तींत सगळा दिवस वागावें लागतें. भरपूर खायला; भरपूर काम ! वेळेची शुद्ध राहत नाही ! एका भोवऱ्यांत फिरतांना स्वतःचा –घरचा, सर्वगोष्टींचा विसर पडतो. इथं ( बराच खोडलेला मजकूर होता. ) × × × मी साऱ्यांना फार फार त्रास दिला....आईला...

तुम्हाला माझी काहींच मदत झाली नाही....त्रासच झाला....बिशू शहाणा आहे तो सुख देईल ( इथं पाण्याचा थेंब पडला असावा. भला मोठा डाग होता. नेमका तिथंच बापूंचा अश्रू पडला. बापू खाकरून वाचूं लागले ) ....बापू हो ! मी एका महिन्यांत दर्यावर जाईन...तिथं समुद्रच समुद्र दिसेल....अपार अथांग निळेपणा ...तिथें माझं मन रमेल....तुफानाच्या तालावर मन पदन्यास करूं लागेल. कधी आसमानी विराट पाण्यावर उदास सायंकाळ झुकेल! तेव्हा बापू त्या विराट समुद्राकडे पाहून तुमच्या सयीनं तुमचा हा मूर्ख मधू ढळाढळा रडेल. बापू काळजी करूं नका ! येथें × × × × × × असलें तरी मी रमतों आहे ! माझी झेप उंच होती पण × × × दर महिन्याला पैसे बिनचूक धाडीन....बेफिकीर रहावें—आईला एक एक दिवस जड जात असेल ! पण आई, नको काळजी करूं. माझ्या केसाला धक्का लागणार नाही. सुमे, मला गणवेशांत पाहशील तर मीठ मोहऱ्यांनी ओंवाळशील ! आम्ही जपानी लोकाशी लढणार आहोंत ! माहीत आहे ना जपान कोठें आहे तें ? बिशूला विचारून घे? × × बर्मा फ्रंटवर पाठवतील असें म्हणतात.× × × × × मला फार हुरूप वाटतो आहे.× × एक वडील भावासारखा सोबती भेटला आहे ! त्याने मला × × × × × × × रेड्डी त्याचं नांव....मी एकदां खूप उदास झालों होतों.× × × × वाटलं होतं ×××× आणि × × × × मला समजावलं होतं × × कुणी काळजी करूं नये × × बापू तुम्ही म्हणताना—अनायासेन मरणम् विना दैन्येन जीवनम् ! —मी दीन नाही आतां × × × इथंहि सोबती शेकडो आहेत × × ( बाकी काही ओळी खोडलेल्या होत्या )

तुमचा आज्ञाधारक

—मधू

बापूंनी दृष्टी वर करायचा प्रयत्न केला. हातांतलं पत्र गळून पडलं होतं. रमाबाईचा जर्जर चेहरा अश्रूंनी भिजून गेला होता. समोर बापू पुटपुटले—' बर्मा फ्रंट....कुठेसा आहे हा बर्माफ्रंट ? '

सारेंच अवचित ! काल कांहीं नव्हतें आज युद्ध दिसूं लागलें. वर्तमानपत्राचा संबंध नव्हता आज मधूसाठी वर्तमानपत्र वाचूं लागले. जणू मधूची खुशालीच त्यांत येणार होती !! आणि त्या वर्तमानपत्रांतील बातम्यांवरून युद्ध साकार होऊं लागलं. विमानांची घरघराट.... बांब वर्षाव....शहरें धडाधड कोसळून पडताहेत....जळताहेत...मांस जळल्याचा कर्पट वास येतो आहे ! लोखंडी टोप नि रबरी तोंडे आपसांत भिडताहेत ! माता पितरं छाती बडवीत आपआपाल्या मुलाचा शोध करीत आहेत ! पण प्रत्येक चेहऱ्याचा चेंदामेंदा झालेला; ओळखूं येत नाहीं !

हे कोण ? कोठले ? का मारताहेत ! बापूंच्या घरांतून पाउलवाट निघाली ती उलगडत थेट तिथं पोंचली ! ... या अग्निप्रलयांत तांबडी लाल झाली. त्यांत पांढरे केस विंचारलेली हाडकुळी म्हातारी दोन्ही हात उंच करून धावते आहे—माझ्या बेटा रे ऽ ऽ माझ्या राजा रे ऽ ऽ....

' अग....अग नको जाऊंस तिकडे ! तूंहि कशाला इथं आलीस ! शिवशिव !! हा कलीयुग....प्रलय ! यांत संहार होणार....'अन् जळत्या घरावर एक हात टेकून देशपांडे खांदे उडवून म्हणाला— कोणत्या त्रेता युगांतील गोष्टी करीत आहांत बापू ?-' तूंहि इथं आलांस ? तुझा काय संबंध आहे ? ' हातांतली काठी थरथर कापते आहे- ' दूर हो ! सर्पा तूं दूर हो ! ' काठी खूप जोरानें त्याच्या तोंडावर हाणली ! एक....दोन....तीन....हाय ! कशाला मारलंस तूं !....पण

देशपांडे अजून हंसतोय ! काठी खाली पडते. बापूंचे डोळे भयानें पांढरे पडतात. डोळ्यावर हात ठेवून ते म्हणतात—'दूर हो ऽ ऽ' अन् मग संतापाचा एक झटका येतो–' तुमचा सत्यानाश होईल ! आत्म्याचा तळतळाट आहे हा....' पण हा शाप उमटत नाहीं. छातींत कट्यारीसारखा बोचतो ! ' ये बेटा बिशू...सुमे ये ! ' एक हात बिशूच्या गळ्यांत, एक हात सुमीच्या गळ्यांत...' ये ग, चल ! निघून जाऊं या ! '

' पण ! कुठं आहे मधू ?'

पाय घोटाळले ! शहर धडधड जळत आहे ! बंदुकी घेतलेल्या छाया धावत आहेत ! तिथंच कुठे तरी मधू गेला आहे ! देशपांडेचं हंसणं अजून उमटतं आहे ! डोळे उघडे ठेवायचा प्रयत्न बापू करतात पण प्रकाश लाल सुयांसारखा डोळ्यांत खुपतो ! मग चहूबाजूंनी अंधाराचे लोटचे लोट उसळत येतात....

किनारा सुटला. ज्वराच्या तंद्रींत मन खूप मागे मागे जातं... सभोवार उभ्या छायांची अंधुक जाणीव होते. रमाबाईचा हात घट्ट धरून ठेवला ! अत्यंत अशक्त चेहऱ्यावर सारखे फरक पडताहेत. दिवसाचा जाळ पेटतो नि विझून जातो ! पेटतो नि विझून जातो ! वामनराव, कुणीतरी डाक्टर, बिशू सारे शेजारी आहेत जाणवते. ओठ खूप बोलायला स्फुरतात पण शब्द बुडबुड्यासारखे विरून जातात. थोडी जागरूकता आली कीं अंधुकतेंतून रमाबाईचा चेहरा प्रकटतो... अत्यंत गंभीर, कार्यरत करुण ! कधी हा शक्ति संचय केला ? कुणीसं म्हणालं—'अवश्य बापू या दुखण्यांतून उठतील ! रमाबाईची तपश्चर्या तशीच आहे ? बापूंचा बारीक हात हातांत घेत रमाबाई म्हणतात– ' यांतून उठायचं झालं म्हणजे !'

आपले खोल डोळे त्यांचेकडे वळवीत बापू क्षीण आवाजांत म्हणाले—'हो ! मग बरं होईल...तू माझं फार केलं. फार जपलं... उद्या...

रमाबाईचा चेहरा केविलवाणा बनतो–'नये...असं बोलूं नये...'

'बोलूं दे...कुणास माहीत ग्रॅच्युइटीचे पैसे कधी येतील...मधू...मधू कुठंहि राहीला तरी सुखांत राहिल. या बिशूचं कसं होईल ? सुमीचं.... मधू फार चांगला आहे पण तो आपला नव्हता.

'नाही हो ऽऽ त्याच्या पोटी उदंड माया आहे. बघायचं असतं.'

अत्यंत अशक्त स्थितीतहि अतिशय पुसट स्मिताची छाया बापूंच्या ओठावर थरथरली. ते कण्हत म्हणाले–' ते खरंच आहे '

मधल्या रात्रीं जागे होऊन लहान मुलासारखे रमाबाईचा हात धरून बापू म्हणाले–' तूं मला वाचवलंस....तूं माझं फार केलंस... पण आतां मला... '

रात्रभर बापू तगमगले ! कुणाला सांगतील ती तगमग ? चिमणीच्या अंधुक प्रकाशांत त्या रात्री रमाबाई स्वयंपाक घरांत एकीकडे ढसढसा रडतांना बिशूनं पाहिलं !!

' आण कोठून तरी, काहीं तरी आण ! सुमी उपाशी ! आई उपाशी ! तुझा भाऊ गेला....सुटला जबाबदारींतून....तोच बापूंच्या आजाराला कारणीभूत झाला. सोड त्याचा विचार ! देवा, माझ्या बापूंना कां दुःख देतोस ! काय न्यून राहिलं त्यांच्या भक्तींत ? बिशूचा जीव आकांत करूं लागला.

' नामदेवानं हट्ट केला तेव्हा तुवां वाटींतलें दूध घेतलें....बापूंना वाचव....वाचव बापूंना '

बिशूचा चेहरा अतिशय ओढलेला नि वयस्कर दिसूं लागला.

सायंकाळची वेळ.

तो धांवत निघाला महाकाळाच्या मंदिराकडे! त्याचे गाल भिजून गेले होते. ओठ थरथरत होते. काटकुळे पाय वेगानें धांवत होते. तो महाकाळ मंदिराच्या पटांगणांत आला. तिथं गडद उदास छाया पसरल्या होत्या. तो ओलांडून तो भरभर पायऱ्या उतरत आंतील मंदिरापाशी आला. घंटा वाजवायचें भान त्याला उरलें नाही ! तो अरुंद बोळींतून एकदम गाभाऱ्यांत शिरला....बिल्व पत्रांच्या व फुलांच्या सुगंधी दर्पात घुसून त्यानें एकदम पिंडी धरली ! व तीवर वारंवार डोकें आपटून तो विकलपणानें करुणा भाकूं लागला—
' महाकाळा ! करुणा सागरा ! वाचव माझ्या बापूंना ! तूं ऐकलं नाहीस तर खरेंपणानें कुणाकडे बघावें ?....देवाधिदेवा वांचव बापूंना '

बिशूचं सारं शरीर रडण्याच्या आवेगाने गदगदां हलू लागलं.... पिंडी भिजूं लागली !

थोड्या वेळांत त्याचं शरीर निश्चल झालं.

हळु हळूं त्यानें डोकं वर केलं. डोळे वर केले. गाल पुसले. त्यानें परक्या नजरेने पिंडीकडे पाहिलें. तो मागे सरला ! अंगावरील फाटक्या कुडत्यानं त्यानें तोंड पुसून काढलं. त्याला एकदम रिकामं रिकामं वाटूं लागलं. आंत कांहींतरी एकदम ढांसळून गेल होतं.....व्यर्थ आहे !

तो घराच्या रोखानें पळत सुटला !

दाराशी एकच गर्दी जमली होती. त्याला दुरून येताना पाहून कुजबूज वाढली; तो जवळ येताच शांत झाली. च्यु् च्य् च्य् आवाज येऊं लागला. बिशू बाणासारखा घरांत एकदम शिरला.

आणि खोलीच्या गडद अंधारांत बापूचं पिवळं फिकट तोंड तेवढं

दिसत होतं ! डोळे बंद होते. सारं शांत होतं. पण सारा अंधार मुसमुसत होता. खोलींत छायांची गर्दी झाली होती !....दबलेल्या आवाजांत घाईघाईत कामं चाललीं होतीं. दबलेल्या हुंदक्यांनीं अंधार घेरून आला होता. खोलीच्या गडद अंधारांत बापूंचं फिकट पिवळं तोंड तेवढं दिसत होतं. ते डोळे उघडले नाहीत. कण्हत्या आवाजांत त्या ओठांनी विलग होऊन 'ये बाळ बिशू !' अशी हाक दिली नाहीं ...

इतक्यांत बाहेर आवाज ऐकूं आला—'नारायणराव पूरकर !!! कुजबूज, गोंधळ, गर्दी एकदम वाढली ! गर्दींत पोस्टमन उभा होता.

'मधूनं मनिऑर्डर पाठविली !' कुणीसं म्हणालं....!

अंधारांत व्याकुळ आक्रंदनाचा बांध फुटला! मनिऑर्डर आली पण बापू हंसले नाहीत. 'पाहूं ऽऽ' म्हणून दारांशी गेले नाहीत तोंच सारें हळहळूं लागलें. सारं गरगर फिरत आहे असं बिशूला वाटलं. त्याला भोंवळ येऊं लागली. नि अंधाराच्या खाईत खोलखोल जातांना त्याच्या मनांत विचार आला—दहनक्रियेसाठी दादानं पैसे पाठविले!

आणि दुःखातिरेकानं त्यानं हंबरडा फोडला—'माझे बापू हो ऽऽ' पण त्याचे ओठ तेवढे किंचित थरथरले.

: २९ :

सात दिवस पावसाची सारखी झड लागली होती. भिंती ढास-ळल्या. रस्त्यांचे सांगाडे उघडे पडले. माती वाहून गेली. अंगणाची दगडी फरशी हिरवी गचगचीत झाली....पडक्या घरांतील अंधाऱ्या खोलींत छाया हालूं लागल्या. आणि आपल्या अतिशय कुंद काळ्या

खोलींत सुमी नि बिशूच्या खांद्यावर हात टाकून बसलेल्या....जर्जर निराधार रमाबाई तेवढ्या उरल्या... ! दोन महिने झाले, त्या खोली-बाहेर पडल्या नाहीत.

रात्रभर पाऊस पडला. आतांहि आकाश ढगांनी वोळून आलं आहे. दुपारची वेळ असली तरी अंधारून आलं आहे. बिशू कोपऱ्यांत भ्रमिष्ठासारखा बसला आहे ! अतिशय वाकलेला आणि भकास डोळ्यांचा ! तो असाच अनेक दिवस बसला आहे !....आज सुमीनं त्याला एक मोठं गाठोडं तयार करून दिलं. ट्रंकेच्या तळाशी असलेला जुना कोट काढून दिला. तरी तो बसून होता.

‘ ऊठ ! गाडीची वेळ टळेल....’

बिशू तसाच यांत्रिकपणानें उठला. कपडे केले. स्वयंपाकघरांतील अंधारांत रमाबाई असल्या होत्या. त्यांच्या पायावर डोकं ठेवलं. त्याचं शरीर, मन सारं कांहीं बधीर झालं होतं. आईच्या पायावर त्यानं डोकं तसंच राहूं दिलं त्यानं आईच्या तोंडाकडे पाहिलं नाही. दोन महिने या अंधारांत ती बसते पण तिची मान उंच झाली नाही. दाटलेल्या कांपऱ्या आवाजांत रमाबाई म्हणाल्या—‘ ऊठ ! मावशीच्या घरीं शहाण्यासारखा वाग...मन लावून अभ्यास कर ’... रडून रडून अंधुक झालेल्या दृष्टींतून आपल्या बिशूला पहाण्याचा प्रयत्न करीत त्या म्हणाल्या—‘ समजुतदारपणानें वाग ! तुझाच आधार आहे आतां !, बिशूच्या डोक्यावर टपटप अश्रु पडूं लागले.

आणि घराच्या दाराशी तो उभा झाला. अत्यंत वाकलेला. जणूं फार मोठं वजन त्याच्यावर कुणी ठेवलं होतं.

त्याच्या अंगात एक अपूऱ्या बाह्यांचा कोट होता नि मांड्या उघड्या टाकणारी अपूरी चड्डी होती. डोईवर जुनी टोपी होती.

त्यानें शून्य दृष्टीनें सारीकडें पाहिलें.

‘ चल ’

तो खाली मान घालून चालूं लागला.

‘ माझ्या हातीं दे गाठोडं. ’

‘ नको !’ त्याने गाठोडं पाठुंगळीस घेतलं.

‘ चल ! पाऊस पडायच्या आधीं पोचूं स्टेशनावर ! नाही तर भिजून जाऊं दोघं. ’

अंधारलेल्या आकाशाखालीं त्यांचीं पाउलं चिखलांत रपरप पडूं लागलीं. गाठोडं पाठीवर हेलकावूं लागलं.

तो आयुष्यांत पहिल्या प्रथम एकटा गाडीच्या डब्यांत शिरला. सुमीनं बिशूच्या कोटाला सारखं केलं नि बटण लावून दिले. त्यामुळे त्याची छाती जास्तच आवळली गेली. झिजून दोरेदोरे निघालेला कोटाची कॉलर शर्टच्या कॉलरीनं झाकून टाकली.

गाडीनं शीट दिली. बिशूचा चेहरा फारच ओढलेला दिसत होता. डोळे खोल गेले होते....गोठलेले होते.

सुमीच्या मनांत अतिशय कालवाकालव होत होती. ती मोठी बहीण होती. बिशूचं तोंड वर करीत ती म्हणाली—

‘ सांभाळून ये हो ऽऽ शहाण्यासारखा वाग !....सुटींत आई नि मी येऊं...’—आणि सुमी स्फुंदूं लागली, हुंदक्याच्या आवेगासरशी तिची नाजुक मान हेलकावूं लागली. तिनं मान खाली घातली. कढ़ू पाहणाऱ्या मायेला बांध घालायचा यत्न करीत ती डोळे पुसूं लागली.

केविलवाण्या स्वरांत बिशू म्हणाला—‘ सुमा...सुमा ताई ऽऽ ’

डबा हालला होता. सुमाताई मागं मागं राहिली. तिचा अश्रूंनी एकटक पाहणारा थरथरता नाजुक चेहरा हळूहळू अंधारांत लोपत

गेला....दिसेनासा झाला.

आणि कडकडीत ओठावर जीभ फिरवून बिशूनं हाक दिली— 'ताई ऽ'. पण ती हाक तोंडांतच घुटमळली. खोल डोळ्यांनी तो मान दुखेपर्यंत स्टेशनकडे पहात होता. पण समोरचीं घरं भरभर मागे पडत होतीं. तो एकटाच दूर जात होता. त्याचं आंतडं पिळवटत होतं...

नि झाडं भरभर मागं धांवू लागलीं. दूरवर शहर दिसूं लागलं. भग्नाशेषांच्या गर्दीमुळं ते शहरच्या शहर उध्वस्त झालेलं दिसत होतं. त्यांतून गिरणीच्या धुराचे लोटच्या लोट आकाशांत उठत होते.... आपलं गांव जळून गेलं. खाक झालं. त्यांतून धूर निघतो आहे.

बिशूला एकाएकी वाटलं !....

डबा उतारूंनी गच्च भरला होता. खिडकीसमोरच्या बेंचाच्या टोकाशी अर्धा वीत जागा उरली होती. बिशू भीत भीत त्यावर टेकला. आपलं गाठोडं त्यानं घट्ट पोटाशी धरलं. त्यानं समोर पाहिलं !...

मुसळधार पावसाचा मारा जंगलावर सुरूं झाला होता. विजा कडाडत होत्या. आकाशाचा असीम घुमट अंधारून वरसत होता.

बिशू समोर पहात होता. एकाएकी बिशूला मोठा हुंदका होत आला, मग रडें आवरेंनासें झालें....हें अवचित झालें. त्याची त्याला जाणीव नव्हती इतकं अवचित झालें.

त्याला आईची नि सुमीची फार आठवण येऊं लागली. त्यांच्यासाठी त्याचा जीव हिंदरूं लागला. बापूंसाठी त्याच्या मनान आकांत मांडला ! बापू चांगले होते....दादा चांगला होता ! मग हें सारं कां झालें हा प्रश्न त्याच्या डोक्यांत थैमान घालूं लागला....गाठोड्यावर डोकं ठेवून दोन्ही हातांनी त्यानें तोंड झाकून घेतलं.

....आणि रडतांना त्याचं शरीर, त्याची पाठ हलत होती. गाडो-ड्यावर वाकून स्वतःचं तोंड त्यानं तसंच झाकून ठेवलं होतं ....

एकाएकी त्याच्या मानेला ऊन ऊन बोटांचा स्पर्श झाला ! त्यानें घाबरून दचकून मागे पाहिलें....

भावेचा पिवळा–हिरवा आणि ओढलेला चेहरा त्याच्याकडे पहात होता. बेंचावर भिंतीला खेटून भावेनं आपला अस्थिपंजर देह एवढा वेळ ताणून दिला होता. उरलेल्या बेंचावरील माणसाच्या गर्दीमुळें तो एवढा वेळ दृष्टीआड होता. मोठ्या कष्टानें हलुहळू तो उठला नि आपल्या किडकिडीत तापलेल्या बोटांनी बिशूला स्पर्श केला. तेवढ्या श्रमाच्या वेदना त्याच्या तोंडावर स्पष्ट दिसत होत्या,

भावेला पाहताक्षणीं बिशूला फिरून रडण्याचा उमाळा आला.

' घाबरूं नकोस ! घाबरूं नये असं ऽ ' त्याच्या पाठीवरून भावे मायेनं हात फिरवूं लागला.

बिशूनं हलुहळू बाहीनं डोळे पुसले. त्याचे हुंदके कमी होऊं लागले. त्याच्या रेखीव चेहऱ्याच्या रेषा भावनेनं अधिकच सुतीक्ष्ण दिसूं लागल्या ! आपले खिन्न डोळे भावेकडे वळवून तो त्यांच्याकडे पहात राहिला. भावेच्या डोळ्यांत त्याच्या दुःखाची संपूर्ण जाणीव बिंबित झालेली दिसत होती...

' मावशीकडे चाललास ना? धीरानं घे ! तुला फार फार सोसावं लागलं....' बिशूचे ओठ थरथरूं लागले. छातींत आवेग दाटूं लागला. त्यानं मान खाली घातली....

' असं का झालं ? माझे बापू कां गेले? दादामुळे घरांतहि त्रासच त्रास कां झाला ?....कां ? ' बिशू मनाशी पुटपुटला.

भावेच्या तोंडावर नवलाचा भाव पसरला. बिशूच्या पाठीवर हात

ठेवीत तो म्हणाला—'तुझे बापू चांगले होते सरळ होते पण ते वळ-णाशी उभे होते. ते मोठे होते. सारा गांव त्यांच्यासाठी हळहळला. पण त्यांना डोळे नव्हते म्हणून त्यांना जबर धक्का बसला. आणि भिंतींत गवत उगवलं तर भिंत दुभंगते का ? पण पिंपळाचं झाड उगवलं तर भिंत दुभंगून जाते....तुझा दादा पूर्ण स्वतंत्र राहूं पहात होता ! नि म्हणूनच त्याच्या स्वातंत्र्यानं तुझं घर....तुझ्या घराचं हृदय दुभंगून गेलं....!! ' भावे पुढे म्हणाला—' स्वतःच्या मनाला गुंगींत ठेवून हलुहळूं मारावं...स्वताची वाढ डब्यांत दाबून ठेवलेल्या मुलाप्रमाणें डब्याच्या आकारा एवढीचं बेढब नि खुजी करावी...तरच....'

आणि भावे एकाएकी अतिशय खोल गेला !! बिशूला बरंचसं समजलं....बरंचसं समजलं नाही. पण भावेचा एक एक शब्द तो टिपीत होता. त्याची तगमग मात्र कमी होत नव्हती.

' पण म्हणून तूं घाबरुं नकोस ! तुझं मन मरूं देऊं नकोस. कारण तुला डोळे आहेत ! आणि तुझी वृत्ती बापूंची वृत्ती आहे ! तीच खरी आहे ! तुला दिसतें नि जाणवतें....तसेंच दिसूं नि जाणवूं दे. बापूंच्या स्मशान यात्रेला सारा मोहल्ला लोटला होता; आठवते ना ? त्यांची हीच शक्ति ओळख म्हणजे एकटं वाटणार नाही, हुरुप येईल.'

बापूंच्या स्मशान यात्रेच्या उल्लेखानें बिशूच्या डोळ्यासमोर तें दृश्य उभं राहिलं. त्याचे डोळे फिरुन केविलवाणे झाले. त्याच्या खांद्या-वर आपला ऊन हात ठेवीत म्हणाला—' तें पाहतोस ना ? तें....'

बिशूनं खिडकीबाहेर पाहिलं. गाडी पुलावर कडेशी थांबली होती. क्षिप्रेला महापूर आला होता. तिच्या फोफावणाऱ्या प्रवाहाने आसपा-सचें सर्व जलमय करुन टाकलें होतें. मंदिराचें कळस नि झाडाचे

शेंडे पाण्यावर दिसत होते. दूरवर वळणाशी तुटलेले कडे आ वासून उभे होते. क्षिप्रेचं पिवळं गढूळ पाणी शेकडों भोवरें निर्माण करीत सोंसावत प्रचंड वेगानं धांवत होतं. उद्या पाणी पुलावर येईल असं लोक बोलत होते आणि पावसाच्या कोऽयवधि धारांनी सारें दृश्य धुंदकारुन गेलें होतें !

'किती प्रचंड वेगानं क्षिप्रा मैय्या धावतेय....' भावे जणूं एक-तंद्रीतच म्हणाला—'असाच जोम, हेच बळ आपल्याहि आयुष्यांत आहे ! पण प्रवाहाशी झुंजण्याची शक्ति कमावली पाहिजे ! त्यासाठीं हा अजस्र प्रवाह ओळखला पाहिजे. तरच तें बळ आपल्यांत संचरतं! मग एकव्याचं कांही वाटत नाही ! तूं ओळखशील....पाहशील तर तूंहि धीट होशील'

बिशूच्या तोंडाकडे पहात भावे म्हणाला—'तू लहान वयांत फार सोसलंस....तुला अजून पुष्कळ दिसेल. दुःखाप्रमाणे उत्कट आनंदहि!'

बिशूनं भावेचे दोन्ही हात धरुन ठेवले. त्याचं मस्तक त्या हाता-वर वाकूं लागलं. त्याचा ऊर भरुन आला होता. त्याला धीर आला होता.

'आइ बहिणीची नको काळजी करूं ! रमाबाईचा धीर आठवीत जा ! सारीं आहेतच ! शिवाय मीहि जात जाईन....तुझ्या आयुष्याला धीटपणे सामोरा जा ! आयुष्याच्या गर्दीत एकादा प्रेमळ चेहरा तुझा शोध केल्याविना राहणार नाही !'

बिशूच्या पापण्यांना अटकलेल्या अश्रूंतून स्मिताचे ऊन चमकूं लागलं. भावेचे गरम हात दाबीत तो म्हणाला—'पण, तुमचे हात फार ऊन वाटतात.' त्या क्षीणतेंतहि भावेच्या तोंडावर स्मित

थरथरलं.

'माझं भलं विचारलंस...असं नेहमीच असतं. त्यासाठीच तर इंदूरला जातोय्...इलाज करीन म्हणतों—बरं आडवा होतों जरा... थकवा वाटतोय्....'

भावेचा चेहरा मागे मागे गेला. हळुहळू त्याने आपलं अस्थिपंजर शरीर त्या चिंचोळ्या जागेंत ताणून दिलं नि लगेच तें भिंतीला रेट-ण्यांत आलं. त्या चिकार गर्दींत भावे लपून गेला.

गाडी धावत होती. समोरच्या सपाट मैदानावरील हिरवीगार सुबक शेतें दूरवर पसरलीं होती ? ढग सैरावैरा पळत होते. सूर्याचा धूसर ठिपका दिसत होता आणि बिशूच्या हृदयांत खोलवर चैत-न्याचा संचार होत होता !....

स्टेशन आलें. रंगीबेरंगीं साड्या नि पांढरे शुभ्र विविध रंगी पोशाख केलेल्या व्यक्तींच्या थवेच्या थवे उभे होते. स्टेशन जणूं सौंदर्याने फुलून गेलें होतें. हें सारें उत्साही वातावरण इतकें नवें होतें की बिशू डोळे विस्फारून बघतच राहिला...

एका मुलाचें बोट धरून एक तेराचौदा वर्षाची शुभ्र साडी नेस-लेली मुलगी डबा पहात धांवत होती. तिची नि बिशूची नजरानजर झाली. ती थबकली. परत मुलाला ओढीत पुढें जाऊं लागली.

तिचा चेहरा आरक्त गोल नि अत्यंत प्रेमळ होता. तिचे गोल डोळे कुणाला हुडकीत चमकत होते? ती घुटमळली. पुढचे डबे पहात गर्दींत मिसळली !

'एकादा प्रेमळ चेहरा गर्दींतहि तुझा शोध करीत असेल !' हें वाक्य त्याच्या मनांत तरळून गेलं. गाठोडं त्यानं नीट पाटुंगळीस

घेतलं नि तो गर्दीत मिसळला !

त्याचे डोळे कुतूहलानं....विस्मयानं....चहूकडे बघत होते; शोधीत होते....चमकत होते...!!

